श्रीपांडुरंगसमर्थ

# तुकाराम महाराजांची गाथा

## पाठ व शब्दकोश यांसह



तयार करणार

माधव कृष्ण देशमुख          शंकर वामन दांडेकर

मुद्रक व प्रकाशक

रा. रा. शंकर नरहर जोशी चित्रशाळा प्रेस १०२६ सदाशिव पेठ,
पुणे सिटी.

शके १८४७          सन १९२५

किंमत २॥ रु०

# प्रस्तावना.



**अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ।**
**चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥ १ ॥**

रामेश्वरभट.

श्रीतुकोबाराय यांचे अभंग म्हणजे वेदांचा महाराष्ट्रीय अवतार होय. त्यांचें जितके अध्ययन होईल तितकें मनुष्याचे हृत्पटलावर असणारें अज्ञानकीट झडून जाईल व अंतःकरण शुद्ध होऊन मनुष्यजीविताचें साफल्य जी भगवत्प्राप्ति, तिच्या अवाप्तीच्या योग्य मार्गाकडे ते वळेल. श्री तुकोबाराय यांचे अभंगात जिवंतपणा आहे. ते निद्रिस्त पुरुषास खडबडून जागे करतात, असा अनुभव आहे. अशा ग्रंथांचे योग्य व मोठ्या प्रमाणावर अध्ययन होणे, हे महाराष्ट्राचे सर्वांगीण उन्नतीस अवश्य आहे, म्हणून जरी या अभंगांच्या आजपर्यंत अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत तरी आणखी एक आवृत्ति काढण्याचे धारिष्ट आम्ही करीत आहोत.

या ग्रंथांमध्ये आम्ही वाचकांकरितां शक्य तितक्या सोई करून हा ग्रंथ छापला आहे. श्रीतुकारामबुवा यांचे अभंगांचा समग्र अर्थ देणारी अशी वैकुंठवासी विष्णुबुवा जोग यांचीच फक्त ( दोन भागांत प्रसिद्ध झालेली ) गाथा आहे. यऱ्हवीं ज्या गाथा आहेत, त्यांमध्यें आवटे, निर्णयसागर, इंदुप्रकाश, यांनीं छापलेल्या गाथ्यांचे सरते शेवटीं शब्दार्थांचे कोश दिलेले आहेत; पण ते कोश असावे तितके विस्तृत नाहींत. आम्ही शब्दकोश होईल तितका विस्तृत केला आहे व प्रत्येक शब्दाच्या अर्थापुढे तो शब्द, त्या अर्थानें, कोणत्या अभंगांत उपयोगिलेला आहे, तें कळण्याकरितां त्या अभंगाचा आंकडा शब्दाचे अर्थापुढें दिला आहे.

येथें एक गोष्ट अवश्य सांगितली पाहिजे ती ही कीं, जरी आम्ही शब्दार्थांचा कोश विस्तृत दिला आहे, तरी आमची अशी समजूत आहे कीं, श्रीतुकोबांचे सर्व अभंग लागणें, ही जवळ जवळ अशक्य कोटींतील गोष्ट आहे. याकरतां जवढे समजले तेवढ्याच शब्दांचे अर्थ दिले आहेत.

तुकारामबुवांच्या वाचकांस पदोपदीं नडणारी दुसरी गोष्ट म्हणजे अभंगाचे पाठासंबंधाने होय. वारकरी समाजांत दोन तऱ्हेचे पाठ साधारणतः रूढ आहेत. एक ह. भ. प. श्रीगंगूकाका यांचे वहीवरून व दुसरा पंढरपूर येथील माळ्यांचे वहीवरून. कोणच्याही एका वहीवरून छापलेली गाथा घेतली असतां, त्यांत सर्व अभंग एका विशिष्ट पाठाच्या पद्धतीनें दिलेले असल्यामुळे, ज्यांचा पाठ भिन्न आहे, त्यास गाथ्यांत अभंग दिलेला असूनही भिन्न पाटामुळे तो न सांपडण्याचा फार संभव असतो. तेव्हां ही उणीव दूर व्हावी येवढ्याकरिता आम्ही अनुक्रमणिका देतांना दोन्ही तऱ्हेचे पाठ घेऊन अनुक्रमणिका दिली आहे व पोथींत मुख्य मुख्य भिन्नपाठही दिले आहेत; त्यामुळे ही गाथा दोन्ही तऱ्हेचे पाठांचे वाचकांस सारखीच उपयोगी होईल. जरी अशा रीतीने अनुक्रमणिका विस्तृत दिली आहे तरी आम्ही मूळांत ह० भ० प० श्रीगंगूकाकांचे पोथीचेच पाठ बहुतक घेतलेले आहेत.

यानंतर तिसरी गोष्ट म्हणजे क्षेपकांतील वर्गीकरणाची. या वर्गीकरणावरूनच आमचा साधारणतः क्षेपक म्हणून समजले जाणाऱ्या अभंगाविषयीं काय समज आहे, तो उघड होणारा आहे. खुद्द वारकरीफडांवरच क्षेपकांसंबंधीं अनिश्चितता आहे. श्रीतुकोबाराय यांचे सर्व अभंग मूळ स्वरूपांत उपलब्ध नसल्यामुळे क्षेपक कोणचे आहेत व कोणचे नाहींत. हें ठरविण्याचे काम अवघड होऊन बसले आहे. म्हणून ह० भ० प० गंगूकाका यांची पोथी प्रमाण धरून क्षेपक अभंगांचा भाग तयार केला आहे; पण क्षेपकांतील कांहीं अभंग रा. भावे यांनीं छापलेल्या अस्सल गाथेंत आढळतात व कांहीं पंढरपूर येथील माळ्यांचे प्रतींत सांपडतात; म्हणून, क्षेपक समजले जाणारे, पण या दोन पाठ्यांत सांपडणारे, असे अभंग क्षेपकांतच निरनिराळे दिले आहेत; व सरते शेवटीं ज्यांस कांहींच आधार सांपडलेला नाहीं, अशा केवळ क्षेपक अभंगांचा एक निराळा वर्ग करून ते दिले आहेत.

श्रीतुकोबांचे जे गाथे प्रसिद्ध आहेत त्या बहुतेकांस त्यांचे अल्प तरी चरित्र जोडलेले असतें. परंतु ह० भ० प० पांगारकरांनीं लिहिलेलें श्रीतुकोबांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध आहे, व इतरही पुष्कळ लहानमोठीं चरित्रें प्रसिद्ध आहेत, म्हणून आम्हीं या गाथेस त्यांचे चरित्र जोडले नाहीं.

मात्र त्यांच्या अभंगांतील शिकवणूकीची चर्चा करणारा एक छोटासा निबंध जोडला आहे.

ही गाथा तयार करण्यांत आम्हांस अनेक मित्रांनीं मदत केली त्यांचे आम्ही फार आभारी आहोंत.

पंढरीचे वारकरी

पंढरपूर
कार्तिक शु॥ ११, शके १८४७.

मा. कृ. देशमुख.
शं. वा. दांडेकर.

---

# श्रीतुकाराम महाराज यांचे अभंग व त्यांची शिकवणूक.



**अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यांस तेंचि द्यावें ।।१।।**

श्रीतुकाराम महाराज.

श्रीतुकाराम महाराज यांना वैकुंठवासी होऊन आज सुमारे पावणेतीनशें वर्षे झालीं. कालाच्या चक्रनेमिक्रमास अनुसरून श्रीतुकाराम महाराज यांच्या अवतारकालीं असलेली स्थिति पुनः महाराष्ट्रांत आजही दिसूं लागली आहे. ' टिळे लपविती पाताडी । लेती विजारा कातडी ' ' संता नाहीं मान । देव मानी मुसलमान ' वगैरे आपल्या सभोंवतालची परिस्थिति पाहून काढलेले महाराजांचे उद्गार थोड्याफार फरकानें आजच्या स्थितीसही लागू नाहींत असें कोण म्हणेल ? जेत्या परकीय संस्कृतीशीं बहुत काल सन्निकर्ष झाल्यानें उत्पन्न होणारे दुष्परिणाम आजही महाराष्ट्रांत दिसूं लागले आहेत. स्वधर्मासंबंधीं उदासीन व स्वसामर्थ्याविषयीं अविश्वासी, अशी आमची दिवसेंदिवस स्थिति होत चालली आहे. अशा समयीं ज्यांच्या हृदयस्पर्शी व झणझणीत शब्दांनीं पूर्वी एकदां महाराष्ट्राचे डोळ्यावरील मोहपटल दूर करून जनहृदयांत स्वधर्माभिमानाचे बीज पेरलें, त्या थोर विभूतींच्या शिकवणीचा विचार केल्यास पुन: आपणही तसेंच स्वधर्म व स्वदेश यांवर प्रेम करणारे बनूं, या बुद्धीनें श्रीतुकाराम महाराज यांच्या शिकवणुकीचा विचार करण्याचें आम्हीं योजलें आहे.

श्रीतुकाराम महाराज यांच्या अभंगांचा वाचकवर्ग फार मोठा आहे. हें विधान केवळ त्यांचा अनुयायी म्हणून समजला जाणारा जो ' वारकरी-समाज ' त्याजकडे पाहून आम्ही करतों असें नाहीं, तर वारकरी नसलेल्या समाजांतही–कट्ट्या ख्रिस्ती मिशनऱ्यापर्यंत–श्रीतुकोबा यांच्या अभंगांचा प्रसार व चहा फार आहे. महाराष्ट्रांत मराठी भाषा बोलणारा आणि ज्याचे तोंडांत एकाददुसरें श्रीतुकोबांचें वाक्य सांपडणार नाहीं, असा

मनुष्यच विरळा. प्रचलित भाषेशीं साम्य असलेली भाषा, मांडण्याची सुटसुटीत व जोरदार पद्धती, व साधारण मनुष्याच्या भूमिकेचें दिग्दर्शन करणाऱ्या विचारांची स्पष्ट रीतीनें मांडणी, यांमुळे इतर तत्समकालीन कवींपेक्षां श्रीतुकोबारायांचे अभंगांनीं लोकांच्या जिव्हेच्या ठिकाणीं अग्रस्थान पटकाविलें आहे.

पण या त्यांच्या सुलभतेनेच त्यांचे टीकाकारही बरेचसे आहेत. उंच सुळका पाहिला कीं त्याच्या गगनचुंबित टोकांकडे पाहून मनुष्याचें मन क्षणभर स्तिमित होतें, व तो त्याच्या तळाशींच उभा राहून तत्संबंधीं आश्चर्योद्गार काढीत असतो. उलटपक्षीं, गांवाच्या बाहेर लहानशी टेकडी असली कीं तिच्यावरून दोन चार वेळां मुलेंही सहज सहल करून येतात. हा जो उंच सुळका व टेकडी यांजमधील फरक, तोच फरक भाष्यकार श्रीमद् आचार्य अगर श्रीज्ञानेश्वर, व श्रीतुकोबा यांजमध्ये आहे. श्रीतुकोबाराय यांस बरीच वर्षे होऊन गेल्यामुळे त्यांच्या अभंगांसंबंधीं व शिकवणुकीसंबंधीं पुष्कळांनीं लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. तेव्हां ' निवडावे खडे । तरी दळण वाजें घडे ' या श्रीतुकोबाराय याच्या उक्तीस अनुसरून,प्रथमतः,ज्यांनीं ज्यांनीं श्रीतुकोबारायांविषयीं लिहिलें आहे, त्यांचीं श्रीतुकोबाराय यांच्या शिकवणुकीसंबंधानें काय मतें आहेत तीं मांडून, तीं श्रीतुकोबाराय यांच्या अभंगांतील शिकवणूक यथार्थ दाखवितात कीं काय हें पाहूं, व मग त्यांची शिकवण खरोखर काय होती यासंबंधीं खुलासेवार विचार करूं.

श्रीतुकोबा यांच्या संबंधानें विचार करणाऱ्या मंडळींचे आम्ही दोन वर्ग करतों; एक पाश्चात्य व एक पौरस्त्य. रे० जे० एफ् एड्वर्ड्स्, रे. टिळक, दि. शं. सावरकर वगैरे ख्रिस्तानुग्रहीत मंडळीचा पहिला वर्ग; ऐतिहासिक राष्ट्रप्रेमीमंडळ, प्रार्थनासमाज, वारकरीसमाज वगैरेंचा दुसरा वर्ग.

यांपैकीं पहिल्या वर्गाचें श्रीतुकोबा यांच्या शिकवणुकीसंबंधानें काय मत आहे तें पाहूं. त्यांच्यामतें श्रीतुकोबांचे अभंग म्हणजे ' ख्रिस्तचरणीं येण्याचा हा तुकानिर्मित उत्तम सेतु आहे. ' या सेतूवरून रे० टिळक हे ख्रिस्तचरणाचें सान्निध्य पावले व येशूच्या कळपांतील मेंढरांनीं प्रयत्न केल्यास या पुलावरून पुष्कळसे लोक ख्रिस्ताकडे आणणें शक्य आहे, व तसा त्यांचा उपयोग करण्याचा मि. सावरकर यांनीं आपल्या सहचरांस उपदेश केला आहे.

ख्रिस्ताच्या कृपेस पात्र न झालेल्यास अगर त्याच्या कृपेंतील लोकांचें साहचर्य प्राप्त होण्याचें भाग्य न लाभलेल्या महाराष्ट्रीयांस श्रीतुकोबांचे अभंग व येशू ख्रिस्त यांचा काय संबंध आहे व त्याचे अभंग हे ' ख्रिस्त चरणांशीं नेऊन सोडणारे ' सेतु कसे होतात, हें एक गौडबंगाल वाटण्याचा संभव आहे. या ख्रिस्तसेवकाच्या मतें श्रीतुकोबा हे पूर्ण अवस्थेस कधींच पोंचले नव्हते. विश्वाच्या बुडाशीं असलेली कोडीं त्यांना उमगलीं नव्हतीं व म्हणूनच त्यांच्या ठिकाणीं तळमळ व त्यांचे अभंगांत विसंगतता दिसून येते. परमानंद सेवन करण्याची सोय न लाभल्यामुळें आपण दुःखी, पापी, अशा तऱ्हेची जाणीव त्याच्यांत कायमची होती. व ती त्याच्या उद्गारांत ठिकठिकाणीं बाहेर आलेली आहे. ते म्हणतातः—

पतित पतित । परि मी त्रिवाचा पतित ॥१॥
अपराधाचा केलों । तुका म्हणे वांया गेलों ॥१॥
पापाची मी रासी । सेवाचोर पायापाशीं ॥१॥
इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलों नारायणें ॥१॥

अशा तऱ्हेचे आणखीही पुष्कळ उद्गार देतां येतील. त्याचप्रमाणें त्यांच्या शिकवणुकींतही विसगतता दिसून येते. श्रीतुकोबा (१) कधीं मूर्तिपूजा करावी म्हणतात, कधीं करूं नये म्हणतात; ( २ ) कधीं यात्रेस जावें म्हणतात, तर कधीं यात्रेस जाऊन काय होणार म्हणतात; (३) कधीं द्वैतच खरें म्हणतात, तर कधीं अद्वैत खरें म्हणतात.

( १ ) अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ।
प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धी जाणोनियां ॥१॥
कासया पाषाण पूजिती पितळ । अष्टधातु खळ भावेंविण ॥१॥
( २ ) जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाय ।
तंव तूं आपुलें स्वहित पाहें । तीर्थयात्रे जायें चुको नको ॥१॥
तीर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥१॥
( ३ ) अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥१॥
मूर्ती भगवद्भाव । मात्रा साहित जीव ॥१॥
अद्वैतीं तो ठाव । निरंजनीं एकला ॥१॥

तात्पर्य,त्यांचे अभंगांत सर्वत्र विसंगतताच दिसून येते. याचें कारण म्हणजे

अंतिम साध्याची अप्राप्ति हे होय. शिकवणुकींत विसंगतता व शेवटपर्यंत तळमळ, या दोन्ही गोष्टी ईश्वरपुत्र जो येशू ख्रिस्त त्याच्या शिकवणुकींत दिसून येत नाहींत. उद्धार पावण्यास जर मुख्य कोणची गोष्ट आवश्यक असेल, तर ती स्वतःच्या अपात्रतेची व पापीपणाची जाणीव ही होय, असें ख्रिस्ताचें मत आहे; व ती श्रीतुकोबाचे ठिकाणीं, वरील त्यांच्या उताऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें, दिसून येते. अर्थात्, हिचा उपयोग करून व श्रीतुकोबारायांना न उलगडलेल्या कोड्यांस येशूनें कशीं पूर्ण उत्तरें दिलीं आहेत, तीं दाखवून ख्रिस्तमताचा प्रसार करणें सोपें आहे, असें या कळपाचें मत आहे.

हे जे त्यांनीं श्रीतुकोबाचें हृद्गत लोकांपुढें मांडलें हें अगदीं अपुरें आहे. हें त्यांचें वर्णन, जाणूनबुजून म्हणा अगर वस्तुस्थिति न समजल्यामुळें म्हणा, यथार्थ स्थितीचें विपर्यास करणारें झालें आहे. साधूंत दोन प्रकार असतात. एक दुर्दमन जीं इंद्रियें त्यांचे जन्मतःच शास्ते असतात. त्यांच्यांत विकार व विचार यांची लढालढी, धक्काधक्की फारशी नसतेच. आरंभापासूनच ते या जगांत ' कामक्रोध बदरिखानीं देऊन इंद्रियांचे गोसावी ' असे निर्माण होतात. उलटपक्षीं दुसऱ्या प्रकारचे जे साधु असतात, त्यांच्यांत विकार व विचार यांचें तुंबळ युद्ध फार काळपर्यंत माजून राहतें. ' रात्रि दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ' अशी स्थिति बहुत काळ चालून, सरतेशेवटीं भगवंताच्या कृपेनें ' कामक्रोध लोभ निमाले ठायींचि । अवघी आनंदाची सृष्टी झाली ' अशा निर्धास्त स्थितीवर ते येतात. श्रीज्ञानदेव हे पहिल्या प्रकारच्या साधूंचें उदाहरण म्हणून देतां येईल, तर श्रीतुकोबा हे दुसऱ्या प्रकारच्या साधूंचे उदाहरण म्हणून देतां येईल; ' अंतर्बाह्य जग व मन ' यांतील संग्राम फार दिवस चालल्यामुळेच श्रीतुकोबा यांच्या अभंगांत पापाच्या जाणिवेचे, दुःखानुभवाचे अथवा दीनतेचे उद्गार पुष्कळ आढळून येतात, पण यावरून ते या साधक स्थितीच्या पलीकडे कव्हांच गेले नव्हते, असें सिद्ध होत नाहीं.

' अपराधाचा केलों । तुका म्हणे वांया गेलों '

म्हणणारे श्रीतुकोबाराय म्हणतातः—

मी वासुदेव तत्त्वता । कळों येईल विचारितां ॥१॥
तुका म्हणे पोटीं । देव घालूनि सांगे गोष्टी ॥१॥
आनंदाच्या कोटी । सांठविल्या आम्हां पोटीं ॥१॥

**ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥ १ ॥**
**घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मास्थिति सांडवीन ॥१॥**
**नाहीं शीण आम्हां झालें हें कवतूक । पुनीत हे लोक करावया ॥१॥**
**तुका म्हणे खातों आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्या रे तुम्हीं ॥१॥**
**आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाहला सोहळा अनुपम ॥१॥**
**म्हणविले मागें पुढें कैसें चाले । केला समरसें अभिषेक ॥१॥**
**एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनहात ध्वनी गगन गर्जे ॥२॥**
**तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनी उल्हासता सप्रेमता ॥३**

पुढें तर भगवंताने अभिषेक केलेल्या पट्टावर ते अधिकारूढ झाले तेव्हां खिस्त ज्याप्रमाणे " He that followeth me walketh not in darkness "असे म्हणतो त्याचप्रमाणे

**धर्म अर्थ काम झाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥१४॥**
**गाढवाचे घोडे । आम्ही करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥**

* * * *

**तुका म्हणे खळ । करूं समर्या निर्मळ ॥**

असें पूर्ण विश्वासाचें व दुसऱ्यासही तारून नेण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं वसत असल्याचे निदर्शक, असे त्याचे उद्गार बाहेर येऊं लागले. असल्या पूर्ण अवस्थेच्या निदर्शक उद्गाराकडे दुर्लक्ष करून केव्हांच चालणार नाहीं.

त्याचप्रमाणे त्यांचे अभंगांत विसंगतता दिसून येते, याचें कारण त्यांना आत्मप्रकाश लाधला नव्हता हे नव्हे. त्यांच्या अभंगांत दिसून येणारी विसंगतता ही वरवरची आहे. खोल दृष्टीनें पाहूं गेले असतां, त्यांचे अभंग हे एका सूत्राने ओवलेले, सुसंगत असे आहेत, असेच दिसून येईल. ती सुसंगतता दाखवणारें वाक्यच या लेखाच्या वरती उद्धृत केले आहे. वरपांगी दिसणाऱ्या विसंगततेचें कारण मुळांत विसंगतता आहे हें नव्हे, तर ते अभंग कोणच्या परिस्थितींत निर्माण झाले याचें वाचकांस अज्ञान आहे, हे होय.

त्यांचे अभंगांत एक ठशाची सारखी शिकवणूक दिसून येत नाहीं, याचीं कारणें दोन आहेत. एक तर श्रीतुकोबाराय हे प्रथमवयसाकाळींच कांहीं औपनिषदीय अद्वैत सिद्धांतावर आरूढ झालेले नव्हते, हें होय. त्यांचा आरंभ अगदीं द्वैतापासून—-

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥१॥
नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
काय करूं ब्रह्मज्ञान कोरडें । रितें मायेचें मापाडें ॥
भेटीविण कुडें । तुझिये अवघें मज वाटे ॥ १ ॥
जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं ॥१॥
होऊन शेवट—
गोडपणें जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ॥ १ ॥
आतां भजों कवणेपरी । देव सबाह्य अंतरीं ॥ १ ॥
अणोरणीया थोकडा । तुका आकाशा एवढा ॥ १ ॥
देखतां जे डोळे । रूप आपुलेचि खेळे ॥ १ ॥
पाहें तेथें पांडुरंग रखुमाइ । सत्यभामा राही जननिया ॥१॥
तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥१॥
तुजमज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥१॥
आम्ही जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव ॥
बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥१॥
संपादिलें बहुरूप । कैंचें पुण्य कैंचें पाप ॥१॥
नव्हतों आम्ही आप । आपणासी देखिलें ॥१॥
अशा पूर्णअद्वैतविचारात झाला आहे.

यामुळें अगदीं द्वैतापासून तों थेट पूर्ण अद्वैतापर्यंत त्याची जसजशी प्रगति होत गेली, त्या त्या भूमिकेवरचे त्यांचे निरनिराळे उद्गार आहेत. म्हणून त्यांचे भिन्न भिन्न उद्गार हे, त्यांच्या विचारांतील विसंगतता दाखवीत नसून, त्यांच्या प्रगतीच्या निरनिराळ्या भूमिका दाखवतात.

दुसरें असे कीं, श्रीतुकोबाचे अभंग हे खोलींत बसून दोन चार शिष्यांस सांगितलेलीं प्रवचनें अगर वर्तमानपत्राकरितां अथवा मासिकांकरितां लिहिलेले लेख अगर छापण्याकरितां तयार केलेल्या पुस्तकांतील काव्य, असें नसून निरनिराळ्या प्रसंगीं, निरनिराळ्या समाजासमोर केलेल्या कीर्तनांत त्यांना योग्य असा उपदेश करण्याकरिता केलेलें कवित्व आहे. ही एकच गोष्ट लक्षांत ठेवल्यास त्यांचे अभंगांत विसंगतता कां दिसून येते, हें स्पष्ट कळणार आहे. आमचे सरकारही आमच्या कौन्सिलांत गेलेल्या प्रतिनिधीविरुद्ध त्यांचीं दोन निरनिराळ्या वेळचीं व्याख्यानें पुढें करून त्यांजवर विसंगततेचा आरोप करतें.

त्यांस योग्य उत्तर म्हणजे येवढेंच कीं, ज्या दोन कालांत तीं व्याख्यानें दिलीं ते काल व ती परिस्थिति भिन्न होती. त्याचप्रमाणे श्रीतुकोबाराय यांचे अभंगात विसंगतता दिसन येते, याचें उत्तर येवढेंच कीं, ते अभंग भिन्न परिस्थितीतील, भिन्न दर्जाच्या लोकांस, भिन्न कालीं सांगितलेले आहेत. या सर्व गोष्टी लक्षांत घेता असें दिसून येईल कीं, तुकाराम महाराज यांचे अभंगात सुसंगतता आहे, पण ती, वरचें परिस्थितीचें आवरण काढून, निर्विकार मनाने पाहिली पाहिजे एवढेच.

येसू खिस्ताच्या कृपेतील कळपाचें श्रीतुकोबाराय याजसंबंधीं काय मत आहे. याचें आम्ही जरा स्पष्ट दिग्दर्शन केलें आहे. आम्हांस माहीत आहे कीं, आमच्या वाचकवर्गांतील फारच थोडे- बहुतेक नाहींच म्हटल्यास हरकत नाहीं--येशूच्या कृपेस पात्र झालेले अगर होऊं असणारे असतील. पण आम्हीं हे दिग्दर्शन केलें, याचीं कारणें दोन आहेत. एक तर आमच्या वर्गांतील कित्येक त्यांच्या मांडणीच्या शैलीस बळी पडण्याचा संभव आहे, व दुसरें व महत्त्वाचें असें कीं, परधर्मीय लोकांचे दीर्घ प्रयत्न कसे चाललेले असतात, हे आमच्या वाचकांचे नजरेस आणावें.

श्रीतुकाराम महाराज यांच्या शिकवणुकीचा विचार करणारा दुसरा वर्ग म्हणजे पौर्वात्यांचा. त्यांतील ' ऐतिहासिक मंडळा 'च्या मतें श्री तुकाराम महाराज यांची शिकवणूक काय आहे, त्याचा आतां विचार करूं.

या वर्गाचें मतांस एक प्रकारचें विशेष महत्त्व आहे. वरती ज्यांच्या मताचा विचार केला, ते पाश्चिमात्य लोक अगर त्यांचे अनुयायी, हे बोलून चालून परकीय. त्यांची संस्कृति भिन्न, त्यांचा धर्म भिन्न, अर्थात् आमच्या धर्मग्रंथाकडे पाहाण्याची त्यांची दृष्टि, मनुष्यस्वभावास अनुसरून लिहणें म्हटल्यास, केव्हांही सहानभूतीची अगर निर्दोष असूं शकणार नाहीं. शिवाय आमच्या ग्रंथांतील मर्महि त्यास कळणें केव्हांही शक्य नाहीं. या ऐतिहासिक मंडळाची स्थिति याहून अगदींच भिन्न आहे. ज्या देशांत हे अभंग निर्माण झाले, जो देश एकेवेळीं ह्या अभंगांनीं ईश्वरप्रेमाने भारून टाकला, व आजही ज्या देशांत ज्यास या अभंगांतील दहा पांच कडवीं माहीत नाहींत असा माणूस सापडणें विरळा, अशा या महाराष्ट्र देशांतच निर्माण झालेलें हे राष्ट्रप्रेमी ' ऐतिहासिक मंडळ ' आहे. एकाच हाडामांसाचे असल्यामुळे महाराजांचें हृद्गत यांस पाश्चिमात्यापेक्षां अधिक कळणें हे केव्हांही स्वाभा-

विक आहे. या सहजप्राप्त प्राधान्यापेक्षांही यांचे मतांस आणखी एका दृष्टीनेंही महत्त्व आहे. आपल्याकडेही महाराजांच्या अभंगाचा विचार करणारा मोठा वर्ग आहे व तो आपणांस तुकाराम महाराज यांचा शिष्यवर्ग म्हणवून घेतो आहे व आपल्या मगदुराप्रमाणें त्यांची शिकवणूक जिवंत ठेवण्याचा प्रयत्नही करीत आहे. पण या परंपरा चालविणाऱ्या वर्गाचें मतापेक्षाही या मंडळाचे मत अधिक विचारार्ह ठरणारें आहे. कारण हें मंडळ अभंगाकडे परंपरेमुळें अगर अंधश्रद्धेमुळें मंद झालेल्या दृष्टीनें न पाहतां, अर्वाचीन, शास्त्रशुद्ध, विचिकित्सक दृष्टीनें पाहण्याचा प्रयत्न करणारें आहे. अर्थात् या मंडळाचे मतास एक प्रकारचें असाधारण महत्त्व आहे. अशा या मंडळाचें महाराजांच्या शिकवणुकीसंबधानें काय मत आहे, तें आपण आतां पाहूं.

या मंडळाचें मत, वरील ज्या मताचा विचार केला, त्याहून अगदीं भिन्न आहे. दुर्दैवानें तुकाराम महाराज यांस येशूची दिव्य दृष्टि प्राप्त न झाल्यामुळें ' छिद्यन्ते सर्वसंशयाः ' अशी स्थिति त्यास कव्हांही प्राप्त झाली नाहीं, असें जरी त्या दिव्य दृष्टि प्राप्त होण्यास योग्य झालेल्या ख्रिस्तानुयायांस वाटत असलें, तरीपण महाराजांचें चरित्र अगर अभंग, यांपासून शिकण्यासारखें पुष्कळ आहे, निदान आत्मोद्धाराचा मार्ग आक्रमण करूं इच्छिणाऱ्यास कांहीं काळ तरी त्यांच्या शिकवणुकीचा उपयोग होईल, असेंच त्या कळपाचें मत आहे. या ' मंडळाचा ' निर्णय मात्र अगदीं भिन्न आहे. महाराजांच्या कवितेंतील कांहीं अश्लील भाग सोडून दिल्यास, त्यांची कविता मार्मिक व हृदयस्पर्शी, तींतील शब्द कसे वेचक व निवडून बसविलेल्या खड्यासारखे, रचनाही अल्पाक्षर, बह्वर्थ व सुटसुटीत; तात्पर्य, मनांत चाललेल्या खळबळीचे उद्रेक व्यक्त करणाऱ्या कवितेंतील ( Lyrics ) अति उच्च दर्जाची व प्रासादिक अशी त्यांची कविता आहे, असें या मंडळाचें मत आहे. पण यानंतर जर आपण त्या कवित्वांतून निघणाऱ्या उपदेशाच्या दृष्टीनें त्या कवित्वाकडे पाहूं लागलो, तर या कवित्वासारखें देशबुडवें कवित्व दुसरें सांपडणार नाहीं, असा या मंडळाचा त्यासंबंधानें निश्चित अभिप्राय आहे.

येथें असा साहजिक प्रश्न उत्पन्न होतो कीं, ' संसाराच्या नांवें घालूनियां शून्य । वाढता हा पुण्य धर्म ' करणाऱ्या या महात्म्याच्या शिकवणुकींत देशबुडविणारें, अगर देशहितविघातक असें काय आहे ? या देशभक्त व चिकित्सक मंडळाचे जे लेख व व्याख्यानें प्रसिद्ध झालेलीं आहेत,

त्यांचा जर विचार केला, तर साधारणरीत्या आपल्या मताचे समर्थनार्थ त्यांच्याकडून खालील पुरावे मांडण्यांत येतात, असें म्हटल्यास हरकत नाहीं.

यांचा पहिला मुद्दा असाः— तुकाराम महाराजांनीं लोकांना दैववादी बनविले. 'असेल माझा हरि । तर देईल खाटल्यावरी ' अशी त्यांची शिकवणूक व आचरण होते. त्यांच्या अभंगांत,

**प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान**
**प्रारब्धा हातीं जन । सुख शीण पावतसे ॥ १ ॥**
**होणारा ऐसी मिळे बुद्धि । नेदी शुद्धि धरूं तें ॥ ? ॥**
**अन्न मान धन । हें तों प्रारब्धाआधीन ॥ १ ॥**
**ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ १ ॥**
**वाहिल्या उद्वेग दुःखाचि केवळ । भोगणें ते फळ संचिताचें ॥ १ ॥**

अशा तऱ्हेची, मनुष्यास प्रयत्नापासून परावृत्त करणारी, किती तरी प्रमाणे आहेत. मनुष्य हा स्वाभाविक आळशी, आणि त्यांत धन वगैरे सर्व गोष्टी प्रारब्धामुळेंच मिळणाऱ्या आहेत, तूं प्रयत्न करूनही तुला मिळेलच असें सांगतां येत नाहीं, येवढ्याकरितां असला प्रयत्न सोड व आपला स्वस्थ ' हरिहरि ' म्हण, असलें सांगणारा गुरु भेटला, म्हणजे तुकारामबोवांनींच म्हटल्या प्रमाणे ' आधींच आळशी । वरी गुरूचा उपदेशी ' अशी स्थिति होणार; व अशीच आमच्या देशाची आज दीडशें वर्षे यांच्या शिकवणुकी मुळे स्थिति झालेली आहे. तात्पर्य, या तुकाराममहाराजांच्या शब्दाने 'महाराष्ट्रांतील लोक' सुदैवाने अगर दुर्दैवाने प्रयत्नाच्या वाटेवरून मुरडून दैववादाकडे वळले व अंधभक्तींत गढून जाऊन ' कार्यविन्मुख ' झाले.

त्यांच्या शिकवणुकींतील देशहितविघातक दुसरें तत्त्व म्हणजे ' क्षण-भंगुरवाद ' हा होय. तुकारामबुवा, सर्व जग माया आहे, सर्व वस्तु नाशवंत आहेत, असला ठिकठिकाणीं उपदेश करतात.

**नाशवंत देह जाणार सकळ ।**
**आयुष्य खातो काळ सावधान ॥ १ ॥**
**क्षणभंगुर हें जाय न कळतां ।**
**ग्रासागिळी सत्ता नाहीं हातीं ॥ १ ॥**
**अवघाचि आकार ग्रासियेला काळें ।**
**एकाचि निराळें हरिचें नाम ॥ १ ॥**

असल्या उपदेशानें लोक निराशावादी, निवृत्तिमार्गी बनतात; व ऐहिक सुखाचा सर्व प्रयत्न सोडून देतात. या क्षणभंगुरवादाचा परिणाम सर्व लोकांत ' निरुत्साही फकीरी ' उत्पन्न करण्यांत होतो; व तो तसा येथें झाला. आपलें जाडेंभरडें वस्त्र पांघरावें, मिळेल ते गोळाभर अन्न पोटांत घालून जठराग्नीची शांती करावी, व खुशाल टाळ कुटीत बसावें, अशीचें लोकांची प्रवृत्ति झाली. अर्थात् सर्व ऐहिक वस्तु नाशिवंत झाल्यावर त्यांच्या प्राप्तीकरतां प्रयत्न करणेंच खुंटलें. तात्पर्य, लोकांस यांनीं ' निवृत्तिमार्गी ' बनवलें.

याच प्रकारचें तिसरें व शेवटचें तत्त्व म्हणजे, त्यांनीं निवृत्तिमार्गीतलाच कां होईना, पण सांगितलेला अंधश्रद्धेचा मार्ग. उपासनाच करावयास लोकांना लावावयाचे होतें, तर ' मासितुण ' अशा श्रीरामचंद्राची अगर राक्षसकुलें हनन करणाऱ्या वातात्मज हनुमंताची उपासना तरी करावयास लावावयाचें होतें. या सर्व उपास्यदेवता सोडून दासाप्रमाणे ' कटिकर ' असलेलें हें विठ्ठल दैवत, याचीच उपासना प्रसृत केली व लोकांस निःसत्त्व, क्लीब बनवलें. तात्पर्य, या टाळकुट्या संताळ्याच्या अग्रणींच्या उपदेशाचा परिणाम लोकांना निराशावादी व दैववादी बनविणारा झाला व आज आमच्या देशातील लोक परदास्यांत खिचपत पडले असतांही मुक्ततेच्या मार्गाचा अवलंब करीत नाहींत, याचें कारण असली नित्य चाललेली शिकवणूक हेंच होय. असल्या या देशहितविघातक शिकवणुकीस जितक्या लवकर मूठमाती मिळेल तितकी बरी.

असो, त्यांचे मत कशा प्रकारचें आहे, हें थोडक्यांत सांगितलें; आतां हें त्यांचे मत सत्यान्वेषणाचे व चिकित्सेचे कसोटीस कितपत उतरतें, तें पाहूं.

या मंडळानें महाराजांच्या शिकवणुकीचें जें दैववादी व निराशावादी तात्पर्य काढले आहे, त्यावरून एक गोष्ट मात्र अगदीं स्पष्ट होते; ती ही कीं या मंडळास श्री तुकाराम महाराज यांची मनोरचनाच समजली नाहीं. वारकरी हा गबाळ्या, व आकाशांतील तारांकडे पाहून चालतांना वाटेने विहिरींत पडणाऱ्या एका ग्रीक तत्त्ववेत्याप्रमाणें अव्यवहारी, अतएव जगदृष्ट्या बावळट व दुर्बल असा असायचाच; व तुकारामबोवा हे वारकरी पंथाचे शिरोमणी, तेव्हां तेही असेच असले पाहिजेत, अशी भ्रामक कल्पना मनांत ठेऊन श्री-तुकारामबोवांचे अभंग वाचल्यामुळे या मंडळाची अशी दिशाभूल झालेली

दिसते. येऱ्हवीं निर्विकार मनाने श्रीतुकारामबोवांच्या सर्व अभंगांकडे पाहिलें तर 'तुकोबा' हे स्वाभिमानी—अर्थात योग्य स्वाभिमानी—व इतरांसही आपला मान राखून कर्तव्य करण्यास शिकवणारे असले पाहिजेत असे दिसतें. इतरांच्या अभंगांपेक्षां बुवाचे अभंगांचा हा विशेष आहे कीं, त्यांत अगदीं कांटेतोल न्यायाची भाषा असते. उदाहरणार्थः—

तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ १ ॥
दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचे ॥ १ ॥
तुका म्हणे त्याचे । पाप नाहीं ताडनाचें ॥ १ ॥
मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
विधीनें सेवन । विषय त्यागातें समान ॥ १ ॥

अशीं शेकडों उदाहरणे देतां येतील.

श्री तुकारामबोवा यांचे पुष्कळसे अभंग त्यांचे उपास्य दैवत श्रीपांडुरंग यांच्याशीं संभाषणात्मक असल्याने, त्यांच्या अभंगांचे खरें मर्म पुष्कळ वेळां डोळ्यापासून दूर रहातें. देवाशीं सलगीची भाषणें अगर प्रेमाचे भांडण, यांवर जे अभंग आहेत, त्यांत देवाशींही या भक्तशिरोमणीने प्रसंगविशेषीं न्यायाची व सडेतोडपणाची भाषा वापरण्यास कमी केले नाही. असला मनुष्य स्वतः बावळट अगर दुर्बल असेल अगर इतरांस क्लीबत्वाचेच धडे देत असेल, अशी कल्पना करणें, हे मनुष्यस्वभावाची आपणास पारख नाहीं असे दाखवण्या-सारखे आहे. तात्पर्य, सामान्यतः या मंडळाच्या अभिप्रायासंबंधाने असें म्हणतां येईल कीं, हे मंडळ, 'धर्मरक्षावयासाठीं। करणें आटी आम्हांसी' असे म्हणणाऱ्या श्री तुकारामबुवांच्या अंतरंगांत शिरलेच नाहीं व जेथे शिरले, त्या ठिकाणीं दूषित दृष्टीने पाहिल्यामुळे त्यास सत्य दिसलेच नाहीं. असो. आतां त्यांच्या एकेक मुद्याचा विचार करूं.

त्यांचा पहिला मुद्दा असा कीं, श्रीतुकारामबुवा यांनीं लोकांस यत्नेश्वराचे उपासक बनवण्याच्या ऐवजीं, त्यांस दैववादी, हताश, व निरुत्साही बनवलें—निदान लोकांस तसे बनण्यास ज्या वाङ्मयाची मदत झाली,—त्यांतील अग्र-स्थान बुवांच्या अभंगास द्यावे लागेल. या आक्षेपांतील उत्तरार्धाचा विचार करण्याचें कारण नाहीं. कारण त्यावरून श्री तुकारामबुवांस या परिणामाबद्दल साक्षात जबाबदार धरतां येईल असे आक्षेपकासच वाटत नाहीं असे दिसतें.

श्री तुकारामबुवांवर दैववादाचे आक्षेप आणणारे, मुख्य एक गोष्ट विसरतात. दैववाद हा व्यवहाराचे प्रगतीस जसा घातुक आहे, तसाच तो परमार्थाचेही प्रगतीस घातुक आहे. व्यवहारांत, त्याचप्रमाणे परमार्थमार्गांतही दैववादाचा उपयोग करतां येतो, व पुष्कळ लोक तसा करतात, ही गोष्ट श्रीतुकारामबुवा यांस माहित नव्हती असे नाहीं. ते म्हणतात "भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥" अर्थात् दैववादाचा हा उपयोग—दुरुपयोग माहीत असूनही ते लोकांस दैववादच शिकवीत राहते तर ते त्यांचें करणे आपल्या पायांवर आपणच धोंडा पाडून घेण्याइतकें तात्त्विकदृष्ट्या वेडगळपणाचें झालें असते. सिसिली देशांत ॲबडेरा गांवीं इसवी सनापूर्वी चारशे वर्षे प्रोट्यागोरास या नांवाचा एक मोठा वाक्पटु, चलाख, नास्तिक तत्त्ववेत्ता ( Sophist ) होऊन गेला. त्याचा धंदा पैसे घेऊन लोकांना नीति, तत्त्वज्ञान व कलाकौशल्य शिकवून हुशार करून सोडणे हा होता; व तो हे शिकवण्याकरितां आपले गांव सोडून या गांवाहून त्या गांवास असा नित्य हिंडत असे. 'मनुष्य हाच सर्व वस्तूंचें प्रमाण आहे.' ( Man is the measure of all things ) असा त्याच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धांत होता. बरेवाईट, सत्यमिथ्या, वगैरे ठरवण्याची कसोटी म्हटली म्हणजे प्रत्येक मनुष्याचें मनच होय, अशा अर्थाचा जो वरील सिद्धांत, तो तो सर्व लोकास सांगत असे. यावर प्लेटो नांवाच्या जगविख्यात ग्रीक तत्त्ववेत्त्यानें आपल्या 'थिॲटिटस' नांवाच्या संवादांत केलेली टीका, अत्यंत मार्मिक व लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्यांतील एक मुद्दा असा आहे कीं, जर प्रत्येक मनुष्याचें मन हेंच बरेंवाईट ठरवण्याची कसोटी आहे, तर प्रोट्यागोरास हा आपलें घरदार सोडून लोकांना तत्त्वज्ञान, नीति वगैरे शिकविण्याचे परिश्रम कां करता ? त्याचप्रमाणें श्रीतुकारामबुवा यांनीं सरास दैववादाचाच उपदेश केला असता, तर एकाद्या चाणाक्ष श्रोत्यानें त्यांना विचारलें असतें कीं "महाराज, दैववादच जर सत्य आहे तर आपण जागरणें करून हाडाची काड करून रक्त ओकीपर्यंत हे उपदेशाचे श्रम फुकट कां करतां ?" व हे त्या श्रोत्याचें विचारणें अयोग्यही न ठरतें. तात्पर्य, तुकारामबुवा, सारखा दैववादच शिकवीत राहिले असें मानलें तर, हा दैववादाचा बाण आपल्यावरच फिरेल. हे न कळण्याइतके श्री तुकारामबोवा अज्ञानी होते असें समजावें लागेल. पण त्यांच्या अभंगांच्या जोरदार वाणीवरून व

त्यांची जीं स्पष्ट वचनें यासंबंधीं आहेत त्यांवरून, ते असे अज्ञानी बुवा होते, अगर असला दोहीं लोकीं घातुक दैववाद त्यांनीं शिकवला, असला निष्कर्ष काढायला त्याच्या अभंगांत फारशी जागा नाहीं, अशी या लेखकांची समजूत आहे. दैववादी कांहीं वाक्यें आहेत, पण त्यांच्या तोडीस तोड, किंबहुना सरस व दैववादाची व प्रयत्नवादाची सुंदर सांगड घालणारीं, अशींच पुष्कळशीं वचनें आहेत.

आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित ॥
तरी मी नष्टचि पतित । तुका म्हणे संत मज हांसती ॥ १ ॥
एकीं केली हातोफळी । ठाया बळी पावले ॥ १ ॥
येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड ॥
उठा उठीं गोड । बीजें बीज वाढवी ॥ १ ॥
देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनिया नाश उपाधींचा ॥१॥
हातीं हित आहे करील तयासी । म्हणऊनि ऋषीं सांगितलें ॥१॥
सायास केलियावांचूनि तें कांहीं । भविष्यावरी पाहीं घालूं नये ॥१॥
म्हणसी नाहीं रे संचित । न करी न करी ऐसी मात ॥१॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥१॥
ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥१॥
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंचि वरी ॥१॥
दोरें चिरा कांपे पडिला कांचणी । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥१॥
भविष्य न सुटे भोगिल्या वांचूनि । संचित जाणोनि शुद्ध करा ॥१॥

अशींच आणखीही वाक्यें देतां येतील. या उद्धृत वाक्यांत शेवटचें कडवें विशेष अर्थभरित आहे. यांत दैव व प्रयत्न यांची संगति लावली आहे. दैववादावरच भिस्त ठेवून प्रयत्न करणें अवश्य आहे, असें श्रीतुकारामबुवा यांत सांगत आहेत. पुढें तुझें जें संचित होणार तें तूंच आज करणार आहेस, आज जें तूं भोगतोस हें तुझ्याच मागील कृत्यांचें फळ आहे; येवढ्याकरितां पुढची जबाबदारी ओळखून आज तूं उत्तम कर्म कर, असा त्यांचा उपदेश आहे. दैववादाचाच उपयोग प्रयत्नवाद शिकविण्यास करितात, यावरून ते हताश दैववादी होते, कां उत्साहपूर्ण प्रयत्नवादी होते, याचा विचार करण्याचें आम्हीं वाचकांवरच सोंपवितों.

जर श्री तुकारामबुवा हे प्रयत्नवादी होते व प्रयत्नवाद शिकवीत होते असें तुम्ही म्हणतां, तर श्री तुकोबा यांच्या अभंगांत दैववाद शिकविणारीं वाक्यें आहेत त्यांची वाट काय ? असा कोणी साहजिक प्रश्न करील. त्यावर उत्तर असें आहे कीं, एकतर दैववाद हा कर्तव्याकरितां सांगितलेला नव्हे, तर तो भोगाकरितां सांगितला आहे. श्री तुकारामबुवा हे कर्तव्य दैवाधीन आहे असें केव्हांही म्हणत नाहींत. मनुष्यानें योग्य प्रयत्न केल्यावर त्याचें अमुकच फल येईल, असें सांगतां येत नाहीं—अर्थात् तें दैवावरच आहे; तूं तिकडे लक्ष देऊं नकोस; तूं आपलें कर्तव्य कर, असाच त्यांचा उपदेश आहे. श्रीतुकारामबुवा हे पुढील अभंगाचे कडव्यांत 'करणें तें फळ संचिताचें' असें म्हणत नाहींत. ते म्हणतात, "वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ। भोगणें तें फळ संचिताचें ॥ १ ॥

दुसरें, प्रत्येक थोर विभूति-जोंपर्यंत ती आपल्या मनुष्यत्वास विसरली नाहीं तोंवर-एका अर्थानें दैववादी रहाणारच. कारण जगताच्या बुडाशीं एक अचिंत्य व सर्वशक्तिमान् अशी शक्ति आहे व तिच्या सत्तेनें हीं सर्व सूत्रें चालत असतात, ही जाणीव त्या विभूतीस जितकी असते, तितकी, ज्यांनीं कांहींच कार्यें अंगावर घेतलीं नाहींत अशा सामान्य मनुष्यास केव्हांही असणार नाहीं. श्रीतुकारामबुवाही अशाच रीतीनें दैववादी (Divine determinist) होते. तात्पर्य, "श्रीतुकारामबुवा हे दैववादी व निराशावादी होते व ते दुसऱ्यासही तसेंच शिकवीत" असें म्हणणारें मंडळ त्यांच्या अंतरंगापर्यंत प्रवेश करूंच शकलें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें.

राष्ट्रीय मंडळाचा दुसरा मुद्दा म्हणजे. "श्रीतुकोबांनीं लोकांस देहाचें क्षणभंगुरत्व अथवा नश्वरत्व पढवून निराशावादी अथवा कार्यविन्मुख बनविलें. जर मूळांत शरीरच नश्वर आहे व जीवित हें 'नलिनीदलगत जलमतितरलं' प्रमाणें अतिशय चपल आहे, अगर 'माशी पांख पांखडी तंव हें सरे' असलें क्षणभंगुर आहे, तर धन व ऐहिक ऐश्वर्य वगैरे सर्व जोडून उपयोग तरी काय ? पिंडाएवढा जो कांहीं ग्रास मिळेल तो खावा व स्वस्थ 'हरि हरि' म्हणत बसावें; अशा तऱ्हेचा जिचा परिणाम प्रयत्नपराङ्मुख आहे, अशी महाराजांची शिकवणूक होती." परंतु क्षणभर विचार करून पाहिलें तर श्री तुकोबारायांची शिकवणूक अशी खात्रीनें नव्हती, हें उघड होणारें आहे.

श्रीतुकोबांनीं देहाचें नश्वरत्व व क्षणभंगुरत्व लोकांचे मनांवर बिबविण्याचा प्रयत्न केला, ही गोष्ट खरी आहे; पण त्याचा अर्थ सर्वांनीं व्यवहार सरास सोडून द्यावाच,असाच केवळ नव्हता. त्यांना मनुष्यांना आपले कर्तव्य लवकर करण्यास तयार करावयाचें होतें. त्यांनीं अभंगांत देहाचें नश्वरत्व व क्षणभंगुरत्व जेथें जेथें सांगितले आहे, तेथें तेथें असें दिसून येईल कीं, त्यांचे हे सांगणें, केवळ सर्वांनीं आत्महित साधून घेण्यास बिलकुल विलंब करूं नये, येवढे चित्तांत ठसविण्याकरितां होय. अशा स्थितींत मनुष्यास 'कल''कल' मत कहिये, कल कालके हात ' असे शिकवण्याखेरीज दुसरा कोणताच मार्ग नव्हता, व तोच श्री तुकोबारायांनीं स्वीकारिला. त्याचा आम्हीं कालांतरानें कांहींच न करण्याकडे उपयोग केला तर, हा दोष महाराजांचा नसून, जी बाह्य परिस्थिति निर्माण झाली, त्यापासून उत्पन्न झालेल्या शैथिल्याचा आहे.

मंडळाचा तिसरा मुद्दा असा आहे कीं, त्यांनीं लोकांस जो कर्तव्यकर्म म्हणून मार्ग दाखविला, तो अंधश्रद्धेचा व क्लीबत्वास मदत करणारा असा आहे. श्री पांडुरंगाची उपासना करणारे वारकरी कोणत्या भावनेने ती उपासना करितात, हे न समजल्यामुळे असल्या तऱ्हेचे आक्षेप पुढें येत असतात. श्रीपंढरीश पांडुरंगाची ' कटिकरविराजित ' असलेली मूर्ति ही दास्यत्वाची खूण नसून, आपले भक्तांस भवाब्धि हा कमरेइतक्या पाण्यासारखा तरुन—चालत—जाण्यास सुलभ आहे, अशी भक्तांस खात्री पटवणारी खूण आहे. श्री ज्ञानोबाराय म्हणतात:—

' करा विठ्ठलस्मरण । नामीं रूपीं अनुसंधान ।
जाणोनि भक्तां भवलक्षण । जघन प्रमाण दावितो ॥ १ ॥ '

' प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां, नितंबः कराभ्यां धृतो येन तस्मात् । '
शंकराचार्यकृत पांडुरंगाष्टक.

उपासना ही भावनेवर अवलंबून असते. श्री तुकोबाराय याच मूर्तीच ' घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करीतो ॥ १ ॥ भक्तां राखे पायापाशीं । दुर्जनाशीं संहारी ॥ २ ॥ ' ' दैत्या काळ भक्ता मेघश्याम मूर्ति ' असें वर्णन करितात. यावरुन या उपासनेत व दैवतांतही क्लीबत्व व दास्यत्व आणण्यासारखे कांहीं नाहीं, हे उघड आहे.

राहून राहिला आक्षेप अंधश्रद्धेचा. कांहीं लेखकांची मजल तर त्यांच्या भक्तांस अंधश्रद्धाळू व मूर्ख म्हणण्यापर्यंतच न थांबतां, 'आपल्या वह्या पाण्यांत श्रीपांडुरंग रक्षण करील, मेलेलें मूल तो उठवील, जी गोष्ट अभिमन्यूकरितांही देवांनीं केली नाहीं ती तो भक्ताकरतां करील, असे आजपर्यंत कधीं न घडलेले प्रसंग तो घडवून आणील' अशी खुळी अंधश्रद्धा श्रीतुकोबाराय आपल्या उराशीं बाळगून बसले होते, असें म्हणण्यापर्यंतही गेली आहे. हा मुद्दा जरा विशेष महत्त्वाचा आहे. तुकारामबुवा हे स्वतः 'समंजसश्रद्धावादी' होते. लोकांना त्यांनीं अंधश्रद्धेचा मार्ग शिकविला नाहीं, हे त्यांनीं ढोंगी गुरुमार्गावर केलेल्या टीकेने, छांछू, टाणा-टोणा वगैरेंच्या केलेल्या कडक निषेधाने व 'स्वतः अनुभव घेऊन पहा व मग बोला' या त्यांच्या शिकवणीने स्पष्ट होणारें आहे. आतां राहिली देवाच्या कर्तृत्वासंबंधींची शंका. ह्या बाबतींत श्रीतुकोबांचा देवावर, मुलाचा आईवर जसा विश्वास असतो, तसाच विश्वास होता, यांत कांहीं शंका नाहीं. अभिमन्यूकरितां कांहीं कारणास्तव कदाचित् देवाने एकादी गोष्ट केली नसेल; पण पुराणांतून देवांनीं आज अशक्य समजलेल्या अशा हजारों गोष्टी केल्याचीं वर्णनें आहेत, हें पुराणें वाचणारांस स्पष्ट दिसणारें आहे. द्रौपदीचीं वस्त्रें होणें, प्रल्हादास विष दिलें असतां व अग्नींत टाकलें असतां तो जळून न मरणें, सांदीपनीचे मेलेलें मूल परत आणून देणें वगैरे गोष्टींचीं पुराणांनीं वर्णनें लिहिलेलीं आहेत, व तुकारामबोवांनींही देवास कांहींच अशक्य नाहीं याच भावनेनें तिकडे पाहिलें असलें पाहिजे. वास्तविक 'अशक्य' हा शब्द सापेक्ष आहे. आमच्या सांप्रतच्या ज्ञानाला अगम्य, येवढाच त्याचा अर्थ आहे. सृष्टिनियम याचा अर्थही आपल्या अनुभवावरून जास्तींत जास्ती उपयोगीं पडणारे असे आम्हीं ठरविलेले 'साधारणसिद्धान्त' एवढाच आहे. तेवढ्यावरून या साच्यांत जे येत नाहीं ते करणें परमेश्वरास अशक्य आहे असें मानणें म्हणजे जगांत चाललेल्या अतर्क्य घडामोडींचें 'सर्वज्ञत्व,' व जनकत्व याचा मक्ता अल्प मानवी प्राण्यानें आपल्याकडे घेण्याचें धाडस करण्यासारखें आहे. याचा अर्थ असे चमत्कार उठल्यासुटल्या मनुष्य करूं शकतो असा सर्वांचा विश्वास असावा अगर तुकारामबोवांचा तसा होता, असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं. परंतु आपल्यास एक कोडें उकललें नाहीं

**दोन्ही टिपरी एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ।**
**कुसरी अंगें मोडतील परी । मेळविती एका एक छंद रे॥१॥**
**एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण ।देवभक्तपण स्वामी सेवा॥**
**अभेदूनि भेद राखियेला अंगीं ।वाढावया जगीं प्रेमसुख ॥१॥**

तात्पर्य, अद्वैतानुभव प्राप्त झाल्यावरही श्रीतुकारामबुवा शेवटपर्यंत सगुणोपासक होते हे वरील कडव्यावरून स्पष्ट दिसणार आहे. ते स्वतः म्हणतातः—

**सकल जीवांमाजीं देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ ॥ १ ॥**

**जीवन्मुक्तज्ञानी जरी झाले पावन । देवतीर्थभजन न सांडिती ॥१॥**

त्यांच्या अंतकालपर्यंत चालू असलेल्या सगुणोपासनेचा पुरावा पाहिजे असल्यास तो त्यांचे अभंगांतच भरपूर सांपडणारा आहे. त्यांचे निर्याणाचे म्हणून जे अभंग प्रसिद्ध आहेत त्यांत—

**" शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ १ ॥**
**पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥ १ ॥**
**आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा ॥ २ ॥**

अशा सारखे सगुणप्रेमांत रंगलेल्यासच स्फुरणारे उद्गार आढळून येतात. असो; भक्त हा देवास ओळखतो व सगुण व निर्गुण दोन्ही तोच आहे हे जाणून स्वस्थ बसतो व आपल्या भक्तिसुखाचा आनंद आपणच उपभोगीत राहतो.

**कीं भक्तिसुखालागीं । आपणपें दोहीं भागीं । वांटूनियां अंगीं । सेवकै बाणें ॥ येरा नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी । नभजतिया दावी । योगिया जे ॥**

ज्ञानेश्वरी अ. १२

अशाच अनुभवाचे हद्दीवर श्रीतुकारामबुवा पोंचले होते व शेवटपर्यंत ते पंढरीचे वारकरी राहिले, हे त्यांच्या अभंगांवरून स्पष्ट कळून येईल.

दुसरा मुद्दा जातिभेदाचा. तुकारामबुवांची दृष्टि, मुख्य साध्य जी देवप्राप्ति त्यावर आरूढ झालेली असल्यामुळे, त्यांस जातगोत यास अवास्तव महत्त्व देणे केव्हांही पसंत नव्हतें. पण याचा अर्थ त्यांस सर्व वर्ण एक व्हावेत असे

वाटत होतें, अगर तसें करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, असें अनुमान काढणे, हे उपलब्ध पुराव्याच्या बाहेर निकाल देण्यासारखें आहे. भक्तींत–भगवद्विषयक प्रेमांत–जातीचा, व्यक्तीचा व लिंगाचा विचार कमी किमतीचा आहे ही गोष्ट खरी. पण त्यावरून व्यवहारकालींही जातिबंधनें तोडावींत असेंच त्यांस वाटत होतें हें कसें सिद्ध होणार ? यावर कोणी म्हणेल कीं, श्रीतुकारामबुवा व्यवहार व तात्त्विक सिद्धांत यांत भेद करीत होते काय ? होय. व्यवहाराकरतां मूळ न सोडतां भेद करणें अवश्य आहे व ते तसा करीत होते, हें खालील उदाहरणावरून कळून येईल. 'हरिव्यापक सर्वगत' ही परमेश्वराची व्यापकता माहिती असूनही श्रीतुकोबा—

**"यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कार्याकारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ १ ॥"**

असे व्यवहारांत भेद केले पाहिजेत असें स्पष्ट म्हणतात; येवढेंच नव्हे तर ठिकठिकाणीं आपण तसा करतो असेंही ते स्पष्ट म्हणतात.

**जग देव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ १ ॥**
**परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनि ॥ १ ॥**

तात्पर्य, ज्याप्रमाणें अद्वैतसिद्धान्त अनुभवूनही व्यवहारांत द्वैत करणें अवश्य आहे, त्याचप्रमाणे भक्तींत 'जाति व्यक्ति पडे बिंदुले' ही गोष्ट जरी खरी असली तरी व्यवहारांत कार्यापुरता जातिभेद करणें अवश्य आहे; व हा वेदविहित जातिभेद अवश्य पाळला पाहिजे, असें सांगणारीं त्यांचीं पुष्कळ वचनें आहेतः–

**शिखासूत्र तुझा गुंतला जमान । तंव वरि तूं जाण श्रुतिदास ॥१॥**
**कुळधर्मे ज्ञान कुळधर्मे साधन । कुळधर्मे निधान हातीं चढे ॥ १ ॥**
**तुका म्हणे मन उन्मन जों होय । तोंवरी हे सोय विधी पाळी ॥१॥**

तिसरा पौरस्त्यांतील श्रीतुकोबांच्या शिकवणुकीचा विचार करणारा वर्ग म्हणजे 'पंढरीच्या वारकऱ्यांचा'. या पंथांत श्रीतुकारामबुवांची शिकवणूक बहुतेक अंगांनीं जागृत ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत येत आहे. पण यांतही बुवांच्या शिकवणुकीचा विपर्यास करणारा अल्पसा वर्ग आहेच. पाणी स्वच्छ असले तरी त्याला रोज स्वच्छ करणारा मनुष्य नसला म्हणजे त्यांत जसे

शेंवाळ वाढते, तसे या वर्गांतही एका बाजूला श्रीतुकारामबुवांच्या शुद्ध शिकवणुकीवर आच्छादन घालणारा असा वर्ग निर्माण झालेला आहेच.

या वर्गाचा सर्व भर, श्रीतुकोबांनीं केलेल्या भगवन्नामाच्या सामर्थ्याचे वर्णनपर अभंगांवर व व्यसनी, फंदी, लोकांस शुद्ध आचरणावर आणण्याकरतां केलेल्या उपदेशावरच आहे.

**चाल केलासी मोकळा । बोले विठ्ठल वेळोवेळां ॥१॥**
**तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥२॥**
**दुराचाऱ्या मोक्ष सुखाची वस्ती । भोळी बाळमूर्ति पांडुरंग॥ १ ॥**

या वचनांचा ते अर्थ असा करतात कीं, वाटेल तसें आचरण करावें व एकदां पंढरपुरला जाऊन श्रीपांडुरंगाच्या पायांवर मस्तक ठेवून 'क्षमस्व' म्हटलें कीं आपण सर्व पातकांतून मुक्त झालो. तोडानें नाम घेतलें व वारी केली कीं इंद्रियें मोकाट सोडलीं तरी चालतील. तात्पर्य, पंढरीची वारी करणें व नाम घेणें येवढें केलें कीं, मग बाकी कांहींही करावयास मोकळीक, मोक्ष आपला ठेवलेलाच आहे.

"वैराग्याची निष्ठा प्रकटुनि दाखविली" असे रामेश्वरभट्टानें ज्यांचें वर्णन केलें व वैराग्याचे जे केवळ मूर्तिमंत पुतळे श्रीतुकोबा, ते असा उपदेश करतील हे संभवत नाहीं. त्यांचा हाच जर उपदेश खरा, तर खालीं दिलेले व असेच शेंकडो देतां येण्यासारखे जे त्यांचे उद्गार आहेत त्यांची वाट काय?

**साधनें तरी हींच दोन्ही । जरी कोणी करील ॥ १॥**
**परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ॥ २ ॥**
**इंद्रियांसीं नेम नाहीं । मुखीं राम म्हणोनि काय ॥ १ ॥**
**जेवी माशीसवें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २ ॥**
**हीं तों अंगीं नाहीं चिन्हें । गाईलें वेश्येच्या ढङ्यानें॥ ३ ॥**
**करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ १ ॥**
**तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधु तोडोनियां ॥ २ ॥**
**हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे॥१॥**
**अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥ १ ॥**
**परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥ २ ॥**

हीं उद्धृत केलेली कडवीं श्रीतुकारामबुवांचे नीति व परमार्थ यांच्या संबंधांत काय मत होतें हें स्पष्ट दाखवतील.

यावर पुन: अशी शंका येईल कीं, जर ते इतके आचाराच्या बाबतींत कडक होते तर 'चाल केलासी' सारखीं वचनें त्यांचे अभंगांत आढळून तरी कां येतात? या शंकेचें उत्तर मागें पाश्चात्य टीकाकारांच्या एका शंकेचा विचार करतांना दिलेल्या उत्तराप्रमाणेंच आहे. श्रीतुकारामबुवांचे अभंग हे निरनिराळ्या व्यक्तींस निरनिराळ्या परिस्थितींत केलेले उपदेश आहेत. शाळेंत ज्याप्रमाणें बिगारी-पासून तों सातवीपर्यंतचे सर्व मुलांस शिक्षण मिळतें; त्याचप्रमाणें तुकारामबुवाचे अभंगांत विषयासक्त पामरापासून तों ज्ञानाभिमानी पंडितापर्यंत सर्वांस उपदेश केलेला आहे. एखादा मुलगा अतिशय उनाड, चोवीस तासांत पाटीपेन्सिलीला न शिवणारा असा असला, तर त्याचा समंजस बाप त्यास ताळ्यावर आण-ण्याकरितां असें सांगतो कीं 'बाळा, तुला खेळ आवडतोना, तर दिवसभर खेळ; फक्त दुपारीं एक तासभर मन लावून अभ्यास कर म्हणजे झाले. येऱ्हवीं असें सांगण्यांत बापाचा हेतु खरोखर मुलाने तेवीस तास खेळावें व **एकच** तास अभ्यास करावा असा नसतो. त्यास त्यानें चोवीस तासही अभ्यास केला तर पाहिजे असतें. परंतु त्यांस माहीत असतें कीं, आपण एकदम जर असा उपदेश मुलास केला तर तो पटणार नाहीं व तो उलटींच उनाड होईल

**पाठेळ करितां नसाहे वारा । साहेलिया ढोरा गोणी वाहे॥१॥**

हा मनाचा स्वभाव बुवांस माहीत होता. व्यसनपंकांत बुडालेल्यांस एकदम अतिकठीण असें आचरण सांगितल्यास सर्वच विसकटून जाईल; पण हलकें हलके चुचकारून त्यांस आपल्या ताब्यांत घेतल्यास कालांतरानें हवें तसें कडकडीत आचरण व तपही तो करूं शकेल.

**मोहरोनि चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ॥ १ ॥**

याच मानसशास्त्राच्या अनुभवानें बुवांनीं विषयग्रस्तांस 'चाल केलासी मोकळा' असला उपदेश केला आहे; त्यावरून तेच त्यांचे सिद्धान्तमत होतें असें सिद्ध होत नाहीं.

येथपर्यंत श्री तुकाराममहाराज यांच्या शिकवणुकीचा आपआपल्यापरीनें

अधिकार नसताना गुरु होण्याच्या तर ते अतिशयच विरुद्ध होते; व या बाबतींत त्यांनीं जितकी कडक भाषा वापरली आहे तितकी, शाक्तमार्ग सोडून देऊन, इतरपंथीयाबाबत क्वचितच वापरली असेल.

**तुका पंखि बहिर न मानूं । वोहि जनावर बाग ।**
**असंतनकुं संत न मानूं । दे वर्मकुं दाग ॥१॥**

**तुका म्हणे लासूं फासूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥१॥**

या आमच्या म्हणण्याचा गैरसमज होण्याचा पुष्कळ संभव आहे. श्रीतुकारामबुवास संतसेवेचे अगर सद्गुरुदास्याचें महत्त्व मान्य नव्हते असें आमचे म्हणणे नाहीं. संतसेवा साधकास ज्ञानप्राप्तीकरितां अवश्य आहे, यांत शंका नाहीं. साधकास परमार्थसोपान चढण्याचे प्रारंभींच जर सद्गुरूचे साहाय्य मिळाले तर साधकाचा पुढील मार्ग सुलभ होतो यांत शंका नाहीं. पण त्याचा अर्थ उठल्यासुटल्या एकाद्या महाराजाकडे जाऊन 'उपदेश' घेतल्याशिवाय परमार्थ होतच नाहीं असा नाहीं. परमार्थ हा पुष्कळ अंशीं आत्मप्रयत्नावर अवलंबून असणारी गोष्ट आहे; व ईश्वर साक्ष ठेवून प्रयत्न करणारास भगवानच गुरुरूपाने मदत करतात असा श्रीतुकोबांचा दृढ विश्वास होता असे दिसते.

**"ऐसें ऐसीयानें भेटती ते साधु । ज्यांच्या दर्शनें तुटे भवबंधु"**

असा आरंभ करून, सरतेशेवटीं ते म्हणतात:—

**"अर्थकामचाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या ।**
**वर्ते समाधानो जाणोनी नेणता । साधु भेट देती तया अवचिता॥१॥**

त्यांनीं ठिकठिकाणीं असेच म्हटले आहे

**माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरू ॥**

ज्या परंपरेचे 'कळस' श्रीतुकोबा झाले त्यांतील शिकवणूक अशीच आहे. आंब्याच्या फळाचें काम झाड सोडून राघु शोधत जाण्याचें नसून फांदीवरच पाडास लागण्याचे आहे. तो पाडास लागला कीं, टोकत असलेला राघू आपणच येऊन टोच मारतो. तसेच आपली भूमिका तयार झाली कीं सद्गुरुरूपाने भगवंतच आपणांस साह्य करतात.

**ऐसा शरीरसंयोगाचिये रातीं । माजि धांवतां खाडिया आयती ।**
**तंव कर्मक्षयाची पाहाती । पाहांट झाली ॥१॥**

**तैसीच गुरुकृपा उखा उजळली।..... ..**

**ऐशी कर्म-साम्यदशा। होय तेथ वीरेशा। मग श्रीगुरु अवसा। भेटेचि गा॥** ज्ञानेश्वरी.

**ऐसी सद्‌गुरूची आवडी। ज्याची अवस्था चढोवढी। त्यासी गुरुरूपें तातडी। भेटी रोकडी मी देतों॥** नाथभागवत.

**जन्मानेकशतैस्सदादरयुजा भक्त्या समाराधितो।**
**भक्तैर्वैदिकलक्षणेन विधिना संतुष्ट ईशःस्वयम्॥**
**साक्षाच्छ्रीगुरुरूपमेत्य कृपया दृग्गोचरस्सन् प्रभुः।**
**तत्त्वं साधु विबोध्य तारयति तान् संसारदुःखार्णवात्॥**
श्रीमत् शंकराचार्य

याच दृष्टीनें श्रीतुकोबांनीं बरोबरी तयार होणाऱ्या गुरूंवर तडाके ओढले आहेत. खऱ्या संतांसंबंधीं अगर सद्‌गुरुसंबंधीं कोणी केव्हांही ब्र अक्षरही काढणार नाहीं. श्रीतुकोबास सर्वत्र राग बाह्य ढोंगाचा होता;व म्हणूनच त्यांनीं कानफाटे, मलंग, संन्यासी, ढोंगीबुवा, ' मांगे आन करी आन ' असले पुराणिक व कीर्तनकार यांची खरमरीत हजेरी घेतली आहे. श्रीतुकोबा म्हणतात: —

**सोंग छंद कांहीं। देव जोडे ऐसें नाहीं॥१॥**
**तेथें सर शुद्ध साचें। अंतरींचें बीज तें॥१॥**

ज्याप्रमाणें दिमाखीच्या गोष्टींचा श्रीतुकोबांस राग असे त्याचप्रमाणें भगवन्नामसंकीर्तनावर उपजीविका करणारे यांचाही त्यांस अतिशय राग असे. साक्रेटिसास ज्ञान विकणें हें, एकाद्या स्त्रीनें आपलें शरीर पैशाकरितां परपुरुषास विकण्याप्रमाणें निंद्य वाटे. त्याचप्रमाणें श्रीतुकोबांसही नाम विकणें—कीर्तन करून पोट जाळणें—हें निंद्य वाटे. ते म्हणतात:—

**कन्या गो करी कथेचा विकरा। चांडाळ तो खरा तया नांवें॥१॥**
**पुण्यविकरा तें मातेचें गमन। भाडी ऐसें धन विटाळ तें॥१॥**
**कथा करोनियां द्रव्य देती घेती। तया अधोगती नरकवास॥१॥**
**कथा करोनियां मोल ज्यापें घेती। तेही दोघे जाती नरकामध्यें॥१॥**

येथपर्यंत भगवंताच्या प्राप्तीच्या साधनांचा विचार केला. आतां थोडक्यांत भगवद्स्वरूपासंबंधानें त्यांचें काय मत होतें ते पाहूं.

याचाही विचार येशूख्रिस्ताच्या सेवकांच्या मताचा विचार केला त्यावेळेस थोड्या अंशाने येऊन गेला आहे. श्रीतुकोबा हे आरंभीं द्वैती होते. परंतु भगवत्प्रसादाने यथार्थज्ञान प्राप्त झाल्यावर ते पूर्ण अद्वैती बनले.

हरि व्यापक सर्वगत । हा तंव मुख्यत्वें वेदान्त ।
चिंतनासी चित्त । असों द्यावें सावध ॥१॥
विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचें सार ॥१॥
तत्त्वमसिविद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥१॥
पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥१॥
जीवशिवा शेज रचिली आनंदें । आउटावे पदीं आरोहण ॥२॥
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहतें बाळका हलरु गाती ॥४॥
खडा रवाळी साखर । झाला नामाचाचि फेर ।
न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडतां ॥१॥
तुम्ही आम्ही पांडुरंगा । भिन्न पेसें काय सांगा ।
चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ॥१॥
मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥१॥
आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥१॥
काय सांगों झालें कांहींचिया बाहीं । पुढें चालीं नाहीं आवडीनें ॥१॥

अशा अद्वैतस्थितीवर आल्यानंतरही भक्ति अगर सेवा टाकण्याची त्यांस गरज भासली नाहीं. **अभेदांत भक्ति**, हेंच महाराष्ट्रांतील भागवतधर्माचें वैशिष्ट्य आहे.

चहूं पुरुषार्थांशिरीं । भक्ति जैसी ॥

आपणचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्याचें काम । मग कीजे कां निःसीम । सेवा जयाची ॥१॥

हें विश्वचि माझें घर । पेसी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर आपणचि झाला ॥ मग यावरीही पार्था । माझ्या भजनीं आस्था । तरि तयातें मी माथा । मुकुट करी ॥

पेसा बोधाचि केवळ । जो होऊनि असे निष्कळ । त्याहीवरी भजनशीळ । माझ्या ठायीं ॥

देव देऊळ परिवारु । कीजे कोरूनि डोंगरु । तैसा भक्तीचा व्यवहारु । कां न व्हावा ॥१॥ श्रीज्ञानेश्वर

अद्वैतमताचे आद्य पुरस्कर्ते श्रीमद् आचार्यही याच आवडीचा ध्वनि खालील श्लोकांत व्यक्त करतातः—

**सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।**
**सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः ॥**

असेच अभेदांतील भक्तीचे श्रीतुकोबांचेही ठिकठिकाणीं उद्गार आहेत.

**मुक्तिवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥१॥**
**...पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥१॥**
**अभेदूनी भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥१॥**
**एका अंगीं दोन्ही झालीं हें निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥१॥**

या अद्वैतभक्तीतच भक्तिसुखाची खरी मजा आहे. येथेच भक्तिसुखाचा आनंद भोगावयास सांपडणारा आहे. जोपर्यंत स्वामीसेवक असा भाव—द्वैत—आहे तोपर्यंत खरा आनंद नाहीं. श्रीनारद आपल्या भक्तिसूत्रांतही असेच म्हणतात.

**राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात्**

पोहायला शिकण्याकरितां पाण्यांत पडणें हें अवश्य. पण पोहावयाला येऊं लागल्यावरही जलक्रीडेचा आनंद भोगण्याकरितां पाण्यांत निर्भयपणें पडण्यांत पोहण्याची खरी लज्जत आहे. तसेंच द्वैती भक्तींत भीति व तज्जन्य कंप आहे व अद्वैतांत केवल अभेदसुख आहे.

शिवाय, आपण असा अलौकिक आनंद भोगीत असतां इतरांस त्याचे वाटेकरी करणे, ही ज्ञाते पुरुषावर एकप्रकारची लोकसंग्रहाची जबाबदारी असते. ज्ञाते पुरुष आपण पूर्ण झाल्यावर, ज्या साधनांचा अवलंब करून आपण पूर्ण झालें, त्यांचा स्वतः त्याग केव्हांही करीत नाहींत; व भक्तिमार्गाचा व आचाराचा उच्छेदही केव्हां करीत नाहींत. श्रीतुकोबा ही गोष्ट स्पष्ट रीतीनें सांगतातः—

**जीवन्मुक्त ज्ञानी जरि झाले पावन । तरी देव तीर्थ भजन न संडिती१**
**जाळुं नये नाव पावलोनि पार । आणीक आधार बहुतांचा ॥१॥**
**आप तरे त्याकी कोण बडाई । औरनकुं भलो नाम धराई ॥१॥**
**काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहिं दूध चाखे ॥२॥**
**कहे तुका उपकार हि काज । सब कर रहिया रघुराज ॥१॥**

**अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥१॥**
**तैसे संत जगीं । क्रिया करूनि दाविती अंगीं ॥२॥**
**बाळकाचे चाली । माता जाणुनि पाऊल घाली ॥३॥**
**तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥४॥**

अर्थात् ' विशेष आचरावे । लागे मंती ' या न्यायाने, ज्ञात्या पुरुषांवर मोठी जबाबदारी आहे व ती ओळखून ज्ञात पुरुष आचरण करतात असेच त्यांचे सांगणे आहे.

तात्पर्य, देवरूप असलेल्या जीवांनी देवाच्या प्रसादानें आपली देवरूपता जाणून घ्यावी व इतरांसही त्या मूळरूपाची ओळख करून द्यावी, हेंच त्यांच्या शिकवणुकीचें सार आहे.

**अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ॥१॥**
**देवचि बरें देवचि बरें । तुका म्हणे खरे तुम्ही ॥४॥**
**सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥**
**ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥१॥**

असा त्यांच्या शिकवणुकीचा सारांश आहे. एकदां भगवत्प्राप्ति कां झाली, कीं त्या ठिकाणीं कोणाचाच धाक, भीति ही रहात नाहींत. तेथे 'अभयं वै जनकप्राप्तोऽसि' यांत याज्ञवल्क्यमुनीनीं जनकराजास सांगितल्याप्रमाणें निर्भयता प्राप्त होते.

**कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥१॥**
**देव देखिला देव देखिला । तो नाहीं कोणा भ्याला ॥१॥**

अशी निर्भयता प्राप्त करून घ्या, हीच वैदिकमार्ग व भागवतधर्म यांची शिकवणूक,हेच श्रीतुकोबा यांच्या चरित्राचें सार व हाच त्यांचा मुख्य उपदेश आहे. अशी निर्भयता श्रीतुकोबांच्या अभंगांचे परिशीलनानें सर्वांस प्राप्त व्हावी, या बुद्धीनें त्यांच्या शिकवणुकीचें हें अल्प दिग्दर्शन सद्गुरु श्रीतुकोबांचे चरणीं आम्ही अर्पण करतों.

पंढरीचे वारकरी
पंढरपूर
कार्तिक शु॥ ११, शके १८४७.
**मा. कृ. देशमुख.**
**शं. वा. दांडेकर.**

---

# विषयानुक्रमणिका

## कान्होबाचे अभंग



## क्षेपक

# तुकारामाची गाथा.



## मंगलाचरण ।



१ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनिया ॥ १ ॥ तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥ मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

२ राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥ कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ २ ॥ मुकुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ॥ ३ ॥ कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयानो ॥ ४ ॥ सकळही तुम्हीं व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥ ५ ॥

३ गरुडाचें वारिकें कासे पितांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ॥ १ ॥ बरविया बरवंटा घनमेघसांवळा । वैजयंती माळा गळां शोभे ॥ २ ॥ मुगुट माथां कोटी सूर्यांचा झल्लाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥ ३ ॥ ओंतीव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ॥ ४ ॥ उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ॥ ५ ॥ तुका म्हणे नव्हे आणिकां सारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥ ६ ॥

४ धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टीं न्याहाळितां ॥ १ ॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ २ ॥ सकळ मंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥

५ राहों आतां हेंचि ध्यान । डोळा मन लंपट ॥ १ ॥ कोंडकोंडूनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ॥ २ ॥ होईल येणें कळसा आलें ।

स्थिरावलें अंतरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे गोजिरीया । विठोबा पायां पडों द्या ॥ ४ ॥

६ आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहे । जों मी तुज पाहें पांडुरंगा ॥ २ ॥ लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडी ऐसें झालें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही मागावी लडिवाळी । पुरवावी आळी मायबापा ॥ ४ ॥

७ गुणा आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर जो ॥ १ ॥ डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ॥ २ ॥ निवारोनि जाय माया । ऐसी छाया जयाची ॥ ३ ॥ तुका म्हणे समध्यान । ते हे चरण सुकुमार ॥ ४ ॥

८ स्वप्नीं तोही कैसा न पडसा डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥ १ ॥ चतुर्भुज माळा रुळे येकावळी । कस्तुरी निढळीं रेखिलीसे ॥ २ ॥ शंखचक्रगदा रुळे वैजयंति । कुंडलें तळपति श्रवणीं दोन्ही ॥ ३ ॥ तुका म्हणे स्वप्नीं दावीं आतां पाय । पांडुरंग माय कृपावंते ॥ ४ ॥

## बाळक्रीडेचे अभंग.

९ देवा आदिदेवा जगत्रयाजीवा । परियेसी केशवा विनंति माझी ॥ १ ॥ माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें देई प्रेम कांहीं कळा ॥ २ ॥ कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देई आम्हां ॥ ३ ॥ आम्हां शरणांगतां तुझाचि आधार । तूं तंव सागर कृपासिंधु ॥ ४ ॥ सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जळतील कर्में दुस्तरें तीं ॥ ५ ॥ तें फळ उत्तम तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥ ६ ॥ सेविलिया रामकृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥ ७ ॥ संसार तो काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ॥ ८ ॥ क्षणमात्रें जाळी दोषांचिया राशी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥ ९ ॥ करी ब्रीद साचें आपलें आपण । पतितपावन दीनानाथ ॥ १० ॥ नाथ अनाथाचा पति गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ॥ ११ ॥ चित्तीं जें धरावें तुका म्हणे दासीं । पुरविता होशी मनोरथ ॥ १२ ॥

॥३॥ तुका म्हणे एके गांवींची वसनी । म्हणऊ^न^ खंती वाटे देवा॥४

१३३७. तरले त मागे आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनिया ॥ १ ॥ उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तूज अनन्य तुम्ही त्यां सी ॥ २ ॥ मज ऐसा कोण सांग वांयां गेला । तो तुम्ही तारिला पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका म्हणे नामासारखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥ ४ ॥

१३३८. तुज जाणे तोन्हे नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥ १ ॥ तुज ठावें होतें पातकी मी खरा । आधींच कां थारा दिला पायीं ॥२ ॥ अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥३ ॥ तुका म्हणे आम्हीं जिंतीले ते खरें । आतां उणे पुरे तुम्हां लागीं[२] ॥ ४ ॥

१३३९. विनवितो तरी आणितोसि परी । याचकानें थोरी दात-याची ॥ १ ॥ आमुचेही कांहीं असो द्या उपकार । एकल्याने थोर कैंचे तुम्हां ॥ २ ॥ न घ्यावी जी कांहीं बहुसाल सेवा । गौरव तो देवा यत्न कीजे ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं आमुची मिरासी । असा-वेंसीं ऐसीं दुर्बळेंचि ॥ ४ ॥

१३४०. आपण काय सादर । विशीं आम्हां कां निष्ठुर ॥ १ ॥ केले भक्त तैसे देई । तुझें प्रेम माझ्याठायीं ॥ २ ॥ काय पंगतीस को-डा । एकांतासी साकरमांडा ॥ ३ ॥ काय एकपण । पोतां घालुनि गांठी त्रूण ॥ ४ ॥ काय घ्यावें[३] तसें । तया आपण अनारिसें ॥५॥ तुका म्हणे मधीं । आतां तोडूं भेदबुद्धी ॥ ६ ॥

१३४१. नाहीं देणें घेणें । गोवी केली अभिमानें ॥ १ ॥ आतां कां हो निवडूं नदां । पांडुरंगा येवढा धंदा ॥ २ ॥ पांचांमधीं जावें थोड्यासाठीं फजित व्हावें ॥ ३ ॥ तुज ऐसीं नाहीं । पांडुरंगा आ-म्ही कांहीं ॥ ४ ॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां । निवडूं संतां हे देखतां ॥ ६ ॥

१३४२. चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥ १ ॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ २ ॥ आम्ही सर्वस्व

---

१ जाणतां नेणतां २ अंगीं ३ मावे.

उदार । तुज देऊनि वेव्हार ॥ ३ ॥ इंद्रियांची होळी । संसार दिला-बळी ॥ ४ ॥ न पडे विसर । तुझा आम्हां निरंतर ॥ ५ ॥ प्रेम ए-कासार्टी । तुका म्हणे न वेचे गांठी ॥ ६ ॥

१३४३. देवा तुजमज पण । पाहों आगळा तो कोण ॥ १ ॥ तरी साच मी पतित । तूंच खोटा दिनानाथ ॥ २ ॥ ग्वाही साधुसंत जन । करूनि अंगीं लावीन ॥ ३ ॥ आम्ही धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ ४ ॥ आम्ही बळकाविले दोष । न चले तुझें कांहीं त्यास ॥ ५ ॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ६ ॥ तुका म्हणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ७ ॥

१३४४. बैसलोंसे दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥ १ ॥ आतां कोठे हालों नेदी । बरी सांपडली संदी ॥ २ ॥ किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥ ३ ॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ४ ॥ भांडावें तें किती । बहु सोसिली फाजिती ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ६ ॥

१३४५. संसाराच्या भेणें । पळों न लाहेसें केलें ॥ १ ॥ जेथें तेथें आपण आहे । आम्हीं करावें तें काय ॥ २ ॥ एकांतासी ठाव । तिहीं लोकीं नाहीं वाव ॥ ३ ॥ गांवा जातो ऐसें । नलगे म्हणावे ते कैसे ॥ ४ ॥ स्वप्नाचिये परी । जागा पाहे तव घरीं ॥ ५ ॥ तुका म्हणे काय । तुझें घेतलें म्यां आहे ॥ ६ ॥

१३४६. तुझा भरंवसा आम्हां । फार होता पुरुषोत्तमा ॥ १ ॥ भवसागरसंकटीं । तारिशील जगजेठी ॥ २ ॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजेड ॥ ३ ॥ शिलंगणीचें सोनें । त्यासी गहाण ठेवी कोण ॥ ४ ॥ नामासारखी करणी । कोठें नाहीं त्रिभुवनीं ॥ ५ ॥ तुका म्हणे देवा । ब्रीद सोडूनियां ठेवा ॥ ६ ॥

१३४७. माझीं मेलीं बहुवरि । तूं कां जैसा तैसा हरी ॥ १ ॥ विठो कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥२॥ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा॥३॥आम्हां लागलिसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥४॥ तुज फावलें तें मागें । कोणी नमना वादि लागे ॥५॥ तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखील[1] लागलीं अवघीं ॥ ६ ॥

---

१ देखता

१३४९. केला पण सांडी । प्रेमीयासी म्हणती लंडी ॥ १ ॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ २ ॥ आपला निवाड । आपणाच करितां गोड ॥ ३ ॥ तुम्हीं आम्हीं देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥ ४ ॥ असें पुरे उणें । मागें सरे तुका म्हणे ॥ ५ ॥

१३५०. आम्हां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ १ ॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ २ ॥ आम्हीं जना ध्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ ३ ॥ तुका म्हणे देश । जाला देवाविण ओस ॥ ४ ॥

१३५१. न व्हावें तें जालें । तुम्हां आम्हांसी लागलें ॥ १ ॥ आतां हालमाकलमें । सांडोनियां काहूं वर्में ॥ २ ॥ पाटोळ्यासंवसाटीं । दिली रत्नांच्या गांठी ॥ ३ ॥ तुका म्हणे हारी । आणूनियां करिन सरी ॥ ४ ॥

१३५२. कायासाठीं आम्हीं जाळला संसार । न करा विचार आम्हां देवा ॥ १ ॥ कैसें तेणें तुम्हां करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥ २ ॥ [illegible]पूरि ठेवीं देह हा सकळ । धरितां विटाळ न करा माझा ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघा सांडूनि आस । फिरतों उदास कोणासाठीं ॥ ४ ॥

१३५३. आळणी ऐसें कळों आलें । त्यासी भलें मौनचि ॥ १ ॥ नये कांहीं वेचूं वाणी । वेट घाणी सांगातें ॥ २ ॥ वेगळें तें देहभावा । श्रम जीवा साजिरा ॥ ३ ॥ तुका म्हणे कवतुक केलें । किंवा भलें देवाडितां ॥ ४ ॥

१३५४. लटिका देव म्हणतां ऐसा । संदेहसा वाटतसे ॥ १ ॥ ऐसें आलें अनुभवा । मजही सेवा करितां ॥ २ ॥ शून्याकारीं बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥ ३ ॥ तुका म्हणे नाळी नाहीं । एके ठायीं चपळत्व ॥ ४ ॥

१३५५. जैशासाठीं तैसें व्हावें । हें बरवें कळलेंसें ॥ १ ॥ उदास तूं नारायणा । मीही म्हणा तुम्हीच ॥ २ ॥ ठका महाठका जोडा । हे धडफुडा लागासी ॥ ३ ॥ एकांगीच भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥ ४ ॥

१३५६. आपुलें मागतां । काय नाहीं आम्हां सत्ता ॥ १ ॥ परि

या लौकिकाकारणें । उगी ठेविलें बोलणें ॥ २ ॥ येचि आतां घडी । करूं बैसों तेचि फडी ॥ ३ ॥ तुका म्हणे करितों तुला । ठाव नाहींसा विठ्ठला ॥ ४ ॥

१३५७. तुजशीं संबंध खोटा । परता परता रे तूं थोटा ॥ १ ॥ देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें ॥ २ ॥ जेथें मुद्दल न ये हातां । व्याज मरावें लेखितां ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ४ ॥

१३५८. मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥ १ ॥ संत साक्षी या वचना । त्यांसी ठाउकिया खुणा ॥२॥ होइन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥ ३ ॥ तुका म्हणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥ ४ ॥

१३५९. बहु होता भला । परि ये रांडेनें नासिला ॥ १ ॥ बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे ॥ २ ॥ नव्हतें आळाविलें कोणी । इनें केला जग ऋणी ॥ ३ ॥ ज्याचें त्यासी नेदी देऊं । तुका म्हणे धांव खाऊं ॥ ४ ॥

१३६०. मज संताचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥ १ ॥ पाहा विचारूनी देवा । नको आम्हांसवें दावा ॥ २ ॥ तुज बोल न बोलवे । आम्हां भांडायाची सवे ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी । ऐक्यभावें नुरे उरी ॥ ४ ॥

१३६१. आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडा लागावें ॥ १ ॥ आहे तैसें असो आतां । चिंतें चिंता वाढते ॥ २ ॥ बोलिल्याचा मानी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हापाशीं । धीरा ऐसी जतन ॥ ४ ॥

१३६२. धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें धामेजेना ॥ १ ॥ इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥ २ ॥ सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ । आपुले तो दाळ सांडी केवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हांसवें जो रूसला । तयाचा अबोला आकाशासीं ॥ ४ ॥

१३६३. मजशीं पुरें न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें ॥ १ ॥ तूंचि आगळा काशानें । शिर काय पायांविणें ॥ २ ॥ वाहों तुझ

भार । दुःख साहोनि अपार ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ४ ॥

१३६४. केली सलगी तोंडपिटी । आम्ही लडिवाळें धाकुटीं ॥ १ ॥ न बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥ २ ॥ अवघ्यामध्यें एक वेडें । तेंचि खेळविती कोडें ॥ ३ ॥ तुका म्हणे मायबापा । मज वरी कोपों नका ॥ ४ ॥

१३६५. आतां न करीं सास । सेवीन हा ब्रह्मरस ॥ १ ॥ सुखें सेवीन अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥ २ ॥ तुमचा निज ठेवा । आम्ही पाडियेला ठावा ॥ ३ ॥ तुका म्हणे देवराया । आतां लपालेती वांयां ॥ ४ ॥

१३६६. कां जी वाढविलें । न लगतां हें उगलें ॥ १ ॥ आतां मानितां कांटाळा । भोंवतीं मिळालिया बाळा ॥ २ ॥ लावूनियां सवे । पळतां दिसाल बरवें ॥ ३ ॥ तुका म्हणे बापा । येतां न कळाचि रूपा ॥ ४ ॥

१३६७. मज नाहीं धीर । तुम्ही न करा अंगीकार ॥ १ ॥ ऐसें पाडिलें विषम । बळी देवाहूनि कर्म ॥ २ ॥ चालों नेणें वाट । केल्या न पवाचि बोभाट ॥ ३ ॥ वेचों नेणें जीवें । तुका उदास धरिला देवें ॥ ४ ॥

१३६८. अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ १ ॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥ २ ॥ नव्हती मोडामोडी । केली मागें तेचि घडी ॥ ३ ॥ तुका म्हणे दिला ठाव । पायीं लागों दिला भाव ॥ ४ ॥

१३६९. रायाचें सेवक । शेवटीचें पीडी रंक ॥ १ ॥ हा नों हिनाव कवणा । कां हो नेणां नारायणा ॥ २ ॥ परिसेंसी भेटी नव्हे लोहोपणा तुटी ॥ ३ ॥ तुझें नाम कंठीं । तुक्या काळासवें भेटी ॥ ४ ॥

१३७०. विष्णुदासां भोग । जरी आम्हां पीडी रोग ॥ १ ॥ तरि हें दिसे लाजिरवाणें । काय तुम्हांसी सांगणें ॥ २ ॥ आम्हां काळें खावें । बोलिलें तें वायां जावें ॥ ३ ॥ तुका म्हणे दास । आम्ही भोगूं गर्भवास ॥ ४ ॥

१३७१. तुम्हां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ १ ॥ फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥ २ ॥ कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥ ३ ॥ तुका म्हणे शिकाविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ॥ ४ ॥

१३७२. जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुझीं हरी ॥ १ ॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥ २ ॥ शुद्ध नाहीं चित्त । परी म्हणवितो भक्त ॥ ३ ॥ मज पण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥ ४ ॥

१३७३. समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥ अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥ तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जाला तुझा ॥ ३ ॥

१३७४. आणिलें शेवटा । आतां कामा नये फांटा ॥ १ ॥ मज आपुलें म्हणा । उपरि या नारायणा ॥ २ ॥ वेचियेली वाणी । युक्ती अवघी चरणीं ॥ ३ ॥ तुका धरी पाय । असा करवीतो अन्याय ॥ ४ ॥

१३७५. मातां पांचा तरी वचनां शेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ॥ १ ॥ कां तेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥ ३ ॥

१३७६. नाहीं नाथां भार । तुम्ही घेत हा विचार ॥ १ ॥ जाणोनिया ऐसें केलें । दुरिल अंगेंसी लाविलें ॥ २ ॥ आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी ॥ ३ ॥ तुका म्हणे दुरी । देवा खोटी ऐसी उरी ॥ ४ ॥

१३७७. नसतों किविलवाणें । कांहीं तुमच्या कृपादानें ॥ १ ॥ हेचि तयाची ओळखी । थालें टवटवित मुखीं ॥ २ ॥ वांयां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥ ४ ॥

१३७८. मुखाकडे वास । पाहें करुनियां आस ॥ १ ॥ आतां

होईल ते शिरीं । मनोगत आज्ञाधारी * ॥ २ ॥ तुम्हीं अंगीकार । केला पाहिजे हे सार ॥ ३ ॥ तुका म्हणे दारीं । उभें याचक मी हरी ॥ ४ ॥

१३७९. आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥ १ ॥ तुझें नाम दिनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥ २ ॥ कोण लेखीं माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥ ३ ॥ पायां जातां मज । तुका म्हणे तुम्हां लाज ॥ ४ ॥

१३८०. ऐसें कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥ १ ॥ तुम्हां तंव होईल ठावें । नेदावें कां कळों हें ॥ २ ॥ कोण आला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥ ३ ॥ तुका म्हणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ४ ॥

१३८१. कां जी धरिलें नाम । तुम्ही असोनि निष्काम ॥ १ ॥ कोणा सांगतसां ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥ २ ॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥ ३ ॥ तुका म्हणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥ ४ ॥

१३८२. कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥ १ ॥ ऐसें आम्हां मांडियेलें । विठो त्वां कां सांडियेलें ॥ २ ॥ बैसुनी कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळी ॥ ३ ॥ तुका म्हणे नारायणा । भलें लोकीं हें दिसेना ॥ ४ ॥

१३८३. आम्ही आर्तभूत जिवीं । तुम्ही गोसावी उदास ॥ १ ॥ वादावाद समर्थाशीं । काशानशी करावा ॥२॥ आम्ही मरों वेरझारीं । स्वामी घरीं बैसले ॥ ३ ॥ तुका म्हणे आपला वाद । कांहीं भेद कळेना ॥ ४ ॥

१३८४. लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर ॥ १ ॥ ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥ २ ॥ फाडिली लंगोटी । घरीं सकळांसी तुटी ॥ ३ ॥ तुका म्हणे चोरा । तुला आन ना कुसरा ॥ ४ ॥

१३८५. दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ १ ॥ थोडा

* आज्ञा धरी

झोंडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥ २ ॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥ ३ ॥ तुका म्हणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥ ४ ॥

१३८६. लटिकाचि केला । सोंग पसारा दाविला ॥ १ ॥ अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें घेणें ॥ २ ॥ लावियेला चाळा । बहु दावूनि पुतळा ॥ ३ ॥ तुका म्हणे हात । आम्हीं अवरिली मात ॥४॥

१३८७. व्यवहार तो खोटा । आतां नवजों तुझ्या वाटा ॥ १ ॥ एका नामा नाहीं ताळा । केली सहस्रांची माळा ॥ २ ॥ पाहों जातां ठायीं * । खळसील लपंडाई ॥ ३ ॥ तुका म्हणे चार । बहु करितोसी फार ॥ ४ ॥

१३८८. मिठवण्याचे※धनी । तुम्ही व्यवसाय जनीं ॥ १ ॥ कोण पडे य लिगाडीं । केलीं तैसीं उगवा कोडीं ॥ २ ॥ केलें सांगितलें काम । दिले पाळूनियां धर्म ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । असो तुमचें तुमचे माथां ॥ ४ ॥

१३८९. तूं पांढरा स्फटिक मणी । करिसी आणिकां त्यांहुनि ॥१॥ म्हणोनि तुझ्या दारा । न येती ठकती दातारा ॥ २ ॥ तुझे ठाई नादणूक । अवघा बुडविला लौकिक ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याचें घेसी । त्यासी हेंचि दाखविसी ॥ ४ ॥

१३९०. नवां नवसांचीं । जालों तुम्हासी वाणीचीं ॥ १ ॥ कोण तुझें नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥ २ ॥ कोण होतें मागें पुढें । दुजें बोलाया रोकडें ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । कोणा घेतासि वोसंगा ॥ ४ ॥

१३९१. नेघें तुझें नाम । न करीं सांगितले काम ॥ १ ॥ वाढे वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ २ ॥ आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ ३ ॥ तुका म्हणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ४ ॥

१३९२. नाहीं खंड झाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ १ ॥ कैसें कैसें हो दुश्चित । आहे चौघांपाशीं नीत ॥ २ ॥ मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज । नलगे बोलणें सहज ॥ ४ ॥

---

* ग्राहे. ※मिटवण्याचे.

१३९३. ठाव नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥ १ ॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवीं उदास ॥ २ ॥ जागा ना निजला । होसी धाला ना भुकेला ॥ ३ ॥ न पुसतां भलें । तुका म्हणे तुझे बोलें ॥ ४ ॥

१३९४. ऐसाचि तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥ १ ॥ बहु आली दूरवरी । ओढत हे भरोवरी ॥ २ ॥ आम्हांसी न कळे । तुम्ही झाकूं नये डोळे ॥ ३ ॥ तुका म्हणे संगें । असों एक एका अंगें ॥ ४ ॥

१३९५. मागतियाचे दोनिच कर । अमित भांडार दातियाचें ॥ १ ॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारु पडियेला ॥ २ ॥ एक सांठवण प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आहे तेथें असो । अंकुनियां बसों पायांपाशीं ॥ ४ ॥

१३९६. माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥ १ ॥ गोष्टी न करीं नांव नेघें । गेलों दोघें खंडोनी ॥ २ ॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदा उदंड ॥ ३ ॥ तुका म्हणे निवांत ठेलों । वेचित आलों जीवित्व ॥ ४ ॥

१३९७. दारीं परिवरीं । कुडीं कवाडीं मी घरीं ॥१॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघें ठायीं नारायणा ॥ २ ॥ नेदीं खाऊं जेवूं । हातीं तोंडींचेंही घेऊं ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगी । जडलों ठायींचा मलगी ॥ ४ ॥

१३९८. नव्हों आम्ही आजिकाळींचीं । कांचीं कुचीं चाळवणी ॥ १ ॥ एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥ २ ॥ तुमचें आमचेंसें कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ ३ ॥ तुका म्हणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥ ४ ॥

१३९९. भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥ १ ॥ हे तों चाळवाचाळवी । केलें आपणाचि जेवी ॥ २ ॥ नैवेद्याचा आळ । वेचे ठाकणीं सकळ ॥ ३ ॥ तुका म्हणे जड । मज न राखावें दगड ॥ ४ ॥

१४००. होईल तरि पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥ १ ॥

तोंवरि मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥ २ ॥ जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥ ३ ॥ तुका म्हणे धरिल हातीं । करील खंतीवेगळें ॥ ४ ॥

१४०१. असो आतां किती । तुज यावें काकुलती ॥ १ ॥ माझें प्रारब्ध हें गाढें । तूं बापुडें तयापुढें ॥ २ ॥ सोडवीन आतां । ब्रीद तुझें पंढरीनाथा ॥ ३ ॥ तुका म्हणे बळी । तो कळ्याचे कान पिळी ॥ ४ ॥

१४०२. आम्ही तुझ्या दासीं । जरि आलें पतनासी ॥ १ ॥ तरि हें दिसे विपरीत । कोठें बोलिली हे नीत ॥ २ ॥ तुझें नाम कंठीं । आम्हां संसार आटी ॥ ३ ॥ तुका म्हणे काळ । करिल आम्हांसी विटाळ ॥ ४ ॥

१४०३. लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥ १ ॥ आम्ही नामाचे धारक । किविलवाणा दिसों रंक ॥ २ ॥ बोलिलें ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ४ ॥

१४०४. शोकवावा म्यां देह । ऐसें नेणा पोटीं आहे ॥ १ ॥ तरीच नेदा जी उत्तर । दुःखी राखिलें अंतर ॥ २ ॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥ ३ ॥ तुका म्हणे गिरी । मज सेववावी दरी ॥ ४ ॥

१४०५. कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥ १ ॥ उफराटी तुम्हां चाली । क्रिया गेली सत्याची ॥ २ ॥ साक्षी हें गे माझें मन । आतं कोण हेतें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे असमर्थपणें । काय नेणें करितसां ॥ ४ ॥

१४०६. तुम्ही कांटाळलां तरी । आम्हां न सोडणें हरी ॥ १ ॥ जावें कवणिया ठाया । सांगा विनविलों पाया ॥ २ ॥ केली जिवा साटी । आतां सुखें लागों पाठी ॥ ३ ॥ तुका म्हणे ठाव । न सोडणें हाचि भाव ॥ ४ ॥

१४०७. आम्ही पतित तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ॥ १ ॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें त्यानें ॥ २ ॥ मिरासीचा ठाव । राखी करोनि उपाव ॥ ३ ॥ वादें मारी हाका । देवा आइकविता तुका ॥ ४ ॥

१४०८. तुम्हांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥ ॥ १ कां बा तुम्ही ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळितसां ॥ २ ॥ आळवितां मायबापा । नये कृपा अझूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे जगदीशा । काय असां निजेले ॥ ४ ॥

१४०९. आतां चक्रधरा । झणी आम्हांस अव्हेरा ॥ १ ॥ तमचीं म्हणविल्यावरी । जैशीं तैशीं तरी हरी ॥ २ ॥ काळ आम्हां खाय । तरी तुझें नांव जाय ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥ ४ ॥

१४१०. काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥ १ ॥ होंसी नामाची सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥ २ ॥ नाहीं वेचावेंच जाला । उरला आहेसी संचला ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें । काय होईल तुम्हां ओझें ॥ ४ ॥

१४११. कैवल्याच्या तुम्हां घरीं । रासी हरी उदंडा ॥ १ ॥ मजसाठीं कां जी वाणी । नव्हे धणी विभागा ॥ २ ॥ सर्वा गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥ ४ ॥

१४१२. काय करावें तें आतां । जालें नयेसें बोलतां ॥ १ ॥ नाहीं दोघांचिये हातीं । गांठी घालावी एकांतीं ॥ २ ॥ होय आपुलें काज । तों हें भीड सांडूं लाज ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । आधीं निवडू हा गोवा ॥ ४ ॥

१४१३. कृपेचा ओलावा । दिसे वेगळाचि देवा ॥ १ ॥ मी हें उचितसें साचें । न लगे कु[illegible] काचें ॥ २ ॥ जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ४ ॥

१४१४. फार्गसा लाधवें । तूं हें खेळसी आधवें ॥ १ ॥ केला अहंकार आड । आम्हां जगासी हा नाड ॥ २ ॥ इत्थंभूत यावें । दावू त्यांपांही जाणावें ॥ ३ ॥ तुका म्हणे हा श्रीपती । आता चाळवल किती ॥ ४ ॥

१४१५. नाहीं सांगितला । तुम्हां मान स्यां विठ्ठला ॥ १ ॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ २ ॥ नाहीं केला पोट ।

पुढें घालूनि बोभाट ॥ ३ ॥ तुका म्हणे धरूनि हात । नाहीं नेलें दिवाणांत ॥ ४ ॥

१४१६. झाड कल्पतरू । न करी याचकीं अव्हेरु ॥ १ ॥ तुम्ही सर्वी सर्वोत्तम । ऐसे विसरतां धर्म* ॥ २ ॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जागे अभिमानें ॥ ३ ॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारूनियां हाका ॥ ४ ॥

१४१७. घालूनियां कास । बळें आलों मागायास ॥ १ ॥ प्रेम देई पाठवूनि । पांडुरंगा सेवाऋणी ॥ २ ॥ होई रे शाहाणा । कळों नेदावें या जना ॥ ३ ॥ तुका म्हणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ४ ॥

१४१८. केवढा तो अहंकार । माझा तुम्हां नव्हे दूर ॥ १ ॥ आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥ २ ॥ कां जी कृपनें कृपण । वेचतसे ऐसें धन ॥ ३ ॥ तुका म्हणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥ ४ ॥

१४१९. विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ १ ॥ कां रे कृपाळू न होसी । काय जालें मजाविशीं ॥ २ ॥ जाल्या वेरझारा । जन्मा बहुतांचा फेरा ॥ ३ ॥ तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ४ ॥

१४२०. आम्हांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ॥ १ ॥ धरूनि ठेलों जीवेंसाठीं । होय भेटी तोंवरि ॥ २ ॥ लागलो ते न फिरें पाठीं । पाडिलया गांठी वांचूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे अवकाशें । तुमच्या ऐसें व्हावया ॥ ४ ॥

१४२१. जीवींचें कां नेणां । परि हे आवडी नारायणा ॥ १ ॥ वादवावें हें उत्तर । कांहीं लाड* करकर ॥ २ ॥ कोठें वायां गेले । शब्द उत्तम चांगले ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळा । असे तात्पर्य या खेळा ॥ ४ ॥

१४२२. समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हंसती सकळ लोक कोणा ॥ १ ॥ समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आलि-

---

* नाम * लाज, लाऊ

याची लागे चिंता ॥ २ ॥ जरी तुज कांहीं होईल उचित । तरी हा पतित तारीं तुका ॥ ३ ॥

१४२३. कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥ १ ॥ मग तळमळ न करितें मन । झालें तें कारण कळों येतें ॥ २ ॥ तुका म्हणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी तें भीड मरण रोग्या ॥ ३ ॥

१४२४. आशाबद्ध बहु असें निलाजरें । होय म्हणें धीरें फळ टोंकें ॥ १ ॥ कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाठीं ॥ २ ॥ तुका म्हणे हातें लोटिलें न कळे । झांकितसें डोळे पांडुरंगा ॥ ३ ॥

१४२५. नव्हें मी शाहाणा । तरी म्हणा नारायणा ॥ १ ॥ तुम्हां बोलावया कांहीं । येच भरलोंसे वाहीं ॥ २ ॥ आणावे ते रूपा । कोपलेती तरी कोपा ॥ ३ ॥ कळोनि आवडी । तुका म्हणे जाते घडी ॥ ४ ॥

१४२६. पायांपासीं चित्त । तेणें भेटी अखंडित ॥ १ ॥ असें खेळे भलते ठायीं । प्रेमसूत्रदोरी पायीं ॥ २ ॥ केलेंसें जतन । मुळीं काय तें वचन ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व जाणा । ठायीं विचारावें मना ॥ ४ ॥

१४२७. नव्हें परि म्हणवी दास । कांहीं निमित्तास मूळ केलें ॥ १ ॥ तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥ २ ॥ नाहीं शुद्ध आचरण । परी चरण चिंतितों ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । ऐसें कां गा नेणा हे ॥ ४ ॥

१४२८. आम्हीं घ्यावें तुझें नाम । तुम्हीं आम्हां द्यावें प्रेम ॥१॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ २ ॥ माझी डोई पायांवरी । तुम्हीं न धरावी दुरी ॥ ३ ॥ तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४ ॥

१४२९. असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ १ ॥ आतां माझे मनीं । कांहीं अपराध न मानीं ॥२॥ नेदी अवसान । करितां नामाचें चिंतन ॥३॥ तुका म्हणे बोलें । तुज आधींच गोविलें ॥ ४ ॥

१४३०. उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥ १ ॥ कां रे न

घालिसी धांव । तुझें उच्चारितां नांव ॥ २ ॥ काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं विश्वंभर । वोस माझें कां अंतर ॥ ४ ॥

१४३१. वेडें वाकडें गाईन । परि तुझाचि म्हणवीन ॥१॥ मज तारीं दिनानाथा । ब्रीद साच करीं आतां ॥ २ ॥ केल्या अपराधांच्या राशी । म्हणऊनि आलों तुजपाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मज तारीं । सांडीं ब्रीद नाहीं तरी ॥ ४ ॥

१४३२. अंधळ्याची काठी । हिरोनिया फडा लोटी ॥ १ ॥ हे कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥ २ ॥ चाळवूनि हातीं । साकर म्हणोनि द्यावी माती ॥ ३ ॥ तुका म्हणे वाट । देवा पसरावे सराटे ॥ ४ ॥

१४३३. माझ्या वडिलांची मिरासी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥१॥ उपवास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आम्हांलागीं ॥ २ ॥ वंशपरंपरा दास मी अंकिता । तुका मोकलितां लाज कोणा ॥ ३ ॥

१४३४. कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुम्हांसी ॥ १ ॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेम खंडत ॥ २ ॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥ ३ ॥ तुका म्हणे गुण जाला । हा विठ्ठला हीन शक्ति ॥ ४ ॥

१४३५. आम्ही जाणों तुझा भाव । दृढ धरिले पाय ॥ १ ॥ फांकूं नेदूं चुकवितां । नेवों थोडें बहु देतां ॥ २ ॥ बहुतां दिसांचें लिगाड । आलें होत होत जड ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । नेवों सर्वस्वेंशी देतां ॥ ४ ॥

१४३६. ऋण वैर हत्या । हें तों न सुटे नदितां ॥ १ ॥ हें कां नेणां पांडुरंगा । तुम्ही सांगतसां जगा ॥ २ ॥ माझा संबंध तो किती । चुकत्या लोकांची फजिती ॥ ३ ॥ तुका म्हणे याचिसाठीं । सज घेतां नये तुटी ॥ ४ ॥

१४३७. दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥ १ ॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥ २ ॥ तुम्ही पापा भीतां ।

आम्हां उपजावया चिंता ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥ ४ ॥

१४३८. जरी मी पतित नव्हतों देवा। तरी तूं पावन कैंचा तेव्हां॥१॥ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ २ ॥ लोहो महिमान परिसा । नाहीं तरी दगड जैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे याचकभावें । कल्पतरु मान पावे ॥ ४ ॥

१४३९. तुमचा तुम्हीं केला गोवा । आतां चुकविनां देवा ॥१॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥ २ ॥ कासया हो रुपा नांवा आलेति गा बापा ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । न सरे हवाले घालितां ॥ ४ ॥

१४४०. याचि हाका तुझे द्वारीं । सदा देखों अरतकरी ॥ १ ॥ सदा करितो खंड दंड । देवा बहु गा तूं लंड ॥ २ ॥ सुखें गावंसी भोजना । रडवूनियां आपणा ॥ ३ ॥ एकें एक बुझावीसी । तुका म्हणे ठक होसी ॥ ४ ॥

१४४१. संसाराची कोण गोडी । लिली ओढी करूनि ॥ १ ॥ निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न म्हणवी ॥ २ ॥ पाहोनियां कर्म डोळां । निराळा तो वर्तीना ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज साजे । म्हणतां ओझें फुकट ॥ ४ ॥

१४४२. नव्हेसी तूं लांसी । माया आणिकां त्या ऐसी ॥ १ ॥ जे हे वायां जाती बोल । होसी निर्मळचि फोल ॥ २ ॥ नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं ते जवळी ॥ ३ ॥ तुका म्हणे खोटी । कांहीं नव्हेसी करटी ॥ ४ ॥

१४४३. आम्हां बोलावा । तुम्हां अनुचित हें देवा ॥ १ ॥ ऐसें कोणी कां व्यालेती । काय नाहीं तुम्हां हातीं ॥ २ ॥ आतां धरा दुरी । वांयां दवडाया थोरी ॥ ३ ॥ तुका म्हणे ठायीं । ऐसें विचारावें पाहीं * ॥ ४ ॥

१४४४. मरोनियां गेली माया । मग तया कोण पुसे ॥१॥ पोरटियांची दाद कोणा । ऐसा जना प्रवाहो ॥ २ ॥ निढळासी निढळ

* कांहीं

जोडा । होय कोडा कवतुक ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा ऐसी । आह्मीं मरसीं आपण ॥ ४ ॥

१४८५. आतां दोघामध्यें काय । उरलें होय वाणीजसें ॥ १ ॥ निष्ठुर हें केलें मन ।समाधान करूनि ॥ २ ॥ बुगावे तें तर्थीच्या परी। घरिच्याघरीं अवघिया ॥ ३ ॥ तुका म्हणे द्रवपण । गुंडाळून असो दे ॥ ४ ॥

१४८६. आतां येथें खर । नये फिरतां माघारें ॥ १ ॥ होय तैसी हो आवाळी । देहनिमित्य या वेळी ॥ २ ॥ तुम्हांसवें गांठी । देवा जीवाचिये साटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे लंड । करूं चांचामध्यें खंड ॥ ४ ॥

१४८७. ऐसा तंव भोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ १ ॥ मागत्याची टाळाटाळी । झिंज्या ओढोनि कपाळीं ॥ २ ॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ४ ॥

१४८८. माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा मरलेंसे नेणें ॥ १ ॥ नये वचन बाहेरी । उभे तिष्ठतसे द्वारीं ॥२॥ काय मांगा याम वेंचे । गेलें आरंभीं ठायींचे ॥३॥ तुका म्हणे किती । भीड धरावी पुढती॥४॥

१४८९. अहो पुरुषोत्तमा । तुम्हां काशाची उपमा ॥ १ ॥ सतत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धि ॥ २ ॥ जागविलें तरी । तुम्हां व्यक्ति येणें हरी ॥३॥ तुका म्हणे देवा । तुम्हां नित्य दिस नवा ॥ ४ ॥

१४५०. बहु धीर केला । जाण न होसी विठ्ठला ॥ १ ॥ आतां धरीन पदरीं । तुज मज करीन सरी ॥२॥ झालों जीवासी उदार । उभा राहिलों समोर ॥३॥ तुका म्हणे संता । ऐसें मांगा पढरीनाथा॥ ४

१४५१. झाला जिवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥ १ ॥ करीन आडक्या घोंगडें । उभ्या बाजारीं उघडें ॥ २ ॥ जों जों धरिली भीड । तों तों बहु केली चीड ॥ ३ ॥ तुका म्हणे मूळ । तुझें उच्चारीन कुळ ॥ ४ ॥

१४५२. घेतां आणिकांचा जीव । तव्हां कीव कराना ॥ १ ॥ आपलें तें वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥ २ ॥ सेवा तरी

इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥ ३ ॥ तुका म्हणे अरे धन्या । निसंतान्या विठोबा ॥ ४ ॥

१४५३ सांपडला संदीं । मग बळिया पड बंदीं ॥ १ ॥ ऐसी कोणी वाहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥ २ ॥ दाता मागे दान । जाय याचका शरण ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ४ ॥

१४५४. शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ १ ॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तंट ॥ २ ॥ लौकिका बाहेरी । घाली रोखी जया धरी ॥ ३ ॥ तुका म्हणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ४ ॥

१४५५. मानामान किती । तुझ्या क्षुल्लक संपत्ती ॥ १ ॥ जा रे चाळवीं बापुडीं । कोणी धरितील ती गोडी ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि देसी । आम्हीं चुंभळी नव्हों तैसी ॥ ३ ॥ तुका म्हणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ४ ॥

१४५६ वटवट केली । न विचारितां मना आली ॥ १ ॥ मज कराल तें क्षमा । कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥ २ ॥ उचित न कळे । जिव्हा भलतीचि बरळे ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥ ४ ॥

१४५७ वारिलें लिगाड । बहू दिसांचें हें जाड ॥१॥ न बोलावे ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥२॥ जाला चौघांचार । गेला खंडोनी वेव्हार ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥४॥

१४५८ हें का आम्हां सेवा दान । देखो सीण विषमाचा ॥ १ ॥ सांभाळा जी ब्रीदावळी । तुम्ही का कलीसारिखे ॥ २ ॥ शरणांगतें वैऱ्या हातीं । हे निश्चिंती देखिली ॥ ३ ॥ तुका म्हणे इच्छीं भेटी । पाय पोटीं उफराटे ॥ ४ ॥

१४५९ येइल तुझ्या नामा । लाज म्हणे पुरुषोत्तमा ॥ १ ॥ धीर राहिलों धरूनि । त्रास उपजला मनीं ॥ २ ॥ जगा कथा नाव । निराशेनें नुपजे भाव ॥ ३ ॥ तुम्ही साक्ष कीं गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥ ४ ॥

१४६० हें तों वाटलें आश्चर्य । तुम्हां धरवला धीर ॥ १ ॥ माझा फुटतसे प्राण । धांवा धांवा म्हणऊन ॥२॥ काय नेणो दिशा ।

झाल्या तुम्हांविण वोसा ॥ ३ ॥ तुका म्हणे कांगा । नाइकिजे पांडुरंगा ॥ ४ ॥

१४६१ मेरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥ १ ॥ नको वाढूं ऐसें काचें । देवा साचे विठ्ठले ॥ २ ॥ रडत मागें सांडी पोर । न काय थोर माउली ॥ ३ ॥ तुका म्हणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते ऐसे ॥ ४ ॥

१४६२ वाढविलें कांगा । तुम्हीं एवढें पांडुरंगा ॥ १ ॥ काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥ २ ॥ ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥ ३ ॥ निमित्ताचा धणी । तुका म्हणे नेणे कोणी ॥ ४ ॥

१४६३ दार्यांची ओळखी । येइल टाकूं टाका सुखी ॥ १ ॥ तुमचें जाइल इमान । माझें कपाळीं पतन ॥ २ ॥ ठेविला तो ठेवा । आलिलाचें बुडवावा ॥ ३ ॥ मनीं न विचारा । तुका म्हणे हे दातारा ॥ ४ ॥

१४६४ शकुनानें लाभ हानि । येथूनिच कळतसे ॥ १ ॥ भयारूढ जालें मन । आतां कोण विश्वास ॥ २ ॥ प्रीत कळे आलिंगनीं । संपादणी अन्यत्र ॥ ३ ॥ तुका म्हणे मोकलिलें । कळों आलें बरवें हें ॥ ४ ॥

१४६५ बुडता आवरीं । मज भवाचे सागरीं ॥ १ ॥ नको मानूं भार । पाहों दोषांचे डोंगर ॥ २ ॥ आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥ ३ ॥ तुका म्हणे दोषी । मी तों पातकांची राशी ॥ ४ ॥

१४६६ कां गा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥ १ ॥ उभाउभीं पाय जोडी । आतां फांकों नेदी घडी ॥ २ ॥ नको सांडूं ठाव आतां घेऊं नेदी वाव ॥ ३ ॥ तुका म्हणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥ ४ ॥

१४६७ नव्हों गांढे आळसी । जों तूं आम्हांपुढें जासी ॥ १ ॥ भार दिले आम्हां हातीं । वर्म वेवादाचें सत्ती ॥ २ ॥ धरोनियां वाट । जालों शिरोमणि थोंट ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । वादें करीन सर्वी सेवा ॥ ४ ॥

१४६८ जाणतां देवज्ञारा । उभा न राहासी व्यवहारा ॥ १ ॥ हें

तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ २ ॥ आरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥३॥ तुका म्हणे किती । बुडाविलीं आळावितीं ४

१४६९. तुझ्याठायीं ओस । दोन्ही पुण्य आणि दोष ॥ १ ॥ झडलें उरलें किती । आम्हीं धरियेलें चित्तीं ॥ २ ॥ कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ॥ ३ ॥ तुका म्हणे बोला । नाहीं ताळा गा विठ्ठला ॥ ४ ॥

१४७०. आम्ही भांडों तुजसवें । वर्मी धरूं जाले ठावें ॥ १ ॥ होसी सरड बेडुक । वाघ गांढ्याही पाईक ॥ २ ॥ बळ करी तया भ्यावें । पळों लागे तया ध्यावें ॥ ३ ॥ तुका म्हणे दूर परता ! नर नारी ना तूं भूता ॥ ४ ॥

१४७१. कां रे न पावसी धांवण्या । अंगराख्या नारायणा ॥ १ ॥ अंगीं असोनियां बळ । होसी खस्याळ नाट्याळ ॥ २ ॥ आम्ही नरका जातां । काय येइल तुझ्या हातां ॥ ३ ॥ तुका म्हणे कान्हा । क्रियानष्टा नारायणा ॥ ४ ॥

१४७२. नव्हे भिडा हें कारण । जाणें करूं ऐसें जन ॥ १ ॥ जो जों धरावा लौकिक । रडवितोसि आणीक ॥ २ ॥ चला जाऊं संतांपुढें । ते हें निवडती रोकडें ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं निर्लज्ज । आम्हां रोकडी गरज ॥ ४ ॥

१४७३. आम्ही देतां हाका । कां रें जालासी तूं मुका ॥ १ ॥ न बोलसी नारायणा । कळलासी क्रियाहीना ॥ २ ॥ आधीं करूं चौघाचार । मग सांडू भीडभार ॥ ३ ॥ तुका म्हणे शेवटीं । तुम्हां आम्हां घालूं तुटी ॥ ४ ॥

१४७४. काय साहतोसि फुका । माझा बुडाविला रुका ॥ १ ॥ रीण घराचें पांगिलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ २ ॥ चौघांचिया मतें। आधीं खरें केलें होतें ॥ ३ ॥ तुका म्हणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥ ४ ॥

१४७५. पातित मिरासी । ते म्यां धरिलें जीवेंसी ॥ १ ॥ आतां बाळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥ २ ॥ पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे वाव जालें । रोख पाहिजे दाविलें ॥ ४ ॥

१४७६. भांडावें तों हित । ठायीं पडतें उचित ।। १ ।। नये खंडूं देऊं वाद । आम्हां भांडवल भेद ।। २ ।। शब्दासारसें भेटी । नये पडों देऊं तुटी ।।३।। तुका म्हणे आळस । तोचि कारणांचा नास ।।४

१४७७. कासया वांचूनि झालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ।। १ ।। जातां भले काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ।। २ ।। काय मुख पेंव श्वापदांची धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ।। ३ ।। तुका ह्मणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ।। ४ ।।

१४७८. निष्ठुर यासाठीं करितों भाषण । आहेसी सर्वज्ञ जाणता तूं ।।१।। ऐसें दुःख कोण आहे निवारितां । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ।। २ ।। बैसलासी कोण करूनिया धीर । नाहीं येथ उरी दुसऱ्याची ।। ३ ।। तुका ह्मणे आलें अवघेंच दायापें । आतां मायबापें नुपेक्षावें ।। ४ ।।

१४७९. तुज नाहीं शक्ति । काम घेसी आम्हां हातीं ।। १ ।। ऐसें अनुभवें पाहीं । उरलें बोलिजेसें नाहीं ।। २ ।। लपोनियां आड । आम्हां तुझा कैवाड ।।३।। तुका म्हणे तुजसाटीं । आम्हां संवसारेंसी तुटी ।। ४ ।।

१४८०. पावटणी पडणें पायां । उद्धार वायां काशाचा ।। १ ।। घडेल तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां हें ।।२।। न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरड्या ।। ३ ।। अबोल्यानें असे तुका । अंतर एका साक्षी तें ।। ४ ।।

१४८१. आम्ही झालों एकाविध । सुध्या सुधें असावें ।। १ । यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ।। २ ।। घेतलें तें उसणें द्यावें । कांहीं भावें विशेषें* ।। ३ ।। तुका म्हणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसां ।। ४ ।।

१४८२. पराधीन माझें करूनिया जीणें । सांडी काय गुणें केली देवा ।। १ ।। उदार हे किर्ती असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें ।। २ ।। आळवितों परी न पुरेचि रीघ । उचित तो त्याग

* विशेष.

नाहीं तु हां ॥ ३ ॥ तुका म्हणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥ ४ ॥

१४८३. मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥ १ ॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ २ ॥ येथें न सरे चार । हीण आणिक व्यापार ॥ ३ ॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ४ ॥

१४८४. बोलतों निकुरें । नव्हतीं सलगीचीं उत्तरें ॥ १ ॥ माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥ २ ॥ अगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥ ३ ॥ तुज भक्ताची आण देवा । जरि तुका येथें ठेवा ॥ ४ ॥

१४८५. दंड अन्यायाचे माथां । देखोनि करावा सर्वथा ॥ १ ॥ नये उग वहुतां घाटूं । सिंसें सोनियांत आटूं ॥ २ ॥ पाप त्यासाटीं । नीत केली आतां खोटी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥ ४ ॥

१४८६ जाणसी उचित । पांडुरंगा समनीत ॥ १ ॥ तरि म्यां बोलावें तें काई । सेवे ऐसें तुझे पायीं ॥ २ ॥ पालटती क्षण । संचित प्रारब्ध क्रियमाण ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्ता । होसी सकळ करिता ॥ ४ ॥

१४८७. भवसिंधूचें हेंचि तारूं । मज विचारूं पाहतां ॥ १ ॥ चित्तीं तुझे धरीन पाय । सुख काय तें तेथें ॥ २ ॥ माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडालें ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म आलें । हातां भलें हे माझ्या ॥ ४ ॥

१४८८. आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥ मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ २ ॥ न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ४ ॥

१४८९. येणें मार्गे गेलें । त्याचें निसंतान केलें ॥ १ ॥ ऐसी अवघड वाट । कोण सांगावा बोभाट ॥ २ ॥ नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटी ॥ ३ ॥ तुका म्हणे चोर । तो हा उभा कटिकर ॥ १ ॥

१४९० ऐसेंचि हें मन राहतें निश्चल । तरि का तळमळ साठ होती ॥ १ ॥ काय तुमचीं नेणों कवतुक विंदान । सर्वोत्तमपणें

खेळतसां ॥ २ ॥ नानाछंदें आम्हां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा । वाढावया चेष्टा करितसां ॥ ४ ॥

१४९१. कळों आलें तुझें जिणें । देवा तू मा पोसणें ॥ १ ॥ वाट पाहासी आमुची । सत्ता मतन करूंची ॥ २ ॥ आम्हांविना यावें रूपा । सदा निर्गुणींच लपा ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं परदेशी । येथें आम्हां अंग जिमी ॥ ४ ॥

१४९२. काय करूं आतां धरूनियां भीड । निःशंक हे ताड वाजावेलें ॥ १ ॥ नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोन नव्हे हित ॥ २ ॥ आलें तें उत्तर बोलों स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे मना समर्थासी गांठी । घालावी मांडी थापटूनी ॥ ४ ॥

१४९३. चालें दडवन घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥ १ ॥ बैसविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥ २ ॥ तुका म्हणे आहे ठायींचाचि मान । आतां अनुमान कायसा तो ॥ ३ ॥

१४९४. प्राण समर्पिला आम्हीं । आतां उशीर कां स्वामी ॥ १ ॥ माझें फडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥ २ ॥ जाला कंठस्फोट । जवळीं पातलों निकट ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥ ४ ॥

१४९५. तुज काय करूं मज एक सार । अमृतसागर नाम तुझें ॥ १ ॥ काय उणें आम्हां तयाचिये पोटीं । गोविनां हे कठीं कामधेनु ॥ २ ॥ नाळव तानुलें माय ऐसी कोण । वोरसे देखून शोक त्याचा ॥ ३ ॥ जो नाहीं देखिला याचक नयनीं । तो पात्रें घेऊनि लज्जा दान ॥ ४ ॥ नामासाठीं प्राण मांडियेला रणीं । शूर तें आडणी न फिरती ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं गातां गीतीं भला । भेटीनें विठ्ठला काय चाड ॥ ६ ॥

१४९६. चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपाशीं सांग आधीं ॥ १ ॥ तरीच पंढरिराया करीन साटेवाटी । नेघे जया तुटी येईल तें ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज

आस मुक्तीचीही ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥ ४ ॥

१४९७. भले लोक नाहीं सांडीत वोळखी । हे तों झाली देखी दुसऱ्याची ॥१॥ असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोढवलें ॥ २ ॥ समर्थासी काय कोणें हें म्हणावें । आपुलिया जावें भोगावरी ॥३॥ तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥ ४ ॥

१४९८. आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥ काय झालें तरी नेघा तुम्ही भार । आणिक कोणा थोर ह्मणो सांगा ॥ २ ॥ पंचभूतें तंव चर्माचिया मोटा । येथें खरा खोटा कोण भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ४ ॥

१४९९. माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥ १ ॥ सहस्र नामाचें रूपडें । भक्तकैवारी चोखडें ॥ २ ॥ साक्षीवीण बोलें । तरि मज पाहिजे दंडिलें ॥३॥ तुका म्हणे माल । माझा खरा हा विठ्ठल ॥४

१५०० उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आता आमुचा दावा ॥ १ ॥ कैसा जासी सांग आतां मजपासूनि । केलें वाताहात दिलें संसारा पाणी ॥ २ ॥ अवघी आवरूनी तुझें घ्यावली पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां चरणीं घातली मिठी । पाडिली ते पडो तुह्मां आह्मांसी तुटी ॥ ४ ॥

१५०१. माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता । पळसी पंढरीनाथा । भेणे आतां तयाच्या ॥ १ ॥ तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणीवसी । एक संपादिसी । मान करिसी येकात ॥ २ ॥ तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज म्यां कोडें । रे सांकडें घालावें ॥ ३ ॥ भोगाधिपति क्रियमाण । तें तुज नागवें आझून । तरि कां वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥ ४ ॥ तुज न होतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥ ५ ॥ तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा । तुका म्हणे ऐसा । कांहीं न धरी संकोच ॥ ६ ॥

१५०२. मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ १ ॥

म्यां तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥ २ ॥ आम्हीं घ्यावें नाम । तुम्हां समाधान काम ॥ ३ ॥ तुका म्हणे देवराजा । वाद खंडीं तुझा माझा ॥ ४ ॥

१५०३. न करीं तुमची सेवा । बापुडें मीपणें देवा । बोलिलों तो पाववा । पण सिद्धी सकळ ॥ १ ॥ आणीक काय तुम्हां काम । आम्हां नेदा तरी प्रेम । कैसे धर्माधर्म । निश्चयेसीं रहाती ॥ २ ॥ आम्हीं वेंचलों शरीरें । तुम्ही बीज पेरा खरें । संयोगाचें बरें । गोड होतें उभयतां ॥ ३ ॥ एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी बळी । स्वामीविण शोभेना ॥ ४ ॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होईन सरता । संतामाजीं पोसणा ॥ २ ॥ ठविलें उधारा । वरी काय तो पातेरा । तुका म्हणे बरा । रोकडाचि निवाड ॥ ६ ॥

१५०४. बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धराच ॥ १ ॥ आतां काशासाठीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ २ ॥ तुम्हां आम्हां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ ३ ॥ तुका म्हणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ४ ॥

## करुणापर अभंग.

१५०५. संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥ म्हणऊनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥ बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥ वेढियलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ४ ॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दीस झालों कासाविस ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ॥ ६ ॥

१५०६. सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदां घातलासे । हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारीं असे रया ॥ १ ॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडवीं आतां । माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा हे तुज न करितां ॥ २ ॥ आविसें मीन लावियला गळीं । भक्ष तो गिळी म्हणूनियां । काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बाप माये कवण रया ॥ ३ ॥ पक्षी

पिलयां पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते बळें । मरण सायासें नेणे धांवोनि वोरसे । जीवित्वा नास जाली बाळें ॥ ४ ॥ गोडपणें मासीं लिगाडीं गुंतली । सांपडे फडफडी अधिकाधिक । तुका म्हणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घाली ॥ ५ ॥

१५०७. सुटायाचा कांहीं करितों उपाय । तों हें दुखे पाय गोवियेलें ॥ १ ॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी । हारपली बुद्धि बळ माझें ॥ २ ॥ प्रारब्ध क्रियमाण संचिताचे । वोढत ठायींचे आले साचे ॥ ३ ॥ विधिनिषेधाचे सांपडलों चेपे । एक एका लोंपे निवडेना ॥ ४ ॥ सारावें तें वाढे त्याचियाची अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी जालों ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥ ६ ॥

१५०८. भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ १ ॥ ऐसा पडिलों काचणी । करीं धांवा म्हणउनि ॥ २ ॥ विचारितां कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥ ४ ॥

१५०९. अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ १ ॥ घातलें वचन न पडोचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची ॥ २ ॥ मज याचकाची पुरविली आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ ३ ॥ नाशिली आशंका माझ्या जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ५ ॥

१५१०. बोलाविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥ मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ २ ॥ संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥ ३ ॥ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥४॥ तुका म्हणे तैसी होते मज परी । न देखें अंतरीं प्रेमभाव५

१५११. श्वाना दिली सवे । पायांभोंवतें तें भोंवे ॥ १ ॥ तैसी जाली मज परी । वसें निकट सेजारीं ॥ २ ॥ जेवितां जवळी । येऊनियां पुसे घोळी ॥ ३ ॥ कोपेल तो धणी । तुका म्हणे नेणें मनीं ॥ ५ ॥

१५१२. मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी । विदित पायांपाशीं

सर्व आहे ॥ १ ॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुम्ही याचा ॥ २ ॥ आपलें तो येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वाहीं पडों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ४ ॥

१५१३. कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥ १ ॥ हें तों नसावें अंतरीं । आम्हां धरायाचें दुरी ॥ २ ॥ स्तुति तैसी निंदा । माना समाचि गोविंदा ॥ ३ ॥ तुका म्हणे बोलें । मज तुम्हीं शिकविलें ॥ ४ ॥

१५१४. जन पूजी याचा मज कां आभार । हा तुम्ही विचार जाणां देवा ॥ १ ॥ पत्र कोण मानी वंदितील सिक्का । गौरव सेवका त्याचि मुळें ॥२॥ मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ ३ ॥ आतां तूं भोगितां सर्व नारायणा । नको आम्हां दीना पीडा करूं ॥ ४ ॥ आपुलिया हातें देसील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हां ॥ ५ ॥

१५१६. पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं । वागविलों करीं धरोनियां ॥ १ ॥ आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥ २ ॥ नेदी वारा अंगीं लागों आघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥ ३ ॥ तुका म्हणे बोल करितों आवडी । अविट तेचि गोडी अंतरींची ॥ ४ ॥

१५१७. मजपुढें नाहीं आणीक बोलतां । ऐसें कांहीं चित्ता वाटतसे ॥ १ ॥ याचा कांहीं तुम्हां देखावा परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ २ ॥ कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥ ४ ॥

१५१८. काळावरी घालूं तरि तो सारिसा । न पुरतां इच्छा दास कैसे ॥ १ ॥ आतां नाहीं कांहीं उसिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥ २ ॥ देणें लागे मग विलंब कां आड । गोड तरि गोड आदि अंत ॥ ३ ॥ तुका म्हणे होईल दर्शनें निश्चिंता । गाईन तें गीतीं ध्यान मग ॥ ४ ॥

१५१९. काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां

दाविली ते ॥ १ ॥ खरी करूनियां देई माझी आळी । येऊनि कुरवाळीं पांडुरंगे ॥ २ ॥ आणीक म्यां कोणा म्हणावावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥ ३ ॥ तुका म्हणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥ ४ ॥

१५२०. नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळयाचा वाद करीतसें ॥ १ ॥ कासयानें बळ करूं पायांपासीं । भाकावी ते दासीं करुणा आम्हीं ॥ २ ॥ काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ॥ ३ ॥ लांचावल्यासाठीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळी जवळी मन ॥ ४ ॥ वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥ ५ ॥ तुका म्हणे माझी येथेंचि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥ ६ ॥

१५२१. तातडीनें आम्हां धीराचि न कळे । पाळावे हे लळे लवलाहे ॥ १ ॥ नका कांहीं पाहों सावकाशीं देवा । करा एक हेवा तुमचा माझा ॥ २ ॥ वोरसाचा यावा सांभाळावी प्रीत । नाहीं राहो येत अंगीं धदा ॥ ३ ॥ तुका म्हणे मज नका गोवूं खेळा । भोजनाची वेळा राखियेली ॥ ४ ॥

१५२२. इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप । आम्हांसी स्वरूप स्थिती चाड ॥ १ ॥ आतां नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥ २ ॥ लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येते दुरी धरावया ॥ ३ ॥ लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगूं नका ॥ ४ ॥ घेसी आढेवेढे मुक्तीच्या अभिळासें । चाळवीं जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥ ५ ॥ तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥ ६ ॥

१५२३. झालिया दर्शन करीन मी सेवा । आणिक कांहीं देवा नलगे दुजें ॥ १ ॥ प्रारब्धा आधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं ॥ २ ॥ येगा येगा येगा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी ॥ ३ ॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामीं रूपीं गोडी लावियेली ॥ ४ ॥ काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥ ५ ॥ काय लोखंडाचे पाहे

गुणदोष । शिवोनि परिस सोनें करी ॥ ६ ॥ तुका म्हणे माझी अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ७ ॥

१५२४. तुझा दास मज म्हणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥ १ ॥ हेंचि आतां लागें करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ २ ॥ होउनी निर्भर राहिलों निश्चिंत । पावनपतित नाम तुझें ॥३॥ करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥४॥ तुका म्हणे तुज काय तें अशक्य । तारिता मशक मज दीना ५

१५२५. भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरी नाम तुझें ॥ १ ॥ सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची ॥ २ ॥ तुझा दास म्हणवीन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥ ३ ॥ कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा म्हणऊनि ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आम्हां तया ॥ ५ ॥

१५२६. आणीक पाखांडें असती उदंडें । तळमळिती पिंडें आपुलिया ॥ १ ॥ त्याचेथा बोलाचा नाहीं हा विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥ २ ॥ दृढ एक चित्तें झालों या जीवासी । लाज सर्वविशीं तुम्हांसी ते ॥ ३ ॥ पीडों नेदी पशु आपुले अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥ ४ ॥ तुका म्हणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येईल तुम्हां ॥ ५ ॥

१५२७. जेथें जातों तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळां लाभ कांहीं ॥ १ ॥ कपाळींची रेखा असती उत्तम । तरि कां हा श्रम पावतों मी ॥ २ ॥ नव्हेचि तुम्हांस माझा अंगिकार । थीता संवसार अंतरला ॥ ३ ॥ भोग तंव झाला खरा भोगावा तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥ ४ ॥ कोठें तुझी कीर्ति आइकिली देवा । मुकतों कां जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

१५२८. न घडे मायबापा बाळकाचा घात । आपणांदेखत होऊं नेदी ॥ १ ॥ कां मीं मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥ २ ॥ वर्म जाणें त्याच्या हिताचे उपाय । तहान भूक वाहे कडिये खांदीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥ ४ ॥

१५२९. नलगे मायेसी बाळ निरवावें । आपल्या स्वभावे ओढे त्यासी ॥ १ ॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥ २ ॥ गोड धड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥ खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनिया स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥ त्याच्या दुःखे पडे आपण खापरीं । लाही तळी वरी होय जैसी ॥ ५ ॥ तुका म्हणे देह विसर आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥ ६ ॥

१५३०. आम्हासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥ मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ २ ॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ ३ ॥ सुख ठेवी आम्हासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ४ ॥ आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशी भिडे ॥ ५ ॥ तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरीं नावेमधीं ॥६॥

१५३१. देह तंव आहे प्रारब्धा अधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥ १ ॥ सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥ २ ॥ लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥ ३ ॥ तुका म्हणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥ ४ ॥

१५३२. तुज दिलें आतां करी यत्न याचा । जीवभाव वाचाकायामन ॥ १ ॥ भागलों दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ २ ॥ नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतांही कोणी कांहीं माझी ॥ ३ ॥ वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ४ ॥ येरझारी फेरा सिणलों सायासी । आतां हृषीकेशी अंगीकारीं ॥ ५ ॥ तुका म्हणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ६ ॥

१५३३. नेणें गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिती तुझ्या पायीं ॥ १ ॥ कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ २ ॥ नेणे निरसूं पापपुण्य नेणे काय । म्हणऊनि पाय धरिले तुझे ॥३॥ वेडा मी अविचारी न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज कारितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ५ ॥

१५३४. भक्तिसुख आलें नाहीं अनुभवा । तों मी ज्ञान देवा काय करूं ॥ १ ॥ नसावें जी तुम्हीं कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥ २ ॥ एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥ ४ ॥

१५३५. न कळे तों काय करावा उपाव । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥ येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ २ ॥ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कै गा देवा ॥ ३ ॥ लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥ ४ ॥ तुका म्हणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा

१५३६. नाहीं जप तप जीवासी आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ १ ॥ निजलिया ठायीं फोकारिला धांवा । सांकडे तें देवा तुज माझें ॥ २ ॥ नाहीं आणूनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हीं वेंचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें मायबापें ॥ ४ ॥

१५३७. पुढलियां सुखें निंब देता भले । बहुत मारलें होय दुःख ॥ १ ॥ हें तों वर्म असे माउलीच्या हातीं । हाणी मारी प्रीती हितासाठीं ॥ २ ॥ खेळतां विसरे भूक तहान घर । धरूनियां कर आणी बळें ॥ ३ ॥ तुका म्हणे पाळी तोंडींचिया घांसे । उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥ ४ ॥

१५३८. मार्ग चुकले विदेशी एकले । तयावरी झालें दिशाभुली ॥ १ ॥ हातीं धरूनियां पावाविलें घरा । त्याच्या उपकारा काय द्यावें ॥२॥ तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा म्हणऊनि ॥ ३ ॥ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ ४ ॥ उष्ण, तहान भूक एवढे आकांतीं । वोसंगा लाविती काय म्हूण ॥ ५ ॥ खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्यायहि मोठे साच केले ॥ ६ ॥ हातींचा हिरोनि घातला पाठीमी । तुका म्हणे ऐसी परि जाली ॥ ७ ॥

१५३९. ऐसें भाग्य कई लाहता होईन । अवघें देखें जन ब्रम्हरूप ॥ १ ॥ मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलाव-

ती ॥ २ ॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिकां ॥ ३ ॥ विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगित ज्वाळ अग्नि जैसा ॥४॥ भक्ति नवविधा भाव शुद्ध वरी । अळंकारावरी मुगुट मणी ॥ ५ ॥ तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायण तुजविण ६

१५४०. आळिकरा कोठें साहातें कठीण । आपुला तें प्राण देऊं पाहे ॥ १ ॥ सांभाळावें मायवापें कृपादृष्टी । पीडितां तें दृष्टी देखों नये ॥ २ ॥ अंतरलों मागें संवसारा हातीं । पायांपें सरती झालों नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हीं विचारा जी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥ ४ ॥

१५४१. न पाहें माघारें आतां परतोनि । संसारापासूनि विटला जीव ॥ १ ॥ सामोरा येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥ २ ॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळताही बरें वाटईल ॥ ३ ॥ तुका म्हणे कंठ दाटला या सोसे । न पवेचि कैसें जवळी हे ॥ ४ ॥

१५४२. करितां विचार । तो हा दृढ संसार । ब्रह्मादिकां पार । नुलंघवे सामर्थ्यें ॥ १ ॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना । आलें तें वचना ।–पाशीं माझ्या सामर्थ्य ॥ २ ॥ पाठीवरी मोळी । तोचि कळवा पायीं तळीं । सांपडला जाळीं । मत्स्य जाला तो न्याय ॥ ३ ॥ आतां करीन तांतडी । लाभाची ते याच जोडी । तुका म्हणे ओढी । पायां सोई मनाची ॥ ४ ॥

१५४३. सिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवी संसारापासोनियां ॥ १ ॥ न सुटेचि बाकी नव्हें झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥ २ ॥ मायबापें माझी जीवांची सांगातीं । तीं देतील हातीं काळाचिया ॥ ३ ॥ पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥ ४ ॥ पाठी पोटीं एकें लागलीं सरसीं । नेतीं नरकापाशीं ओढूनियां ॥ ५ ॥ जन साह्यभूत असे या सकळा मी एक निराळा परदेशी ॥ ६ ॥ कोणा काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥ ७ ॥ तुका म्हणे मज तुझाची भरंवसा । म्हणऊनि आशा मोकलिली ॥ ८ ॥

१५४४. स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पाडिभर अति-

शय ॥ १ ॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ २ ॥ येउनियां आड ठाके लोकलाज । तों हें दिसे काज अंतरलें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ॥ ४ ॥

१५४५. बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । ठाकोनियां मनीं आला सीण ॥ १ ॥ आतां पायांपाशीं लपवावें देवा । नको पाहूं सेवाभक्ती माझी ॥ २ ॥ बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आलों घायवटें फिरोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे सिगे भरूं आलें माप । वियोग संताप झाला तुझा ॥ ४ ॥

१५४६. आजिवरी होतों संसाराच्या हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ १ ॥ तुम्हां शरणागत व्हावें नारायणा । अंगीकारा दीना आपुलिया ॥ २ ॥ विसरलों काम याजसाठीं धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥ ३ ॥ तुका म्हणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं झाली तैसी ॥ ४ ॥

१५४७. कैसा तूं देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंतां होळी नारायणा ॥ १ ॥ तेणें लोभें जीव जालासे बराडी । आम्हां ऐसी जोडी कई लाभों ॥ २ ॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभावितां ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ४ ॥

१५४८. *आतां मी अनन्य येथें अनधिकारी । होईन कोणे परी नेणों देवा॥१॥पुराणींचा अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ २ ॥ इंद्रियांची आम्ही पांगिलों अंकित । त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसें ॥ ३ ॥ येकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी मोकलिसी आतां । तरी मी अनंता वायां गेलों ॥ ५ ॥

१५४९. अवघ्या पातकांची मीचि एक रासी । अवघा तूं होसी सर्वोत्तम ॥ १ ॥ जैसा तैसा करणें लागे अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥ २ ॥ अवघेंचि मज गिळियेलें काळें । अवघींच बळें

* मी तों सर्वभावें अनधिकारी । होईल कैसी परी नेणों देवा ॥ १ ॥

तुझें अंगीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां खुंटला उपाय । अवघाचि पाय तुझे मज ॥ ४ ॥

१५५०. ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥ म्हणोनि अवघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ २ ॥ वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं ॥३॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥ ४ ॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुरु ॥ ५ ॥ तुका म्हणे मज कोणाचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ।६।

१५५१. मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध । आरालिया बद्ध ठेवा आम्हां ॥ १ ॥ वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ २ ॥ गाणे गीत आम्हां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ ३ ॥ तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत । नसता तूं अनंत सानुकूळ ॥ ४ ॥

१५५२. साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥ १ ॥ मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनि । नाम तो सजनीं आवडीचा ॥ २ ॥ भोजनाची चिंता माय वाहे बाळा । आम्हां तरी खेळावरि चित्त ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ४ ॥

१५५३. किती विवंचना करीतसें जीवीं । मन धांवडवी दाही दिशा ॥ १ ॥ कोणा एका भावें तुम्हीं अंगीकार । करावा विचार याच साठीं ॥ २ ॥ इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥ ३ ॥ तुका म्हणे लागो अखंड समाधि । जावें प्रेमबोधीं बुडोनियां ॥ ४ ॥

१५५४. मोलाचें आयुष्य वेचतसे सेवे । नुगवतां गोवे खेद होतो ॥ १ ॥ उगवूं आलेति तुम्ही नारायणा । परिहार सिणा निमिपांत ॥ २ ॥ लिगाडाचे मासी न्यायें जाली परी । उरली ते उरी नाहीं कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे लाहों मागीं वाचाबळें । ओढियेलों काळें धांव घाली ॥ ४ ॥

१५५५. नव्हे मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता त्यारू ॥ १ ॥ तुम्हां आळवावें पाउलापाउलीं । कृपेची साउली करीं

२३६५. भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥ १ ॥ येथूनियां तुठवुं माथा । मरणावांचूनि सर्वथा ॥ २ ॥ होई बळकट । माझ्या मना तूं रे धीट ॥ ३ ॥ तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्या जाली धणी ॥ ४ ॥

२३६६. जग ऐसें बहुनांवें । बहुभावें भावना ॥ १ ॥ पाहीं बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ॥ २ ॥ कारियासी जें कारण । तें जतन करावें ॥ ३ ॥ तुका म्हणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ॥ ४ ॥

२३६७. अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ १ ॥ रूपाच्या आठवें दोन्हीही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ॥ २ ॥ पूजा तरि चित्तें कल्पावें ब्रह्मांड । अहाच तो खंड एकदेसी ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा अनुभव यापरि । डोई पायांवरि ठेवीतसें ॥ ४ ॥

२३६८. एका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुन कर तुम्हां ॥ १ ॥ तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ॥ २ ॥ आमुच्या जीवींचा तोचि जाणे भाव । रखुमाईचा नाहो पांडुरंग ॥ ३ ॥ चित्त माझें त्याचे गुंतलेसें पायीं । म्हणऊनि कांहीं नावडे त्या ॥ ४ ॥ तुका म्हणे मज न साहे मीनती । खेद होय चित्तीं भंग मना ॥ ५ ॥

२३६९. नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । एकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥ आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । कराविला वाद तैसा केला ॥ २ ॥ देहपिंड दान दिला एकसरें । मुळिंचे तें खरें टांकसाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥ ४ ॥

२३७०. न मनावी चिंता तुम्हीं संतजनीं । हिरा स्फटिकमणी केंवि होय ॥ १ ॥ पडिला प्रसंग स्थळां त्या सारिखा । दाखिला पारिखा भाव कांहीं ॥ २ ॥ बहुतांसी भय एकाचिया दंडें । बहुत या तोंडें वचनासी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं वैखरी बासर । करावया चार वेडे वेडे ॥ ४ ॥

२३७१. एका जी संतजन । सादर मन करूनि ॥ १ ॥ सक-

ळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ॥ २ ॥ विशेषता कांशाहुनी । मेविल्या पाणी आगळी ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बैसोनि ॥ ४ ॥

२३७२. जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलता बोबडे शब्द गोड ॥ १ ॥ आपुले आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वांटे ॥ २ ॥ तुका म्हणे काय देऊं परिहार । काय ते साचार जाणे संत ॥ ३ ॥

२३७३. आरूप माझी वाणी बोबडी उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पायी ॥ १ ॥ करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥ २ ॥ आधारें वदली प्रमादाची वाणी । उच्छिष्ट-सेवनी तुमचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे हाचि करितों विनंती । मागें न पुढती सेवादान ॥ ४ ॥

२३७४. हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ १ ॥ अंतःकाळीं येती माझ्या सोडवणें । मस्तक बैसणें देइन त्यांसी ॥ २ ॥ आणिक सोइरे सज्जन ते कोणी । वैष्णवावांचोनि नाहीं मज ॥ ३ ॥ देइन आलिंगण धरीन चरण । सर्वस्वासी प्राण नाम तेणें ॥ ४ ॥ कंठीं तुळसीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भव नदीचे ॥ ५ ॥ तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हे वैकुंठी नाहीं मज ॥ ६ ॥ अळसें दंभें भावें हरीचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥ ७ ॥ कायावाचामनें देइन क्षेम त्यांसी । चाड जीविताची नाहीं मज ॥ ८ ॥ हरीचें नाम मज म्हणविती कोणी । तया सुखा धणी धणीवरी ॥ ९ ॥ तुका म्हणे तया उपकारें बांचलों । म्हणऊनि आलों शरण संतां ॥ १० ॥

२३७५. घेसी तरी घेई संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥ सर्वभावें त्याचें देव भाडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ २ ॥ करिसील तो करीं संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥ ३ ॥ बैससील तरी बैस संतांमधीं । आणिक ते बुद्धी नको मना ॥ ४ ॥ जासी तरी जाई संतांचिया गावा । होईल विसावा तेथें मना ॥ ५ ॥ तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेई ॥ ६ ॥

२३७६. बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य झाली बुद्धि संचितासी ॥ १ ॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण झालें संतां पायीं ॥ २ ॥ त्रासिलें दरिद्रें दोषा झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत झाला ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥ ४ ॥

२३७७. डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ १ ॥ संतसंगें सारूं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ २ ॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ ३ ॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥ ४ ॥ मुक्त व्हावें काशासाठीं । कैची येणें रसें तुटी ॥ ५ ॥ तुका म्हणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥ ६ ॥

२३७८. गुणांचाचि सांठा । करूं न वजों आणिका वाटा ॥ १॥ करिती छंद नानापरी । भरोनि सिणती आडभरी ॥ २ ॥ नेमिली पंगती । आम्हां संताची संगती ॥ ३ ॥ तुका म्हणे लीळा । येर कवतुक पाहों डोळां ॥ ४ ॥

२३७९. काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥ काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥ अमंगळपणें कंटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ॥ ३ ॥ लेववीं आपुले अंगें अळंकार । संतोषा ये फार देखोनियां ॥ ४ ॥ तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हां लाज थोरी अंकिताची ॥ ५ ॥

२३८०. नव्हती माझे बोल जाणा हा निर्धार । मी आहें मजूर विठोबाचा ॥ १ ॥ निर्धारा वचन सोडाविलें माझ्या । कृपाळूवें लज्जा राखियेली ॥ २ ॥ निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गाडावली वाचा नामघोषें ॥ ३ ॥ आतां भय माझें नासलें संसारीं । जालोंसें यावरी गगनाचा ॥ ४ ॥ तुका म्हणे हा तों संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ॥ ५ ॥

२३८१. हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥ १ ॥ कडिये देव वाहे खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ २ ॥ सरती येणें आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ॥ ३ ॥ तुका म्हणे समाधान । सदा मन आमुचें ॥ ४ ॥

२३८२. जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावोचि ना ॥ १ ॥ तुम्ही संत सारे कृपेचे सागर । निरोप हा फार सांगा देवा ॥ २ ॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायापें विठ्ठला ठेवीं मज ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ॥ ४ ॥

२३८३. येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥ वैकुंठीं-च्या लावूं वाटा । सर्व सांठा ते ठायीं ॥ २ ॥ येथींचिया नाशिवंतें । काय रितें चाळवूं ॥ ३ ॥ तुका म्हणे वैष्णवजन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

२३८४. सर्वपक्षीं हरि साहे सखा जाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला ॥ १ ॥ सहजचाली चालतां पायावाटे । चिंतामणी-समान होती गोटे ॥ २ ॥ तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥ ३ ॥

२३८५. पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥ २ ॥ नव्हे हा उपदेश । तुमचे वडवाडिलों शेष ॥ ३ ॥ तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥ ४ ॥

२३८६. कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥ सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ॥ २ ॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥ ३ ॥ इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि ॥ ४ ॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥ ५ ॥ तुका म्हणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥ ६ ॥

२३८७. विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वहावें भार माथां ॥ १ ॥ साधनें संकटें सर्वांलागीं शीण । व्हावा लागे क्षीण अहंभाव ॥ २ ॥ भाव हा कठिण वज्र हे भेदवे । परि न छेदवे माया-जाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म भजनेंचि सांपडे । येरासी तें पडे वोस दिशा ॥ ४ ॥

२३८८. सकळ पूजा स्तुति । करावी ते व्हावी याती ॥ १ ॥ म्हणऊनि वारा जन । संत पुजा नारायण ॥ २ ॥ सेवावें तें बरी । दावी उमटूनि ढेंकरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सुरा । दुधा म्हणतां केवीं बरा ॥ ४ ॥

२३८९. पडोनियां राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥ १ ॥ नलगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ॥ २ ॥ सहज ते स्फीती । उपदेश पर युक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ४ ॥

२३९०. जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें संतसंगें ॥ १ ॥ पुर्वपुण्यें जरि होती सानूकूळ । अंतरायमूळ तुटे तेथें ॥ २ ॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतापाशीं द्यावा जीव ॥ ४ ॥

२३९१. बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिचि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥ १ ॥ म्हणवी म्हणियारा तयाचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥ २ ॥ असे भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी । मागें मागें हिंडतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥ ४ ॥

२३९२. शुद्धचर्या हें संताचें पुजन । लागताचि धन नाहीं वित्त ॥ १ ॥ सगुणाचे साई सगुण विश्रांति । आपणाचि येती चोजवीत ॥ २ ॥ कीर्तनींच वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास सान्निधता ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म सांगतों सवेगें । मन लावा लागे स्वहिताच्या ॥ ४ ॥

२३९३. भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥ १ ॥ शिकल्या बोलाचा धरिशील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥ २ ॥ हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संता तैसी ॥ ३ ॥ सरिता वोहोळ गंगा सागरा समान । लेखी तयाहून अधम नाहीं ॥ ४ ॥ आणीक अमुप होती तारांगणें । * रवीसी समान लेखू नये ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं नम्रता अंगीं । नव्हे तो फिरंगी कठिण लोह ॥ ६ ॥

२३९४. हरिजनाची कोणा न घडावी निंदा । साहात गोविंदा

* रविशशिमाने.

नाहीं त्याचें ॥ १ ॥ रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयकर खळां कष्ट ॥ २ ॥ दुर्वास हा छळूं आला अंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ॥ ३ ॥ द्रौपदीच्या क्षोभे कौरवांची शांति । होऊनि श्रीपति साह्य केली ॥ ४ ॥ न साहेचि वस्त्र पांडवां पारिखा । दुरा- विला सखा बळिभद्र ॥ ५ ॥ तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ६ ॥

२३९५. उपकारी असे आरोनी उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ २ ॥ जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निवळचि रासि गुणां- चीच ॥ ३ ॥ तुका म्हणे देव तयाचा पांगिला । न भरें संचला धीर सदा ॥ ४ ॥

२३९६. चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेसी खापर काय होय ॥ १ ॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ २ ॥ तुका म्हणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ॥ ३ ॥

२३९७. संतांचें गुणदोष आणितां या मना । केलिया उगाणा सुकृताचा ॥ १ ॥ पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाढव तो ॥ २ ॥ तुका म्हणे गंगे अग्नीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥ ३ ॥

२३९८. संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर- फोडी ॥ १ ॥ बासर तो भुंके गाढवाचे परी । उडे पाठीवरी *यम- दंड ॥ २ ॥ समर्था नेणें तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे काय वांया चाळवणी । पिट पिट घाणी हागवणीची ॥ ४ ॥

२३९९. संताचा अतिक्रम । देव पूजा तो अधर्म ॥ १ ॥ येती दगड तैसे वरी । मंत्रपुष्प देवाशिरीं ॥ २ ॥ अतीतासी गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । ताडण भेदकाची सेवा ॥ ४ ॥

---

* दंड नेणे.

२४००. अवघा भार वाटे देवा । संतसेवा न करितां ।। १ ।। कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ।। २ ।। चुकलोंसा दिसे पंथ । गेलें संत तो ऐसा ।। ३ ।। तुका म्हणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ।। ४ ।।

२४०१. दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ।। १ ।। धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकां वारि ।। २ ।। मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ।। ३ ।। तुका म्हणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ।। ४ ।।

२४०२. झाविली महारें । त्याची व्याली असे पोरें ।। १ ।। करी संतांचा मत्सर । कोपे उभारोनि कर ।। २ ।। बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ।। ३ ।। तुका म्हणे ठावें । ऐसें झालें अनु- भवें ।। ४ ।।

२४०३. भुंकुनियां सुनें लागे हत्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ।। १ ।। काय त्या मशकें तयासी करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ।। २ ।। मातले *माकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तेणें ।। ३ ।। तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ।। ४ ।।

२४०४. संतांची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पाडिल्या प्रसंगें ऐसें काजि ।। १ ।। संकल्प ते सदा स्वामिचेचि चित्तीं । फांको नये वृत्ती अखंडित ।। २ ।। दास्यत्व तें असे एकाविय नांवें । उरों नयें जीवें भिन्नत्वेंसी ।। ३ ।। निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे ते पेरी तये वेळीं ।। ४ ।।

२४०५. कासयासी व्हावें आम्ही जीवन्मुक्त । सांडुनियां थीत प्रेमसुख ।। १ ।। वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असों सुखी ।। २ ।। काय त्या गाठींचें पडलें सुटोन । उगोचि बैसोन धीर धरूं ।। ३ ।। सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ।। ४ तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन त्या संतां समागमें ।। ५ ।।

---

* बोकड.

२४०६. देव ते संत देव ते संत। निमित्य त्या प्रतिमा ॥ १ ॥ मी तों सांगतसें भावें। असो ठावें सकळां ॥ २ ॥ निराकारी ओस दिशा। येथें इच्छा पुरतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे रोकडें केणें। सेवितां येणें पोट धाय ॥ ४ ॥

## कीर्तनपर अभंग.

२४०७. अमंगळ वाणी। नये आइकों ते कानीं ॥ १ ॥ जो हे दूषी हरिची कथा। त्यासी क्षयरोगव्यथा ॥ २ ॥ याति वर्णं श्रेष्ठ। परि तो चांडाळ पापिष्ठ ॥ ३ ॥ तुका म्हणे पाप। माय न आवडे ज्या बाप ॥ ४ ॥

२४०८. अवीट हे क्षीर हरिकथा माउली। सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें। येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥ २ ॥ पतित पातकी पावनपंगती। चतुर्भुज होती देवा ऐसे ॥ ३ ॥ सर्व सुखें तया मोहोरती ठाया। जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ४ ॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत। धरूनियां प्रीत गायनाची ॥ ५ ॥ तुका म्हणे केली साधना गाळणी। सुलभ कीर्तनीं होऊनि ठेला ॥ ६ ॥

२४०९. आणीक नका करूं चेष्टा। व्हाल कष्टा वरपडी ॥ १ ॥ सुखें करा हरिकथा। सर्वथा हे तारील ॥ २ ॥ अनाथाचा नाथ देव। अनुभव सत्य हा ॥ ३ ॥ तुका म्हणे बहुतां रीती। धरा चित्तीं सकळ ॥ ४ ॥

२४१० आनंदें कीर्तन कथा करी घोष। आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग। येथें नाहीं लाग कळिकाळाचा ॥ २ ॥ स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका। रामकृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥ उच्चारितां दुजे वाटे मज लाज। उपदेश काज आन नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे मन रंगलेंसें ठायीं। माझे तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

२४११. कथा करोनियां द्रव्य देती घेती। तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना। नये नारायणा करुणा त्यांची ॥ २ ॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग। तप्तभूमी अंग लोळ-

विती ॥ ३ ॥ तुका म्हणे तया नरक न चुकती । सापडलें हातीं यमा चिया ॥ ४ ॥

२४१२. कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥ १ ॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ॥ २ ॥ मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ॥ ३ ॥ तुका म्हणे करी ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥ ४ ॥

२४१३. कथाकाळींची मर्यादा । सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा । हेंचि एक आवडे ॥ १ ॥ टाळ वाद्य गीत नृत्य । अंतःकरण प्रेमभरित । वाणिता तो कीर्त । तद्भावनें लेखावा ॥ २ ॥ नये अळसें मोडूं अंग । कथे कानवडे कुंग । हळणेंचा रंग । दावील तो चांडाळ ॥ ३ ॥ तोंडीं विडा मानें ताठा । थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा । गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ४ ॥ कथे इच्छी मान । दावूनियां थोरपण । रजा संकोचून । लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥ ५ ॥ आपण बैसे बाजेवरी । सामान्य हरीच्या दासा धरी । तरि तो मुळावरी । वाहिजेल निश्चयें ॥ ६ ॥ येतां न करी नमस्कार । कर जोडोनिया नम्र । न म्हणतां थोर । आणिका खेटी तो चांडाळ ॥७॥ तुका विनवी जना । कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा । ऋणी समर्पक भावें ॥ ८ ॥

२४१४. कथा देवाचें ध्यान । कथा साधना मंडण । कथेऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ २ ॥ मंत्र स्वल्प जना । उच्चारितां वाचे मना । म्हणतां नारायणा । क्षणें जळती महा दोष ॥ ३ ॥ भावें करितां कीर्तन । तरे तारी आणिक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ॥ ४ ॥

२४१५. * कथा सुख करी कथा मुक्त करी । कथा याची बरी विठोबाची ॥ १ ॥ कथा पाप नासी उद्धरिलें दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ २ ॥ कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान

* कथा दुःख हरी.

हरिकथा ॥ ३ ॥ कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥ ४ ॥ तुका म्हणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा कथे ॥ ५ ॥

२४१६. कथेचा उल्लंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा तो ॥ १ ॥ कासया जीऊन जाला भूमीभार । अनउपकार मातें कुशीं ॥ २ ॥ निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥ ३ ॥ तुका म्हणे दोन्हीं बुडविलीं कुळें । ज्याचें तोंड काळें कथेमाजी ॥ ४ ॥

२४१७. कथे बैसोनि सादर । सुखचर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणिक नर सुगमें ॥ १ ॥ पुण्य घ्यावें रे फुकाचें । पाप दुष्ट वासनेचें । पेरिल्या बिजाचें । फळ घेइ शेवटीं ॥ २ ॥ कथा विरस पाडी आळस । छळण करूनि मोडवी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसी नावेसी ॥ ३ ॥ सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी । गाहो म्हणे हरी । विनंती करी तुका हे ॥ ४ ॥

२४१८. करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण ॥ १ ॥ मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाची क्रोधा ॥ २ ॥ शांतिखर्ग हातीं । काळासी ते नागवती ॥ ३ ॥ तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंता-सारिखा ॥ ४ ॥

२४१९. कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम । चरणरज वंदिता ॥ १ ॥ जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारी नर । गाती एकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥ २ ॥ तीर्थे तया ठाया । येती पुनीत व्हावया । पर्व काळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥ ३ ॥ अनुपम्य हा महिमा । नाहीं यावया उपमा । तुका म्हणे ब्रह्मा । नेणे वर्णूं या सुखा ॥ ४ ॥

२४२०. कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहु येणें ॥ १ ॥ नीचयेही कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ २ ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ट वाणी । मुख सवदणी रज-काचो ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ॥ ५ ॥

२४२१. कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥ प्रेमें छंदें नाचे डोले । हारपले देहभाव ॥ २ ॥ एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥ ३ ॥ तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥ ४ ॥

२४२२. कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं असे ॥ १ ॥ भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ॥ २ ॥ त्रैलोक्यभ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ॥ ३ ॥ नारद मंजूळ सुस्वरें गीत गाय । मार्गीं चालताहे संगें हरि ॥४॥ ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ५ ॥

२४२३. खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शकेचि ना ॥ १ ॥ खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ॥ २ ॥ पालथे घागरी रिचवितां जळ । तुका म्हणे खळ तैसे कथे ॥ ३ ॥

२४२४. गायत्री विकोनी पोट जे जाळिती । तयां होय गती यमलोकीं ॥ १ ॥ कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ॥ २ ॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गति कैसी होय ॥ ३ ॥ कैसी होय गती तेच हो जाणती । आम्हांसी संगती नलगे त्यांची ॥ ४ ॥ आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । नलगे दुराचारी तुका म्हणे ॥ ५ ॥

२४२५. जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥ २ ॥ तट्टावृषभासी दाणा । तृण मार्गी नये जाणा ॥ ३ ॥ तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

२४२६. जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥ १ ॥ हेंचि बळिवंत गाढें । आनंद करूं दिंडीपुढें ॥ २ ॥ कलि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जाऊं । बळें दमामेही लावूं ॥ ४ ॥

२४२७. टाळघोळ सुख नामाचा गजर । घोष जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥ गरुडटके दिंडीं पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां

॥ २ ॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥३॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर। नष्ट खळ नर *लुब्ध होती॥४॥ तुका म्हणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेंचि वाट ॥ ५॥

२४२८. त्या हरिदासांची भेटी घेतां । नरका उभयतांसी जाणें ॥ १ ॥ माते परीस थोर कथा । भाड घेतां न लाजे ॥ २ ॥ देतां घेतां नरकवासा । उभयतांसी रवरव ॥ ३ ॥ तुका म्हणे नरकगांवा । जाती हांवा धरोनि ॥ ४ ॥

२४२९. दया क्षमा शांती । तेथें देवाची वसति ॥ १ ॥ पावे धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥ २ ॥ कीर्तनाचे वाटे । वराडया ऐसा लोटे ॥३॥ तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे॥४॥

२४३०. दीन आणि दुर्बळांसी । सुखरासी हरिकथा ॥ १ ॥ तारूं भवसागरींचें । उंचनीच अधिकारी ॥ २ ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आवडी धरी । कृपा करी म्हणऊनी ॥ ४ ॥

२४३१ धीर तो कारण । साह्य होतो नारायण । नेदी होऊं शीण । वाहू चिंता दासांसी ॥ १ ॥ सुखें करावें कीर्तन । हर्षे गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन । आपणाचि कळिकाळा ॥ २ ॥ जीव वेची माता । बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा ॥ ३ ॥ हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें । तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच नय कारणा ॥ ४ ॥

२४३२. न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागर त्रिपुटीं । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥ भाविक रमाये भोळे गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ २ ॥ जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंदा ॥ ३ ॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ॥ ४ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा हा ऋणी । पाहतां आगमीं पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ६ ॥

---

* शुद्ध

२४३३. न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आम्हासी हें सोपें गीतीं गातां ॥ १ ॥ न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरी ॥ २ ॥ जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा विटे ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आम्हां संपुष्टीं भक्तिभावें ॥ ४ ॥ तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळे । जीं होतीं निर्मळ अंतर्बाहीं ॥ ५ ॥

२४३४. न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥ १ ॥ न वजे वांया कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥ २ ॥ न वजे वांयां कांहीं केलिया तीर्थ । अथवा का व्रत वांयां न वजे ॥ ३ ॥ न वजे वांयां झालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वांयां न वजे ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥ ५ ॥

२४३५. नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥ १ ॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेंसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आम्हां ॥ २ ॥ गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ ३ ॥ तुका म्हणे कडू वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ४ ॥

२४३६. पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या त ॥ १ ॥ तमाखू ओढोनि काढील जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥ २ ॥ कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडुक होउनि येईल जन्मा ॥ ३ ॥ जयाचिये मनीं कथेचा कांटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ॥ ४ ॥ जाच होती पाठी उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका म्हणे ॥ ५ ॥

२४३७. बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥ १ ॥ अभयाचे जावें ठाया । देवराया प्रतापें ॥ २ ॥ साधनाचा नलगे पांग । अवघें माग कीर्तनें ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥ ४ ॥

२४३८. बोलाचें गौरव । नव्हे माझा हा अनुभव ॥ १ ॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी पांगिली ॥ २ ॥ व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ॥ ३ ॥ दाटली बोरसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ॥ ४ ॥

विष्णु जोडी कर । माथां रज वंदी हर ॥ ५ ॥ तुका म्हणे बळ । तोडरीं हा कळिकाळ ॥ ६ ॥

२४३९. भूमीवरी कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥ १ ॥ सुखें नाचा हो कीर्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥ २ ॥ काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं । साच माना हे निश्चिंती ॥ ४ ॥

२४४०. भुकेचिया घरा कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥ १ ॥ याचकावेण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥ २ ॥ उदक अन्न काय म्हणे मज खावें । भुकेला तो जाय चोजवीत ॥ ३ ॥ व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ४ ॥ तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ५ ॥

२४४१. यमधर्म सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय हरिकथा । सदा घोष नामाचा ॥१॥ नका जाऊं तया गांवां । नामधारकाच्या शिवां । सुदर्शन यावा । घरटी फिरे भोंवतीं ॥ २ ॥ चक्र गदा घेऊनि हरि । उभा असे त्यांचे द्वारीं । लक्ष्मी कामारी । रिद्धिसिद्धीसहित ॥ ३ ॥ ते बळियाशिरोमणी । हरिभक्त ये मेदिनी । तुका म्हणे कानीं । यम सांगे दूतांचे ॥ ४ ॥

२४४२. या रे नाचों अवघे जण । भावें आनंदें करून ॥ १ ॥ नाऊं पंढरीचा राणा । प्रेम देऊं संतजना ॥ २ ॥ सुख फुकासाठीं । सांधे हरिनाम बोभाटीं ॥ ३ ॥ प्रेम वांटितो उदार । देतां नाहीं सान थोर ॥ ४ ॥ पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशधडी ॥ ५ ॥ तुका म्हणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ॥ ६ ॥

२४४३. लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥ १ ॥ लटिकाचि दंभ घातला दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ॥ २ ॥ लटिकेंचि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥ ३ ॥ लटिकें तें तप लटिका तो जप । अळस निद्रा झोप कथाकाळीं ॥ ४ ॥ नाम नावडे तो करील वोहरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टांचीं वचनें मानितां ही ॥ ६ ॥

२४४४. लावूनियां पुष्टी पोरें । आणी करकर कथेमाजी ॥ १ ॥ पडा पायां करा विनंती । दवडा हातीं धरोनियां ॥ २ ॥ कुर्वाळूनि बैसे मांहें । प्रेम कां हें नाशीतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे चित्त । करा फजित म्हणऊनि ॥ ४ ॥

२४४५. विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलतां ॥ १ ॥ मज न साहावे कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥२॥ हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तोचि वैरी ॥ ३ ॥ सुना काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ॥४॥ अहं म्हणे ब्रह्म । नेणे भक्तीचें तें वर्म ॥५॥ तुका म्हणे क्षण । नको तयाचें दर्शन ॥ ६ ॥

२४४६. साता दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥ १ ॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । परी नामाचा गजर सोडूं नये ॥ २ ॥ शरीराचे होत दोनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सांडो नये ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव वसे ॥ ४ ॥

२४४७. कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥ १ ॥ कोणी व्हारे अधिकारी । त्यासी हरी देईल ॥ २ ॥ अंगीं वैराग्याचें बळ । साही खळ जिणाव ॥ ३ ॥ उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ४ ॥

२४४८. सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥ १ ॥ भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्या सादर चित्त कथे ॥ २ ॥ नाइकवे कानीं साधन उपाय । ऐके तो गाय हरुषें गीत ॥ ३ ॥ नव्हे आगाणूक जावयासी वना । वेध कामी मना हरिकथेचा ॥ ४ ॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्ट प्रहर ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्ही खेळों भातुकलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥ ६ ॥

२४४९. सांडूनि कीर्तन न करी आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥ १ ॥ आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचि लागीं ॥ २ ॥ टाळी वाहूनियां विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा नुपेक्षावें आम्हां । न्यावें निजधामा आपुलिया ॥ ४ ॥

२४५०. सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं

घेउनि नाचा ॥ १ ॥ समाधीचें सुख सांडा ओवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥ २ ॥ पुढती पुढें चढतें सेवन आगळें । भक्ति भाग्य बळें निर्भरता ॥ ३ ॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ४ ॥ तुका म्हणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ५ ॥

२४५१. स्वर्गीचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ॥ १ ॥ नारायणनामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥ २ ॥ वैकुंठींचे जन सदा इच्छिताती । कइं येथें येती हरिचे दास ॥ ३ ॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥ ४ ॥ तुका म्हणे पाववया पैल पार । नाममंत्र सार भाविकांसी ॥ ५ ॥

२४५२. हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥१॥ म्हणोनि हिंडे मागें मागें । घाटी जागे घालितसे ॥ २ ॥ निर्लज्ज लाजे नाचे रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥३॥ तुका म्हणे विकलें देवें । आपणा भावें संतसाटीं ॥ ४ ॥

२४५३. क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नाठवे । पहावया धांवे कोल्हाटासी ॥ १ ॥ कथेसी साक्षेपें पाचारिलें जरी । म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं ॥ २ ॥ बलात्कारें जरी आणिला कथेसी । निद्रा घे टेंडासी टेंकूनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

२४५४. जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥ १ ॥ राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ २ ॥ कीर्तनीं समाधि साधन तें मुद्रा । राहतील थारा धरोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । ओळगती चारी रिद्धिसिद्धि ॥ ४ ॥

## नामपर अभंग.

२४५५. नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥ न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥ ठायींच बैसोन करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा

॥ ३ ॥ रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥ याविण आणीक असतां साधन । वाहातसें आण विठोबाची ॥ ५ ॥ तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी घेतो येथें ॥ ६ ॥

२४५६. नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥ ऐसें धरोनिया ध्यान । मनें करावें चिंतन ॥ २ ॥ ब्रह्मादिकां ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥ ३ ॥ तुका म्हणे सार घ्यावें । मनें हरिरूप पहावें ॥ ४ ॥

२४५७. नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥ १ ॥ ऐसा लाभ बांधा गांठी । विठ्ठलपायीं पडे मिठी ॥ २ ॥ नामापरितें साधन नाहीं । जें तूं करिसी आणिक कांहीं ॥ ३ ॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥ ४ ॥

२४५८. नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥ दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम ॥ २ ॥ नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरती ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम । चैतन्य हें निजधाम ॥ ४ ॥

२४५९. नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥ आणिकें दुरावली करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ २ ॥ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥ ३ ॥ तुका म्हणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ४ ॥

२४६०. हरि म्हणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि म्हणतां ॥ १ ॥ हरि म्हणतां भुक्ति हरि म्हणतां मुक्ति । चुके यातायाती हरि म्हणतां ॥ २ ॥ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि म्हणतां ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुम्हां ॥ ४ ॥

२४६१. लागोनियां पायां विनवितों तुम्हाला । करें टाळी बोला मुखें नाम ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गी नाहीं ॥ २ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ॥ ३ ॥ सकळांसी येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार

हरिनामें ॥ ४ ॥ तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुता ग्रंथीं बोलियेलें ॥ ५ ॥

२४६२. यालागीं आवडी म्हणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ १ ॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चार राम हरि ॥ २ ॥ न लागती कष्ट नलगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ ३ ॥ नलगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥ ५ ॥

२४६३. नाम घेतां वांयां गेला । ऐसा कोणें आईकिला ॥ १ ॥ सांगा विनवितों तुम्हांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ २ ॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा सांवा निवडून ॥ ३ ॥ सलगीच्या उत्तरा । तुका म्हणे क्षमा करा ॥ ४ ॥

२४६४. सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥ १ ॥ तयाच्या चिंतनें निर्मळ सकट । तराल दुर्घट भवसिंधु ॥ २ ॥ जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहर्निशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचें ॥ ४ ॥

२४६५. कामामध्यें काम । कांहीं म्हणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥ १ ॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥ २ ॥ जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवुनि फांसा । काय करणें तें करी ॥ ३ ॥ केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । *तुका म्हणे वर्म । जाणोनियां तरती ॥ ४ ॥

२४६६. कळे न कळे ज्या धर्म । ऐका सांगतो रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चारा ॥ १ ॥ तो या दाखवील वाटा । जया पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोठा । पाहिजे तो कळवळा ॥ २ ॥ पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळावा गोमटा । मोडों नेदी कांटा । रखूं सांटा चोरासी ॥ ३ ॥ तुका म्हणे मोल । नलगे द्यावें वेचा बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥ ४ ॥

---

* तुका म्हणे कर्म । जाळूनियां तरसी ॥

२४६७. विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ १ ॥ वाये टाळ टाळ्या टाळी । होईल होळी विघ्नाची ॥ २ ॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥ ३ ॥ तुका म्हणे विठ्ठल वाणीं । वदा कानीं आइका ॥ ४ ॥

२४६८. ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ १ ॥ म्हणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥ २ ॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवें पुढें क्रियमाण ॥ ३ ॥ तुका म्हणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें शुकराच ॥ ४ ॥

२४६९. नया घडलें सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ १ ॥ कांहीं नलगे शिणावें । आणिक वेगळाल्या भावें । वाचे उच्चारावें । रामकृष्णगोविंदा ॥२॥ फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या नांवें । तोचि होइजे स्वभावें ॥ ४ ॥

२४७०, पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥ १ ॥ मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ ३ ॥ तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

२४७१. जन्मा येऊनि कां रे निदसुरा । जाय भेटी वरा रखुमाइच्या ॥ १ ॥ पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ॥ २ ॥ संतमहंतसिद्धहरिदासदाटणी । फिटती पारणीं इंद्रियांची ॥३॥ तुका म्हणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लुटी घेई ॥४॥

२४७२. उभाउभी फळ । अंगीं मंत्राचिया बळ ॥ १ ॥ म्हणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥ २ ॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे रोग । वारे भवाऐसा भोग ॥ ४ ॥

२४७३. ब्रह्मरस घेई काढा । जेणे पीडा वारेल ॥ १ ॥ पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचे न सेवी ॥ २ ॥ भवरोगा ऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ॥ ३ ॥ तुका म्हणे नव्हे बाधा । आणीक कदा भूतांची ॥ ४ ॥

२४७४. *भक्तिभाव आम्हीं बांधिलासे गांठी । सादावितों हाटीं

*भक्तिभावें.

घ्या रे कोणी ॥ १ ॥ सुखाचिया पेठ घातला दुकान । मांडियेले वान रामनाम ॥ २ ॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवासिंधु ॥ ३ ॥ मागें भाग्यवंत झाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि साटा ॥ ४ ॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका म्हणे चित्त शुद्ध करीं ॥ ५ ॥

२४७५. स्वल्प वाटे चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥ तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदारोळी आनंदें ॥ २ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥ ४ ॥

२४७६. संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें जोडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं न लागती सायास । तरी कां आळस करिसी झणी ॥ १ ॥ ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ २ ॥ पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलोनी परलोका ॥ ३ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । रामराम पद उच्चारिलें । तंव त्या दिनानाथा कृपा आली कैसी । त्यानें तियेसी वैकुंठासी नेलें ॥ ४ ॥ अवचितां नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका म्हणे भावें स्मरतां रामराम । कोण जाणे तये दशे ॥ ५ ॥

२४७७. सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा राम कृष्ण ॥ १ ॥ पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊ येती ॥ २ ॥ अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एक ठायीं ॥ ३ ॥ शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती म्हैसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥ ४ ॥ तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥ ५ ॥

२४७८. ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥ नाशिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा शीण तेंचि फळ ॥ २ ॥ नाव धड करा सहस्र नामांची । जे भवसिंधूचो थडी पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं ॥ ४ ॥

२४७९. सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेद काम निवारूनि ॥ १ ॥ नलगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥ २ ॥ देवाचींच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावा ॥ ३ ॥ तुका म्हणे होय भावेंचि मताषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ४ ॥

२४८०. रामकृष्ण नाम मांडी पां वोळी । तेणें होईल होळी पापा धुनी ॥ १ ॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नाश ब्रह्मरसा ॥ २ ॥ जोडा तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥ ४ ॥

२४८१. गाय नाचे वाहे टाळी । साधन कळी उत्तम हें ॥ १ ॥ काय जाणों तरले किती । नाव आइती या बैसा ॥ २ ॥ सायासाच नाहीं काम । घेतां नाम विठोबाच ॥ ३ ॥ तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ४ ॥

२४८२. नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥ नामेंचि तारिले कोट्यान् हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैसविले ॥ २ ॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्हीं मनीं आठवाना ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

२४८३. अग्नि तापलिया कायाचि होम । तापत्रयें मंतप्त होती । संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसार स्थिति । राहाट घटिका जैसी फिरतांचि राहिली । भरली झाली होती एके रितीं । साधीं हा प्रपच पंचाय अग्न । तेणें पावशी निज शांतीरे ॥ १ ॥ नारायण नाम नारायण नाम । नित्य करीं काम जिव्हा मुखें । जन्म जराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळही दुःखें रे ॥ २ ॥ शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसन समाधी साधी । तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी । भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्मजरादुःखव्याधि । साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधीं रे ॥ ३ ॥ घोकितां अक्षरें अभिमानविधि । निषध लागला पाठी । वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भवि-

ष्यति । दूषणाचें मूळ भूषण तुका म्हणे । सांडीं मिथ्या ख्याती । रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती रे ॥ ४ ॥

२४८४. जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ॥ १ ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नाशी काम ॥२॥ मुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥ ३ ॥ तुका म्हणे ठेवा । कां हा न करीच बरवा ॥ ४ ॥

२४८५. काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ २ ॥ योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥ ३ ॥ तुका म्हणे जपा । मंत्र तीअक्षरी सोपा ॥ ४ ॥

२४८६. चाल केलासा मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ १ ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥ २ ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां नलगे घडी ॥ ३ ॥ केलीं मागें नको *पाहों । तुज जमान आम्हीं आहों ॥ ४ ॥ करीं तुजसीं करवती । आणिक नाम घेऊं किती ॥ ५ ॥ तुका म्हणे काळा । रीघ नाहीं निवती ज्वाळा ॥ ६ ॥

२४८७. युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥२॥ न लगे लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥ तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामेंविण ॥ ४ ॥

२४८८. फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥ १ ॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥ २ ॥ उदंड भावे उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥३॥ तुका म्हणे घरिंच्या घरीं । देशाउरीं न शीणिजे ॥ ४ ॥

२४८९. चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ १ ॥ न करीं आणीक साधन । कष्टसी कां वांयांविण ॥ २ ॥ अठरा पुराणांचें पोटीं । नामाविण नाहीं गोठी ॥ ३ ॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माऊली ॥ ४ ॥ तुका म्हणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारीं ॥ ५ ॥

---

* राहों.

२४९०. फलकट तो संसार । येथें सार भगवंत ॥ १ ॥ ऐसे जागावितों मना । सरसें जनासहित ॥ २ ॥ अवघ निरसूनि काम । ध्यावें नाम विठोबाचें ॥ ३ ॥ तुका म्हण देवाविण । केला शीण तो मिथ्या ॥ ४ ॥

२४९१. न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ न दिसे तें दिसों यईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥ न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ ३ ॥ न भेटें तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥ ४ ॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥ ५ ॥ तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ६ ॥

२४९२ गर्जत जावी नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥ १ ॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळ ॥ २ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ ३ ॥ तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ४ ॥

२४९३. उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥ १ ॥ बरें सेवन उपकारा । द्यावें ध्यावें या उत्तरा ॥ २ ॥ सरळ जाणि मृदु । कथा पाववाते उर्ध्व॥३॥गात जात तुका । ह्याचि उपदेश आइका ॥ ४

२४९४. समुद्रवळयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥ १ ॥ म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रंदिवस रामराम ॥ २ ॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें एकें ॥ ३ ॥ सकळही तीर्थें प्रयागादि काशी । करितां नामाशीं तुळाति ना ॥ ४ ॥ कर्वतीं कर्मरीं देहामी दंडण । करितां समान नये नामा ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥ ६ ॥

२४९५. हित तोंचि एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देहीं ॥ १ ॥ हाचि एक धर्म निज बीज वर्म । हेंचि जाली कर्मे केलीं महा ॥ २ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळा । जेवें कळवळा आवडीचा ॥ ३ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

२४९६. न पालटे एक । भक्त भोळाचि भाविक ॥२॥ येरां नाश आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥ २ ॥ नेणें गर्भवास । एक विष्णूचाचि दास ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ४ ॥

२४९७. काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ १ ॥ म्हणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥ २ ॥ काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ ३ ॥ कोण लोकीं सांग घातला बाहेरी । म्हणतां हरि हरि तुका म्हणे ॥ ४ ॥

२४९८. अनेक दोषांचे काट । जे जे गादलें निर्वाट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ॥ १ ॥ तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा । महादोषांचें छेदना ॥ ध्रु० ॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळीं रतला । क्षण न लागतां नेला । वैकुंठासी हरि म्हणतां ॥ २ ॥ अमित दोषांचें मूळ । झालें वाल्मीकाच्या सबळ । झाला हरिनाम निर्मळ गंगाजळ पै जैसा ॥ ३ ॥ हरि म्हणता तरले । *महादोषी उद्धरिले । पहा गणिकेसी नेलें । वैकुंठासी हरि म्हणतां ॥४॥ हरिविण जन्म नको वांयां । जैसी दर्पणींची छाया । म्हणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥ ५ ॥

२४९९. न धरी प्रतिष्ठा कोणाचीही यम । म्हणतां कां रे राम लाजा झणी ॥ १ ॥ सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळां-वेळां नये वाचे ॥ २ ॥ कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ॥ ३ ॥ तुका म्हणे हित तों हा म्हणा विठ्ठल । न म्हणे तो भोगील कळेल तें ॥ ४ ॥

२५००. झाडें वोरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळा-वेळां ॥ १ ॥ वल्कलें नेसुनि ढुंगा गुंडाळून । सांडी देहभान जव-ळूनीं ॥ २ ॥ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठो-साठीं ॥ ३ ॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ४ ॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥ ५ ॥

*महादोषी गणिके नेले । कुटणी भिल्ला उद्धरिले ।

२५०१. नेत्र झांकोनियां काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ १ ॥ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥ २ ॥ मंत्र यंत्र कांहीं करिसी कुट बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥ ३ ॥ सार तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधु तारक रामकृष्ण ॥ ४ ॥

२५०२. काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ॥ १ ॥ सर्वकाळ वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरी पार नाहीं ॥ २ ॥ रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृतउकळी नाम तुझें ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥ ४ ॥

२५०३. विठोबाचें नाम ज्याचें मुखीं नित्य । त्या देखिलया पतित उद्धरती ॥ १ ॥ विठ्ठलविठ्ठल भावें म्हणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंची ॥ २ ॥ बहुत तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे म्यां ही ऐकोनिया कीर्ति । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥ ४ ॥

२५०४. विचा केला ठोबा । म्हणोनि नांव तो विठोबा ॥ १ ॥ कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदांसि नाहीं ठावें ॥ २ ॥ शेष स्तुति प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग झाला ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्ता । ज्याची काळाचिये माथां ॥ ४ ॥

२५०५. नाम वाचे श्रवणीं कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥ १ ॥ काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ २ ॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामें ॥ ४ ॥

२५०६. तरी कां पवाडे गर्जती पुराणें । असता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥ कीर्तीविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीतना । तरीच म्हणतों आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखीं गुणें ॥ २ ॥ चांगलेंपण हे निरूमता अंगीं । वाणलें श्रीरंगीं म्हणऊनी ॥ ३ ॥ तरीच हा थोर मागितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तरी करितां याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडे ॥ ५ ॥

२५०७. जन्मा येणें घडे पातकाचें मूळ । संचिताचें फळ आपुलिया ॥ १ ॥ मग वांयांविण दुःख वाहों नये । रुसोनिया काय देवावरी ॥ २ ॥ ठाउकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं शीण त्याचा वाहों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्मदुःख ॥ ४ ॥

२५०८. नाम न वदे ज्याची वाचा । तो लेंक दो बापांचा ॥ १ ॥ हेंचि ओळखी तयांची । खूण जाणा अभक्ताची ॥ २ ॥ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ॥ ३ ॥ ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥ ४ ॥ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥ ५ ॥ तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥ ६ ॥

२५०९. नामाविण काय वाउगी चावट । वाया वटवट हरीविण ॥ १ ॥ फुकटची मागे लोकाचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ २ ॥ मेळवूनी चाट करी सुरापान । विषयांच्या गुणें मातलासे ॥ ३ ॥ बैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ४ ॥ बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ५ ॥ तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ६ ॥

२५१०. नाम दूषी त्याचें नको दरुषण । विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥ अमंगळ वाणी नाइकावी कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥ २ ॥ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥ ३ ॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आता या जिभेसी काय करूं ॥ ४ ॥ तुका म्हणे संत न मानिती त्यास । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

२५११. म्हणवितां हरी न म्हणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ॥ १ ॥ आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चिती कामरंगें ॥ २ ॥ नावडे ती कथा देउळामाजी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ॥ ३ ॥ कोण नेतो तया घटिका दिवसा एका । का रे म्हणे तुका नागविसी ॥ ४ ॥

२५१२. मांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करटा ॥ १ ॥

कां रे न घ्यावे हे जन्म । काय वैकुंठा जाऊन ॥ २ ॥ येथें मिळतो दहीं भात । नाहीं वैकुंठीं ते मात ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति नलगे । राहेन संताचिये संग ॥ ४ ॥

२५१३ मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध तें फार तरलें नामें ॥ १ ॥ अशौच तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥ २ ॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥ आणिकां भजना विधि बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तरें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ५ ॥

२५१४. वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एकसरें भवसिंधु ॥ २ ॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥३॥ तुका म्हणे विधिनिषेध लोपला । उच्छेद या झाला मारगाचा॥४

२५१५. वाचे विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाहीं ॥ १ ॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥ २ ॥ न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ ३ ॥ जातां कांटाळे देउळा । तोचि सुना मुखकाळा ॥ ४ ॥ हरिभक्तीविण । जळो त्याचें शहाणपण ॥ ५ ॥ तुका म्हणे तेणें । वंशा आणियलें उणें ॥ ६ ॥

२५१६. विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥ १ ॥ तयासी बोलतां होईल विटाळ । नव्हजाय तो जळस्नान करितां ॥ २ ॥ विठ्ठलनामाचा नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥ ३ ॥ ॥ तुका म्हणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥ ४ ॥

२५१७. नव्हे गुरुदास्य संसारिया । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ १ ॥ म्हणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें । आर्तचाड जीवें । नलगे भ्यावें संसारा ॥ २ ॥ कर्म तंव न पुरे सांसारिक । धर्म तरी फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥ ३ ॥ न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका म्हणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ४ ॥

२५१८. कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥ १ ॥ भलत्या काळीं नामावळी । सुलभ भोळीं भाविकां ॥ २ ॥ प्रायश्चित्तें पडतीं पायां । गाती तयां वैष्णवां ॥ ३ ॥ तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ४ ॥

२५१९. अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं केसा तरे ॥ १ ॥ सकळां जीवामाजि देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ २ ॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥ ३ ॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनीचा ॥ ४ ॥ तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ५ ॥

२५२०. नाम म्हणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करितील कांहीं । बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥ १ ॥ जयाचें राहिलें मानसीं । तेचि पावले तयासी । चाचपडता मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥ २ ॥ नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥ ३ ॥ काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं त्या चांडाळा । नामासाठीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ४ ॥ आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं । फाडोनिया पोटीं । वेद चारी काढिले ॥ ५ ॥ जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकेंही उद्धरिली । पातकी महादोषी ॥ ६ ॥ जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥ ७ ॥ काय सांगों ऐशी *किर्ति । तुका म्हणे नामख्याती । नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एकें ॥ ८ ॥

२५२१. हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥ करितां आठव । धांवोनिया घाली कव ॥ ३ ॥ तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ४ ॥

२५२२. नाम साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ॥ १ ॥ उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥ नाम जपतां चंद्रमौळी ।

---

* किती

नामें तरला वाल्हाकोळी ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठो-बाचे पाय ॥ ४ ॥

२५२३. नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तनें तोचि ठेला ॥ १ ॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥ २ ॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ४ ॥ परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त झाला वाचा उच्चारितां ॥ ५ ॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामाआधीं ॥ ६ ॥ सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ॥ ७ ॥

२५२४. पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारक महिमा ॥ १ ॥ मागें जाली महा दोष । पुढें नाहीं गर्भवास ॥ २ ॥ जें निंदिलें शास्त्रें । वंद्य झालें नाममात्रें ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥ ४ ॥

२५२५. तारिलीं बहुतें चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीका-रितां ॥ १ ॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामा-साठीं ॥ २ ॥ जन्म नाम धरी भक्तांच्या पाळणा । आकार कारणा याचसाठीं ॥ ३ ॥ असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ४ ॥ तुका म्हणे देवभक्तपण सार । कवतुक वेव्हार तयासाठीं ॥ ५ ॥

२५२६. गोड झालें पोट धालें । अवचिता वाचे आलें । म्हणतां पाप गेलें । विठ्ठलमें वाचेसी ॥ १ ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥ २ ॥ चित्त पावलें आनंदा । सुखसनाधीतें सदा । म्हणता गोविंदा । वेळा-वळां वाचेसी ॥ ३ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका म्हणे दावी । रूप तेंचि अरूप ॥ ४ ॥

२५२७. तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ १ ॥ माझ्या बळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ २ ॥ शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ॥ ३ ॥ कूर्मे दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवी पोटीं ॥ ४ ॥ वाराहरूप धरिलें गाढें । धरा

प्रतापें धरिली दाढे ॥ ५ ॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ६ ॥ वामन झाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥ ७ ॥ छेदुनियां सहस्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥ ८ ॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥ ९ ॥ मारोनिया कंसराव । पिता सोडावेला वसुदेव ॥ १० ॥ पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण झाला हरी ॥ ११ ॥ गजेंद्र स्मरे राम राम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥ १२ ॥ तुका म्हणे हरिरूप झालें । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥ १३ ॥

२५२८. भक्तकरुणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ॥ १ ॥ पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ॥ २ ॥ कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ॥ ३ ॥ हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुतां जना तारियेलें ॥ ४ ॥ तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥

२५२९. सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ सर्वांगीं तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥ २ ॥ ऐशी उभविली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ॥ ४ ॥

२५३०. धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ॥ १ ॥ धन्य झालें मुख निवाली रसना । नाम नारायणा घोष करी ॥ २ ॥ धन्य हें मस्तक सर्वांगा शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ॥ ३ ॥ धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळिया शोभले कर दोन्ही ॥ ४ ॥ धन्य तुका म्हणे आम्हांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥ ५ ॥

२५३१. काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्याचें विठोबाचें ॥ १ ॥ तृणीं हुताशन लागतां ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ २ ॥ विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ४ ॥

२५३२. फोडिलीं भांडारें । माप घेऊनियां खरें ॥ १ ॥ केली

हरिनामाची वरो । मागील ते आता मरो ॥ २ ॥ देशांत सुकाळ । झाला हारपला काळ ॥ ३ ॥ त्याचें धणीवरी । तुका म्हणे लहान थोरीं ॥ ४ ॥

२५३३. लागलें भरतें । ब्रह्मानंदाही वरतें ॥ १ ॥ झाला हारेना साचा नाग । गोड लागलें फगार ॥ २ ॥ बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे वाट । बरवी सापडली नीट ॥४॥

२५३४. सत्य साचें खरें । नाम विठोबाचें बरें ॥ १ ॥ येणें तुटती बंधन । उभयलोकीं कीर्ति जेणें ॥ २ ॥ भाव ज्याचे गांठीं । त्यासी लाभ उठाउठी ॥ ३ ॥ तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥ ४ ॥

२५३५. तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ १ ॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥ वसों न शके पाप । जाय त्रिविध तो ताप ॥ ३ ॥ तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ॥ ४ ॥

२५३६. नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ हा ॥ १ ॥ रसना येरां रसां विटे । घेतां घोटें अधिक हें ॥ २ ॥ आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें ॥ ३ ॥ तुका म्हणे आहार जाला । हा विठ्ठल आम्हांसी ॥ ४ ॥

२५३७. निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ १ ॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥ २ ॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥ ४ ॥

२५३८. करील तें काय नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र्य लाज नाहीं ॥ १ ॥ मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणों किती वायां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥ ४ ॥

२५३९. ज्याचे गर्जता पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सहा चौं अठरां जणां ॥ २ ॥ चिंतिन

जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी ॥ ३ ॥ वैकुंठासी जावें । तुका म्हणे ज्याच्या नांवें ॥ ४ ॥

२५४०. नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ॥ गोड हें गोमटें अमृतासी वाड । केला कइवाड माझ्या चित्तें ॥ २ ॥ प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांति । त्रिविध नासती ताप अर्णे ॥ ३ ॥ तुका म्हणे तेथें विकाराची मात । चाली नये हित मक ळाचें ॥ ४ ॥

२५४१. मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥ १ ॥ वैष्णवाचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ॥ २ ॥ भस्म दंड नलगे काठी । तीर्था आटी भ्रमण ॥ ३ ॥ तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

२५४२. विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या साठीं वाचा ॥ १ ॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥ २ ॥ न पाहे शिदोरी । जाती कुळ न विचारी ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटा । हाक देता उठाउठीं ॥ ४ ॥

२५४३. हो का दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ २ ॥ नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥३॥ करी अनाचार । वाचे हरिनाम उच्चार ॥ ४ ॥ हो का भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥ ५ ॥ म्हणवी हरिचा दास । तुका म्हणे धन्य त्यास ॥ ६ ॥

२५४४. भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ॥ १ ॥ येणें एक केलें अवघे होय सांग । अच्युताचा योग नामछंदें ॥ २ ॥ भोंवरे खळाळ चोर वाटा घेती । पावले मारिती सिंवपाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें भावेंविण पार । पाविजे सार हेंचि आहे ॥ ४ ॥

२५४५. जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम ते ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त ते ते घडी ॥ २ ॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभकाळ तोंचि जिणें । भाग्य नारायण उत्तम ते ॥ ४ ॥

२५४६. कस्तूरीचें रूप अति हीनवर । मार्जी असे सार मोल तया ॥ १ ॥ आणीकही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तयां ॥ २ ॥ काय रूपें असे परोस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥ ३ ॥ फिरंगी आटितां नये बारा रूके । गुणें मोलें विके सहस्रवरी ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥ ५ ॥

२५४७. कंठीं नामशिक्का । कळिकाळासी धक्का ॥ १ ॥ राखा माना कीं शिक्का माना । राखा शिक्का तत्समाना ॥ २ ॥ राखा न मना शिक्का न मना । जतन करा नाककाना ॥ ३ ॥ शिक्का न मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ४ ॥ शिक्का मानी हळाहळ । झालें सर्वांग शीतळ ॥ ५ ॥ तुका म्हणे नाम शिक्का । पटीं बैसाविलों निजसुखा ॥ ६ ॥

२५४८. न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ॥ १ ॥ जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल पिकला माझा बाप ॥ २ ॥ आठही प्रहर । बारा मास निरंतर ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । वर्जेना हे घेतां धणी ॥ ४ ॥

२५४९. भोळे भक्त भाव धरितां मानसीं । त्यांसी हृषीकेशी जवळीच ॥ १ ॥ भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया खेदा काय सांगो ॥ २ ॥ गणिकेसारिखीं नामें उद्धरिलीं । सज्ञानें पाडिलीं खटाटोपीं ॥ ३ ॥ तुका म्हणे काय शुद्ध माझी याती । थोर केली ख्याती हरिनामें ॥ ४ ॥

२५५०. आविसाचिये आशा गळ गिळी मासा । फुटोनिया घसा मरण पावे ॥ १ ॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ नये वेळीं ॥ २ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

२५५१. पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥ १ ॥ येर वेठ्या पोट भरी । चाम मसकाचे परी ॥ २ ॥ जेऊनियां तोचि धाला । हरिचिंतनीं केला काला ॥ ३ ॥ तुका म्हणे चवी आलें । जें का मिश्रित विठ्ठलें ॥ ४ ॥

२५५२. लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आस-

विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदूनि ॥ २ ॥ श्रुतीचें कां नेघा फळ । सारमूळ जाणोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥ ४ ॥

३३३९. चालें हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ॥ १ ॥ देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नको ॥ २ ॥ मानसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्ता म्हणों नये ॥ ३ ॥ वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥ ४ ॥ तुका म्हणे विठो भरला सबाह्य । उणें काय आहे चराचरीं ॥ ५ ॥

३३४०. मानअपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावें ॥ १ ॥ हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ २ ॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ ३ ॥ आली उर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥४॥

३३४१. थोडें आहे थोडें आहे चित्त साह्य झालिया ॥ १ ॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरले ते ॥ २ ॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ ३ ॥ तुका म्हणे लटिकें पाहे । सांडीं देह अभिमान ॥ ४ ॥

३३४२. देवाचिये माथां घालुनियां भार । सांडी कलेवर ओंवाळुनि ॥ १ ॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ २ ॥ करुणावचनीं लाहो एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥ ३ ॥ तुका म्हणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ४ ॥

३३४३. आपुला तो एक देव करुनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥ येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसानीं ॥ २ ॥ अविनाश करी आपुलिया ऐसें । लावी मना पिसें गोविंदाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे एका मरणेंचि सरे । उत्तमचि उरे कीर्ति मागें ॥ ४ ॥

३३४४. नेत्र झांकोनिया काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ १ ॥ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥ २ ॥ मंत्रयंत्र कांहीं करिसी बुटबुटी । तेणें भूतसृष्टी पाव

शील ॥ ३ ॥ सार तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ॥ ४ ॥

३३४५. किती चौघाचारें । येथें गोविलें वेव्हारें ॥ १ ॥ असे बांधविले गळे । होऊं न शकती निराळे ॥ २ ॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥ ३ ॥ तुका म्हणे खंडदंडें । येरझारीं लपती लंडें ॥ ४ ॥

३३४६. भेणें पळे ठोळसा । न कळे मृत्यु तो सरिसा ॥ १ ॥ कैसी झाली दिशाभुली । नवजाति ये वाटचाली ॥ २ ॥ संसाराची खंती । मावळल्या तरी शक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे हीना । बुद्धि चुकली नारायणा ॥ ४ ॥

३३४७. जरा कर्णमुळीं सांगों आली गोष्टी । मृत्याचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥ आतां माझ्या मना होई सावधान । ॐपुण्याची जाण कार्यसिद्धि ॥ २ ॥ शेवटली घडी बुडतां नलगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ ३ ॥ तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ४ ॥

३३४८. नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याची बरी *बोली ठायीं ॥ १ ॥ आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साक्ष असे ॥ २ ॥ निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरिता हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे नेमा न टळतां बरें । खऱ्यासीच खरें ऐसें नांव ॥ ४ ॥

३३४९. ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥ संसार करिता म्हणती हा दोषी । टाकिता आळसी पोटपोसा ॥ २ ॥ आचार करिता म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥ ३ ॥ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥ ४ ॥ धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा । समर्थासि ताठा करिताती ॥ ५ ॥ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलता सकळ म्हणती गर्वी ॥ ६ ॥ भेटीसि नवजातां म्हणती हा निष्ठूर । । येतां जातां घर बुडाविलें ॥ ७ ॥ लग्न करूं

---

* बोल

जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥ निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ ॥ लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरे ना संतसंग ॥१०॥ तुका म्हणे आतां आइका वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११॥

३३५०. जळतें संचित । ऐसी आहे धर्मनीत ॥ १ ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोंवेळां मनीं ध्याय ॥२॥ नेदी कर्म घडों । कोठें आडरानें पडों ॥ ३ ॥ तुका म्हणे मळ । राहो नेदी तापजाळ ॥४॥

३३५१. न चलवे पथ वचन नसतां पालवीं । शरीर विटंबिलें वाटे भीक मागावी ॥ १ ॥ न करीं रे तैसें आपआपणां । नित्य राम राम तुम्ही सकळही म्हणा ॥ २ ॥ राम म्हणवितां रांडा पोरें निरविशी । पडसी यमा हातीं जाचवितीं चौऱ्याशीं ॥ ३ ॥ मुखीं नाहीं राम तोही आत्महत्यारा । तुका म्हणे लाज नाहीं तया गव्हारा ॥ ४ ॥

३३५२. थडियेसी निघतां पाषाणाच्या सांगडी । बुडतां मध्यभागीं तेथें कोण घाली उडी ॥ १ ॥ न करीं रे तैसें आपआपणिया । पतंग जाय वांयां जीवें ज्योती घालूनियां ॥ २ ॥ सावधपणें सोमल वाटी भरोनियां प्याला । मरणाअंतीं वैद्य बोलावितो वहिला ॥ ३ ॥ तुका म्हणे करीं रे ठायीचाचि विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥ ४ ॥

३३५३. बरें सावधान । राहावें समय राखोन ॥ १ ॥ नाहीं साराखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥ २ ॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंच भोवनी ॥ ३ ॥ तुका म्हणे राखा । आपणा नाहीं तोंचि वाखा ॥ ४ ॥

३३५४. जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥ १ ॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ २ ॥ आणिकांची मात नाइकावी कानीं । आणिकां नयनीं न पहावें ॥ ३ ॥ चित्तां तुवां पायीं रहावें अखंडित । होऊनि निश्चित एकविध ॥ ४ ॥ चाला पाय हात हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबासी ॥ ५ ॥ तुका म्हणे तुम्हा भय काय करीं । आमुचा कैवारी नारायण ॥ ६ ॥

३३५५. पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयाचे भेद विषय-

रूप ॥ १ ॥ अर्थी परमार्थ कैसा घडों शके । चित्त लोभी भीके सोंग वायां ॥ २ ॥ देवाचें चरित्र दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं राहे अभिलास । दोघां नरक-वास सारिखाचि ॥ ४ ॥

३३५६. पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयांचिया ॥ २ ॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥ कर्वतिला देह कापियेलें मांस । गेले वनवासा शुकादिक ॥ ४ ॥ तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाव जळे ॥ ५ ॥

३३५७. दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व । पांगुरती बरवीं वस्त्रें काळीं ॥ १ ॥ उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रांसी ॥ २ ॥ चाळवुनि रांडा देऊनियां भेप । तुका म्हणे त्यास यमदंडी ॥ ३ ॥

३३५८. अतिवादी लावी । एका बोट सोंग दावी ॥ १ ॥ त्याचा बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ २ ॥ प्रतिपादी वाळी । एका पुजी एका छळी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ४ ॥

३३५९. फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणामोल ॥ १ ॥ पायरी प्रतिमा एकाचि पाषाण । परि तें महिमान वेगळेंचि ॥ २ ॥ तुका म्हणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारखिया ॥ ३ ॥

३३६०. जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥ नको भोंवतालें जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥ २ ॥ कुड्याचे संगती । सदा भोजन पंगती ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ४ ॥

३३६१. अंगी देवी खेळे । कां रे तुम्हांसी न कळे । कोणाचे हे चाळे । सुख दुःख न मानितां ॥ १ ॥ मी तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं । पालटाच घेई । भाव खरा लोपेना ॥ २ ॥ आपुलाले तुम्ही पुसा । सोंवा पेठ्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा ।

काय जाणों विचार ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ । मग तैशी वेळ । कोठें जातें सांपडो ॥ ४ ॥

३३६२. म्हणविती ऐसे आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ॥ १ ॥ ऐसियांचा कोण मानितो विश्वास । निवडे तो रस घाईडाई ॥ २ ॥ पर्जन्याचे काळीं वोहोळाचे नद । ओसरतां बुंद न थारेचि ॥ ३ ॥ हिऱ्याऐशा गारा दिसती दुरोन । तुका म्हणे घन न भेटे तों ॥ ४ ॥

३३६३. भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण नये त्यांचे शिकों ॥१॥ भाविकांनीं दुर्जनांचें । कांहीं मानूं नये साचें ॥ २ ॥ होईल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ४ ॥

३३६४. जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ १ ॥ आधीं आपणयां नासी । तरि उतरे ये कसीं ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें या निश्चयें उत्तर ॥ ३ ॥ तुका म्हणे ते उन्मनी । नाश कारया कारणीं ॥ ४ ॥

३३६५. दाता तोचि एक जाणा । नारायणा स्मरवी ॥ १ ॥ आणीक नाशिवंतें काय । न सरे हाय ज्याच्यानें ॥ २ ॥ यावें तया काकुलती । जे दाविती सुपथ ॥ ३ ॥ तुका म्हणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥ ४ ॥

३३६६. कांहीं जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल शीण संदेहानें ॥ १ ॥ भलतिया नांवें आळावला पिता । तरी तो जाणता कळवळा ॥ २ ॥ अहंकार जातो गौरवितां वाणी । सर्व गात्रां धणी हरिकथा ॥ ३ ॥ तुका म्हणे उपजे विल्हाळ आवडी । करावा तो घडीघडी लाहो ॥ ४ ॥

३३६७. भ्रमणा पाउलें वेचिताती वाव । प्रवेशाचा ठाव एका द्वारें ॥ १ ॥ सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंबावीं क्षणभरी ॥ २ ॥ सुलभ हें केलें सकळां जीवन । फुकावेचि कान न लगे कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें सकळही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥ ४ ॥

३३६८. आणीक या काळें न चले उपाय । धरावे ते पाय विठोबाचे ॥ १ ॥ अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥ २ ॥ अवघे मोकळे अवघिया काळें । उद्धरतीं कुळें नरनारी ॥ ३ ॥ काळ वेळ नाहीं गर्भवासदुःखें । उच्चारितां मुखें नाम एक ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥ ५ ॥

३३६९. बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥ येणें सोसें मन झालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ २ ॥ बंधनापासोनि उकलली गांठी । देतां आली मिठी साव- काश ॥ ३ ॥ तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ४ ॥

३३७०. घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥१॥ तुम्ही घ्यारे डोळे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ २ ॥ तुम्ही आइकारे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥ मना तेथें धांव घेई । राहें विठोबाचे पायीं ॥ ४ ॥ तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

३३७१. ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ १ ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ २ ॥ गुंफोनि चावटी । तेथें कोण लाभभेटी ॥ ३ ॥ * तुका म्हणे काळ । देवाविण अमंगळ ॥ ४ ॥

३३७२. जळो ते जाणीव जळो ते शाहाणीव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥ १ ॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥ २ ॥ जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो मना ध्यान विठो विठ्ठलाचें ॥ ३ ॥ जळों हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥ ४ ॥ तुका म्हणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ५ ॥

३३७३. आणिक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥ १ ॥ भिन्न भेद हे भावना स्वभाव । नव्हे कांहीं देव एक- विध ॥ २ ॥ गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म

---

* तुका म्हणे कळा । देवाविण अमंगळा ॥

अकर्म तें ॥ ३ ॥ तरि भले आतां न करावा संग । दुःखाचे प्रसंग तोडावया ॥ ४ ॥ तुका म्हणे गुण गाई या देवाचे । घेई माझे वाचे हेचि धणी ॥ ५ ॥

३३७४. आतां पुढें धरी । माझे आठव वैखरी ॥ १ ॥ नको वडबडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडोनियां बोल ॥ ३ ॥ तुका म्हणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥ ४ ॥

३३७५. आतां येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवूं दे ॥ १ ॥ तुझे भिडे माझे बहु झाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥ माझें केलें मज पारिखें माहेर । नष्ट तूं साचार चाळावलें ॥ ३ ॥ सुखामाठीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥ ४ ॥ केला चौघाचार नेलों पाचांमधीं । नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां घेईन कांठीवरी । धनी म्यां कैवारी केला देव ॥ ६ ॥

३३७६. आजिवरी होतों तुझे सत्ते खालीं । तोंवरी त्वां केली विटंबणा ॥ १ ॥ आतां तुज राहों नेदीं या देशांत । ऐसा म्यां समर्थ केला धनी ॥ २ ॥ सांपें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणों ॥ ३ ॥ तुका म्हणे हा म्यां बुडविला वेव्हार । तुझेंचि ढोपर सोलावया ॥ ४ ॥

३३७७. चित्ता ऐसी नको देऊं आठवण । जेणें देवाचें चरण अंतर तें ॥ १ ॥ आलिया वचन रामनामध्वनि । एकाची कानीं ऐसी गोडी ॥ २ ॥ मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ॥ ४ ॥ तुका म्हणे राहे अंतरीं शीतळ । शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ॥ ४ ॥

३३७८. सांगतों या मना तें माझें नाइकें । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ १ ॥ म्हणऊनि पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥ २ ॥ काय तें संचित न कळे पाहतां । भतिमंदचिंता उपजते ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पावोनियां वेगीं पार ठाकीं ॥ ४ ॥

३३७९. मायारूपें ऐसें मोहिलेसें जन । भोगिती पतन नाना

कर्मे ॥ १ ॥ काय यांची प्रीती करितां आदर । दुरवितां दूर तेंचि भलें ॥ २ ॥ नाना छंदें अंगीं वसती विकार । छळियेले फार तपोनिधी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें शिकवितों तुज । आतां धरीं लाज मना पुढें ॥ ४ ॥

३३८०. करीं हेंचि काम । मना जपे राम राम ॥ १ ॥ लागो ह्याचि छंद । मना गोविंद गोविंद ॥ २ ॥ तुका म्हणे मना । मज भीक द्यावी दीना ॥ ३ ॥

३३८१. नको धालूं झांसा । मना उपाधी वोळसा ॥ १ ॥ जे जे वाहावे संकल्प । पुण्य तरी तेंचि पाप ॥ २ ॥ उपजतो भेव । होतो कामावीस जीव ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहों । होइल तें निवांत साहों ॥ ४ ॥

३३८२. आतां असो मना अभक्ताची कथा । न होई दुश्चिता हरिनामीं ॥ १ ॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ॥ २ ॥ प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्वकाळ सुखरूप ॥ ४ ॥

३३८३. हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥ १ ॥ तेथें माझ्या मना होईं पक्षीराज । साधावया काज तृप्तीचें या ॥ २ ॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लवकरीच जोडी झालियाची ॥ ३ ॥ तुका म्हणे क्षणक्षणा जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

३३८४. रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ॥ १ ॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ॥ २ ॥ भ्रमणाच्या मोडी वाटा । न भरे फाटा आडरानें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या जीवें । हेंचि घ्यावें धर्णावरी ॥ ४ ॥

३३८५. फजितखोरा मना किती तुज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥ १ ॥ स्नेहवादें दुःख जडलेंसें अंगीं । निष्ठुर हें जगा प्रेमसुख ॥ २ ॥ निंदा स्तुती कोणी करो दया माया । न धरीं चाड या सुखदुःखा ॥ ३ ॥ योगीराज कां रे न राहाती वैसोनी । एकिय

आसनीं याचि गुणें ॥ ४ ॥ तुका म्हणे मना पाहें विचारून । होईं रे कठीण वज्राऐसें ॥ ५ ॥

३३८६. मना एक करीं । म्हणे मी जाईन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहेन सांवळा ॥ १ ॥ करीन सांगसी तें काम । जरी जपसी हें नाम । नित्य वाचे राम । हरी कृष्ण गोविंद ॥२॥ लागें संतांचिया पायां । कथे उल्हास गावया । आलों भागावया । शरण देईं उचित ॥ ३ ॥ नाचें रंगीं वाहे टाळी । होय सादर ते काळीं । तुका म्हणे मळी । सांडूनियां अंतरींची ॥ ४ ॥

३३८७. देवाचिये पाईं देईं मना बुडि । नको धांवों ओढी इंद्रियांचे ॥ १ ॥ सर्व सुखें तथें होतीं एकवेळे । न सरती काळें कल्पांतींही ॥ २ ॥ जाणें येणें खुंटे धांव वेरझार । नलगे डोंगर उसंतावे ॥ ३ ॥ सांगणें तें तुज इतुलेंचि आतां । मानीं धन कांता विषतुल्य ॥४॥ तुका म्हणे तुझे हातीं उपकार । उतरों हा पार भवसिंधु॥५

३३८८. न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंतीं या चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ येथें सुखाचिया अमुपचि राशी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ २ ॥ सुखाचें आतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोह दुःख पाहातां नासे ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें होईल विसांवा । तुटतील * धांवा पुढिलांच्या ॥ ४ ॥

३३८९. प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥ १ ॥ सोस करिसी वांयां । भजे मना पंढरीराया ॥ २ ॥ प्रारब्धेंचि होय सुख प्रारब्धेंचि पावे दुःख ॥ ३ ॥ प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥ ४ ॥

३३९०. अर्धांग माझ्या मना एक एक मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥ १ ॥ हेचि चिंता काय घ्यावें म्हणऊनि । भले तुजहूनि पक्षिराज ॥ २ ॥ पाहा ते चातक नेघे भूमिजळा । वरुष उन्हाळा मेघ तया ॥ ३ ॥ सकळ यतींमध्यें ठक हा सोनार । त्या घरीं व्यापार झारियाचा ॥ ४ ॥ तुका म्हणे जळीं वनीं जीव एक । तयापाशीं लेख काय असे ॥ ५ ॥

---

* हांवा

३३९१. नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळीं ग्रासावया ॥ १ ॥ काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥ २ ॥ * सोडविना राजा देशीचा चौधरी । आणिक सोयरीं भलीं भलीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज सोडविना कोणी । एका चक्रपाणी वांचोनियां ॥ ४ ॥

३३९२. एका एका भाविकजन । व्हाल कोण कोण ते ॥ १ ॥ तार्किकांचा टाका संग । पाडुरंग स्मरा हो ॥ २ ॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥ ३ ॥ कलीमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ४ ॥

३३९३. परिमळें कापुर ताजवा तुळविलें । आणिक नावांची थोडीं । एक तीं कांतिव उभविलीं ववलारें । एकाचिया कुड मेडी । एक दीनरूप आणितीं माळिया । एक तीं वाधाने माडी । अवघियां बाजार एकाचि झाला । सा विकली आपुलाल्या पाडी ॥ १ ॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥ २ ॥ एक गुणें आगळे असती । असोल्य नावाचे खडे । एक समर्थ दुर्बळा घरीं । फार मोलाचे थोडे । एक झगझग करिती वाळवंटी । कोणी न पाहाती तयांकडे । सभाग्य संपन्न आपुलाले परी । सो येक दैन्यवाणें बापुडें ॥ ३ ॥ एक नामें रूप सारिख्या असती । अनेक प्रकार याती । ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें । तयाची तैसीच गात । एक उचपदीं वैसोनि सुखें । दास्य करवी एका हातीं । तुका म्हणे कां मानिती सुख । चुकलियां वाया खती ॥ ४ ॥

३३९४. ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥ १ ॥ नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंचि वरि ॥ २ ॥ दोरें चिरा कापे पडिला कांचणीं । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥ ३ ॥ तुका म्हणे कैचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥ ४ ॥

३३९५. काम घालोनि बळकट । झालों कळिकाळावरी नीट ।

---

* कित्येक प्रतींत आणखी खालील चरण येथ आढळतें. सोडविना बंधु पाठीची बहीण । शेजेची कामीन दूरी राहे ॥

केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥ १ ॥ या रे या रे लहान थोर । याति भलती नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ २ ॥ कामी गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ ३ ॥ एकंदर शिक्का । पाठविला येहीं लोका । आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ॥ ४ ॥

२३९६. आम्ही वैकुंठ वासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥ १ ॥ झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥ २ ॥ अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषयलोभीं मनें । साधन हे बुडविलें ॥ ३ ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळीकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंद ॥ ४ ॥

२३९७. नये माझा तुम्हां होऊ शब्दस्पर्श । विप्र तुम्ही विद्वांस ब्राह्मणांसी ॥ १ ॥ म्हणोनिया तुम्हां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥ २ ॥ वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारूनि ॥ ३ ॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥ ४ ॥

२३९८. कस्तुरी भिनली जये मृत्तिकेसी । तये आणिकासी कैसी सरी ॥ १ ॥ लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ २ ॥ तुका म्हणे मी नवजें यातीवरी । पूज्यमान करी वैष्णवासी ॥ ३ ॥

२३९९. माझा पहा अनुभव । केला देव आपुला ॥ १ ॥ बोलविलें तेंचि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥ २ ॥ सोडिलिया जग निंद । मग गोविंद म्हणियारा ॥ २ ॥ तुका म्हणे धीर केला । तणें याला गोविलें ॥ ४ ॥

२४००. नेणे फुंको कान । नाहीं एकांताचें ज्ञान ॥ १ ॥ तुम्ही आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ २ ॥ नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ ३ ॥ चिंतनाच्या सुखें । तुका म्हणे नेणें दुःखें ॥ ४ ॥

२४०१. आहाच तो मोड वाळलिया मधीं । अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥ १ ॥ म्हणऊनि संग न करीं दुसरें । चित्त मळीन द्वारें

दोड पडे ॥ २ ॥ विषासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तों सकळीक जाणतसां ॥ ३ ॥ तुका म्हणे काचें राहे कुळाकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ५ ॥

३४०२. असंतीं कांटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म तें विकारविरहित ॥ १ ॥ तरि म्हणा त्याग प्रतिपादलासे । अनादि हा असे वैराकार ॥ २ ॥ शिजलें हिरवें एका नांवें धान्य । सेवनापें भिन्न निवडे ते ॥ ३ ॥ तुका म्हणे भूतीं साक्षी नारायण । अवगुणीं दंडण गुणीं पूजा ॥ ४ ॥

३४०३. नये स्तवूं काचें होतें क्रियानष्ट । फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ॥ १ ॥ नाहीं परमार्थ साधत लौकिक । धरुन होतो फिकें अंगा आलें ॥ २ ॥ पारावया पुढें नये घालूं तोंड । तुटी लाभा खंड होतो माना ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी भिरवते परवडी । कामावल्या गोडी अविनाश ॥ ४ ॥

३४०४. अमृत अव्हेरें उचंबळलें जातां । विष आतभूतां आवश्यक ॥ १ ॥ आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ २ ॥ खऱ्याचिये अंगी आपणचि चाली । लावणी लाविली काय लागे ॥ ३ ॥ तुका म्हणे चाड करा ते वमाव । आम्हासी तो वाव धीर आहे ॥ ४ ॥

३४०५. परद्रव्य परकांता । नातळे जयाचिये चित्ता । आगिक कर्मी तो तत्वता । बांधला नवजाय ॥ १ ॥ एगा अनुभव गेकडा । विश्वासीं तो जांवा जोडा । एकांत त्या पुढा । अवधा करी उकल ॥ २ ॥ सकट आंबलें तें अन्न । शोधी तेंचे मद्यपान । विषानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ ३ ॥ तुका म्हणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें द्यावें लागतें ॥ ४ ॥

३४०६ पाषाणप्रतिमा सोन्याच्या पादुका । हें तो हातीं एका समर्थाचे ॥ १ ॥ अनामिका हातीं समर्थाचा शिका । न मानितां लोकां येईल कळों ॥ २ ॥ तुका म्हणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥ ३ ॥

३४०७. रडोनियां मान । कोण मागता भूषण ॥ १ ॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ २ ॥ लाविता लावणी । विके

भीके केज्या दानी ॥ ३ ॥ तुका म्हणे धीरा–। विण कैसा होतो हिरा ॥ ४ ॥

३४०८. उजळितां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योति हिऱ्या अंगीं ॥ १ ॥ एकीं महाकष्टें मेळविलें धन । एकासी जतन दैवयोगें ॥ २ ॥ परिमळें * कळें चंदनाचें चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥ ३ ॥ तुका म्हणे जया अंगीं नामठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥ ४ ॥

३४०९. पापाचिया मुळें । झालें सत्याचें वाटोळें ॥ १ ॥ दोष झाले बळिवंत । नाहीं ऐसी झाली नीत ॥ २ ॥ मेघ पडों भीतीं । पिकें सांडियली क्षिति ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ॥ ४ ॥

३४१०. निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥ १ ॥ असो ज्याचे त्याचे माथां । आपण करावी ते कथा ॥ २ ॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥ ३ ॥ तुका म्हणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥ ४ ॥

३४११. निगमाचें वन । नका शोधूं करूं शीण ॥ १ ॥ या रे गौळियांचे घरीं । बांधलें तें दावेंवरी ॥ २ ॥ पीडलेती भ्रमें । वाटा नकळतां वर्मे ॥ ३ ॥ तुका म्हणे भार ।माथां टाका अहंकार ॥ ४ ॥

३४१२. चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । क्षोभवितें दूर तेंचि भलें ॥ १ ॥ ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची नीत त्यागावरी ॥२॥ हो कां पिता पुत्र बंधु कोणी तरी । विजाति संग्रहीं धरूं नये॥३॥तुका म्हणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥४

३४१३. भक्ति ते कठिण शुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ १ ॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंत तांतडीची ॥ २ ॥ कामावलें तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥ ३ ॥ तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ४ ॥

३४१४. सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥ १ ॥

* केले

आला डोळयांसि कवळ । तेणें मळलें उजळ ॥ २ ॥ अंगाचे भोवंडी । भोय झाडें फिरती धोंडी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥ ४ ॥

३४१५. यथार्थ वाद सांडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ १ ॥ चोरा धरितां सांगे कुठाऱ्याचें नांव । दोघांचेहि पाव हात जाती ॥ २ ॥ तुका म्हणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥ ३ ॥

३४१६. एक तटस्थ मानसीं । एक सहजचि आळसी ॥ १ ॥ दोन्ही दिसती सारखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ २ ॥ एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोंप ॥ ३ ॥ एका सर्वस्वाचा त्याग । एका पोटासाठीं जोग ॥ ४ ॥ एका भक्ति पोटासाठीं एका देवासवें गांठी ॥ ५ ॥ वर्म पोटीं एका । फळें दोन सांगे तुका ॥ ६ ॥

३४१७. चित्त समाधान । तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥ बहु खोटा अतिशय । जाणा भले सांगों काय ॥ २ ॥ मनाच्या तळमळें । चंदनेंही अंग पोळे ॥ ३ ॥ तुका म्हणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ४ ॥

३४१८. भूतीं भगवंत । हा तों जाणतों संकेत ॥ १ ॥ भारी मोकलितो बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥ २ ॥ करावा उपदेश । निवडोनि तरि दोष ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे । चुकतां आ_रानें कांटे ॥ ४ ॥

३४१९. हेंहि ऐसें तेंही तैसें । उभय पिसें अविचार ॥ १ ॥ अभिमानाचे ठेलाठेलीं । मधीं झालीं हिंपुटा ॥ २ ॥ धांग शांती ठाव नुरे । हाचि उरे आबाळया ॥ ३ ॥ कौतुक हें पाहे तुका । कढतां लोकां अधर्णी ॥ ४ ॥

३४२०. निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥ १ ॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडूनि सकळ ॥ २ ॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें झालें चित्ता ॥ ३ ॥ तुका झाला सांडा । विटाबती पोरें रांडा ॥ ४ ॥

३४२१. हित सांगे तेणें दिलें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥ १ ॥ बळें हे वारावे अधर्म करितां । अंधळे चालतां

आदरानें ॥ २ ॥ द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥ ४ ॥

३४२२. आपुली कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक पुटा ॥ १ ॥ नाहीं कोणासवें बोलणें लागत । निश्चितीनें चित्तसमाधान ॥ २ ॥ लपविलें तेंही ढेंकरें उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥ ३ ॥ तुका म्हणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव फळा येतो ॥ ४ ॥

३४२३. अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ॥ १ ॥ नव्हती हाततुके बोल । मूळ ओल अंतरींची ॥ २ ॥ उतरूनि दिलें कशी । शुद्धरसीं सरतें ॥ ३ ॥ तुका म्हणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली ॥ ४ ॥

३४२४. क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥ तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥ २ ॥ तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ ३ ॥

३४२५. ज्याची जया आस । तया जवळी त्याचा वास ॥ १ ॥ येर जवळी तें दुरी । वत्स सांडी धेनु घरीं ॥ २ ॥ गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥ ३ ॥ तुका म्हणे बोल । घडे तया ठायीं मोल ॥ ४ ॥

३४२६. संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येतो ॥ १ ॥ मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥२॥ तुका म्हणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥ ३ ॥

३४२७. एका म्हणतां भलें । आणिका सहजाचि निंदिलें ॥ १ ॥ कांहीं न करितां सायास । सहज घडले ते दोष ॥ २ ॥ बरेंवाइटाचें । नाहीं मज कांहीं साचें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥ ४ ॥

३४२८. करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥ १ ॥ तैसें झालें दोघा-

जणां । मागतिया यजमाना । जाळियलें वना । आपणासहित कांचणी ॥ २ ॥ घडतां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतिया ॥ ३ ॥ चोर दिधला साटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका म्हणे ताठा । हें तव दोषें नाडती ॥ ४ ॥

३४२९. सतीचें तें घेतां वाण । बहु कठीण परिणामीं ॥ १ ॥ जिवासाठीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥ २ ॥ जरि होय उघडी दृष्टी । तरिच गोष्टी युद्धाच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे अगा येतां । तरी सत्ता धैर्याची ॥ ४ ॥

३४३०. न म्हणे सान थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥ १ ॥ सकळा द्यावी एकी चवी । तहान हरूनि निववी ॥ २ ॥ न म्हणे दिवस राती । सर्व काळ सर्वांभूतीं ॥ ३ ॥ तुका म्हणे झारी । घेता नांद्यानें खापरी ॥ ४ ॥

३४३१. योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ १ ॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा झालिया ॥ २ ॥ मिरासीचें म्हूण शेत । नाहीं देत पीक उगें ॥ ३ ॥ तुका म्हणे उचित जाणा । उगीं शिणा कासाला ॥ ४ ॥

३४३२. द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । म्हणोनियां संग खोटा त्याचा ॥ १ ॥ निरयाचें मूळ घालूनियां मागें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ २ ॥ आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा । पुढील भार देवावरी घाला ॥ ३ ॥ प्रारब्ध काहीं न पालटे सोनें । तृष्णेचें हें पिसें वांयांविण ॥ ४ ॥ तुका म्हणे घेई गोड ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥ ५ ॥

३४३३. जीवन्मुक्त ज्ञानी जरि झाले पावन । त्यजावा दुर्जन-संग तिहीं ॥ १ ॥ बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघेंचि तेणें विष होय ॥ २ ॥ तुका म्हणे जेणें आपुलें स्वहित । तैसी करा नीत विचारूनि ॥ ३ ॥

३४३४. विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानीं अंतीं ॥ २ ॥ बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें । कृपा करिजेते देवें ॥ ४ ॥

३४३५. चालिले सोबती । काय मानिली निश्चिंती ॥ १ ॥ काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥ २ ॥ कांहीं सावध तों बरवा । करीं आपुला काढावा ॥ ३ ॥ चालिले अगळे । हळूच कान केश डोळे ॥ ४ ॥ वोसरले दांत । दाढा गडबडल्या आंत ॥ ५ ॥ एकली तळमळे । जिव्हां * भलतेंचि चावळे ॥ ६ ॥ तुका म्हणे यांणीं । तुझी मांडिली घालणी ॥ ७ ॥

३४३६. आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया पूज्य होईजेतें ॥ १ ॥ अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥ २ ॥ तुका म्हणे नाहीं आणिकासी बोल । वांयां जाय मोल बुद्धिपाशीं ॥ ३ ॥

३४३७. शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥ १ ॥ येथें केलें नव्हे काई । लंडीपण खोटें भाई ॥ २ ॥ करितां होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥ ३ ॥ तुका म्हणे घडी । साधिलिया एक थोडी ॥ ४ ॥

३४३८. दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकाचें ॥ १ ॥ धर्मनीतीचा हा ऐकावा वेव्हार । निवडिलें सार असार तें ॥ २ ॥ पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ४ ॥

३४३९. मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखे तरी लव धडधडी ॥ १ ॥ न लभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा वेडावली ॥ २ ॥ न पवे धांवणें न पवेचि लाग । न लगेचि माग धरावया ॥ ३ ॥ भेणें तरी अंगा लावियेल्या राखा । तरी त्यासी वाखा करीतसे ॥ ४ ॥ तुका म्हणे हाका मारूं नेदी देवा । लोकांपाठीं हेवा लागलासे ॥ ५ ॥

३४४०. नको होऊं देऊं भावीं अभावना । याचि नांवें जाणा बहु दोष ॥ १ ॥ मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥ २ ॥ उत्तम विभागे कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे

---

* भलतें ठायीं लोळे ।

त्यासी ॥ २ ॥ तुका म्हणे जिणें बहु थोडे आहे । आपुलिया पाहें पुढें बरें ॥ ४ ॥

३४४१. पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥ १ ॥ बांधूं विठ्ठलसांगडी । पोहोनि जाऊ पैल थडी । अवघे जन गडी । घाला उडी भाईनो ॥ २ ॥ हें तों नाहीं सर्वकाळ । अमुप * आनंदाचें जळ ॥ ३ ॥ तुका म्हणे शेरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥४॥

३४४२. विट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजे ना ॥ १ ॥ तरीच तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥२॥ आणिका गुणां पोटीं वाव । दावी भाव आपुला ॥ ३ ॥ तुका म्हणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ४ ॥

३४४३. पूज्या एकासनीं आसनीं आसन । बैसतां गमन मातेशीं तें ॥१॥ सांगतों ते धर्म नीतीचा संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥२॥ संता ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनींच वळसा सांपडला ॥ ३ ॥ तुका म्हणे एकाएकीं वरासन । दुजें तेथें भिन्न अशोभ तें ॥ ४ ॥

३४४४. मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ १ ॥ परनारीचें जया घडेल गमन । दावी तो वदन जननीरत ॥ २ ॥ उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आम्हां पुढती राहूं नये ॥३॥ तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन । घातला ते आण पाळावया ॥ ४ ॥

३४४५. रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरूनी दुरी अधिकारें ॥ १ ॥ जातीचा स्वभाव आला डोळयां आड । तया घडे नाड न कळतां ॥ २ ॥ कामधेनु देखे जैशा गाई म्हैसी । आणिका त्या ऐसी करोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥ ४ ॥

३४४६. भोग तो न घडे संचितावांचूनि । करावें तें मनीं समाधान ॥ १ ॥ म्हणऊनि मनीं मानूं नये खेदू । म्हणावा गोविंदू वेळोवेळां ॥ २ ॥ आणिकां रुसावें नलगे बहुतां । आपुल्या संचिता-

* अमृताचे

वांचूनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे भार घातलियावरी । होईल कैवारी नारायण ॥ ४ ॥

३४४७. मृगाचिया अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥ भाग्यवंत घेती वेचूनियां मोल । भारवाही मेले वाहतां ओझें ॥ २ ॥ चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा ॥ भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंता दृष्टी रत्न जैसें ॥ ४ ॥ तुका म्हणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वांयां जाय ॥ ५ ॥

३४४८. विषम वाट दुरवरी । चालूनि परती धरी । मागील तें उरी । उरली नाहीं भयाची ॥ १ ॥ मुख्य न व्हावा तो नाड । शेवटाचें हातीं गोड । सरलिया चाड । मग कैंचे * उद्वेग ॥ २ ॥ होता पहिला अभ्यास । समयीं घालावया कास । तेव्हां लटिके दोष । योगें अनुतापाच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे आहे । बुद्धि केलीयानें साहे । जवळीच पाहें । देव वाट स्मरणाची ॥ ४ ॥

३४४९. वत्स पळे धेनु धांवे पाठी लागे । प्रीतीचा तो अंगें आविर्भाव ॥ १ ॥ शिकविलें काय येइल कारणा । सूत्र ओढी मना आणिकाच्या ॥ २ ॥ सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । म्हणऊनि लाता मागें सारी ॥ ३ ॥ तुका म्हणे आग्रह करावा न लगे । सांगतसे हा गे अनुभव ॥ ४ ॥

३४५०. भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ १॥ माझी माझी म्हणे एकएका मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥ २ ॥ तुझें थोडे भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥ ३ ॥ तुका म्हणे एके ठायीं आहे वर्म । हेंचि होय श्रम निवारितें ॥ ४ ॥

३४५१. बहुत प्रकार गव्हांचे । जिव्हा नाचे आवडी ॥ १ ॥ सरले परि आवडी नवी । सिंधु दावी तरंग ॥ २ ॥ घेतलें द्यावें वेळोवेळां । माय बाळा न विसंबे ॥ ३ ॥ तुका म्हणे रस वचनीं । पडताळूनि तोचि सेवीं ॥ ४ ॥

---

* उद्योग

३४५२. शक्ती द्याव्या देवा । नाहीं पार्थिवाची सेवा ॥ १ ॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥ मना पोटीं देव । जाणा जैसा तैसा भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥ ४ ॥

३४५३. साधनाचे कष्ट मोठे । भय वाटे थोर हें ॥ १ ॥ मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसालिया ॥ २ ॥ दामा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥ ३ ॥ तुका म्हणे आत्मनिष्ठा । भोग चेष्टा मनाची ॥ ४ ॥

३४५४. करावें चिंतन । तेंचि बरें न भेटून ॥ १ ॥ बरवा अंगीं राहे भाव । * तग तोचि जाणा देव ॥ २ ॥ दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥ ३ ॥ तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥४॥

३४५५. पाहतां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥ १ ॥ नये वाटों गुणदोषीं । मना जतन येविशीं ॥ २ ॥ त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥ ३ ॥ तुका म्हणे धीरें । विण कैसें होतें बरें ॥ ४ ॥

३४५६. परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हलूं नये ॥ १ ॥ थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं वाढविला ॥ २ ॥ पितियाने तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देव वसे ॥ ३ ॥ तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ४ ॥

३४५७. सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ १ ॥ पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥ २ ॥ वेचल्याचा पाहे वगवारि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे जैशी दाखवावी वाणी । ते ग्यावी भरोनी शेवट तों ॥ ४ ॥

३४५८. आदि मध्य अंत दाखविलें दीपें । हा तों आपणापें यत्न बरा ॥ १ ॥ दास्यत्वें दाविलें धन्याचें भांडार । तो तों नव्हे सार घेऊनियां ॥ २ ॥ उपायानें सोस नासला सकळ । सत्तसत्तावळ

---

* तागे, तव

अंगा आलें ॥ ३ ॥ तुका म्हणे दृष्टी सकळांचें शिरीं । वचनेंचि करी बैसोनियां ॥ ४ ॥

३४५९. गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचे संकल्पें ॥ १ ॥ कठिण योगाहुनी क्षेम । बोकलिया होतो श्रम ॥ २ ॥ पात्रलें मरे शिवेपाशीं । क्लेश * उतरत क्लेशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥ ४ ॥

३४६०. आपल्याच फुंदें । जेथें तेथें घेती छंदें ॥ १ ॥ पडिला सत्याचा दुष्काळ । बहु फार झाली घोळ ॥ २ ॥ विश्वाचे माठ । त्याचे कपाळीं तें नाट ॥ ३ ॥ तुका म्हणे घाणा । मूढा तीर्थी प्रदक्षिणा ॥ ४ ॥

३४६१. भोग द्यावे देवा । त्याग भोगींच बरवा ॥ १ ॥ आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥ २ ॥ योजे यथाकाळें । उत्तम पाला कंद मुळं ॥ ३ ॥ वंचकासी दोष । तुका म्हणे मिथ्या सोस ॥ ४ ॥

३४६२. देव होईजत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ १ ॥ दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांठा आपुलाला ॥ २ ॥ ❀ दाखविले परी नाहीं * वर्जिजेता । आला तोचि चित्ता भाग वरी ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळ बीजपात्र ॥ ४ ॥

३४६३. पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाचा ॥ १ ॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥ २ ॥ ऐशीं सहस्र ज्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥ ३ ॥ पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरी इंद्रा आणी चौदा चौकडिया आयुष्यगणना । बधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ५ ॥

३४६४. आवडी येते गुणें । कळों चिन्हें उमटती ॥ १ ॥ पोटींचें ओठीं उभें राहे । चित्त साहे मनासी ॥ २ ॥ डोहोळियाची भूक गर्भा । तांटीं प्रभा प्रतिबिंब ॥ ३ ॥ तुका म्हणे मागून घ्यायें । मना खावें वाटे तें ॥ ४ ॥

---

* उतरती ❀ दुखाविले * वरिजिता

३४६५. लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥ १ ॥ आतां कैसे होय याचें । शिजतां काचें राहिलें ॥ २ ॥ खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥३॥ तुका म्हणे भावहीन । त्याचा शीण पावावा ॥४॥

३४६६. काय दिस गेले अवघेचि वराडें । तें आलें सांकडें कथे-माजी ॥ १ ॥ क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं । अराणूक कई होईल पुढें ॥ २ ॥ कथेचा विसर दोषामुळें होय । तरणोपाय कैंचा मग ॥ ३ ॥ काय सांचवुनि उरलें हें मागें । घटिका एक संगें काय गेली ॥ ४ ॥ तेचि वाणी येथें करा उजळणी । काढावीं मथूनि शब्दरत्नें ॥ ५ ॥ तुका म्हणे हेंचि बोलावया चाड । नाम घेतां गोड हित असे ॥ ६ ॥

३४६७. केला मातीचा पशुपति । परि मातीसी काय महती । शिवपूजा शिवासि पावे । माती मातीमाजी सामावे ॥ १ ॥ तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत । आम्ही किंकर संतांचे दास । संत पदवी नको आम्हांस ॥ २ ॥ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ ३ ॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसें नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसें राहे कांसेंपणें ॥ ४ ॥ ब्रह्मानंद पूर्णामाजी । तुका म्हणे केली कांजी । ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आम्हां पाषाणरूप राहणें ॥ ५ ॥

३४६८. जातिविजातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ २ ॥ व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ ३ ॥ तुका म्हणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥ ४ ॥

३४६९. आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥ १ ॥ आतां सोडोनि भोजन । भिके जावें वेडेपण ॥ २ ॥ उसंतिली वाट । मागें परतावें फुकट ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं ॥ ४ ॥

३४७०. मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ १ ॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ २ ॥ न कळे आवडी ।

कोण आहे कैसी घडी ॥३॥ तुका म्हणे थीतें । दुःख पाववावें चित्तें॥४

३४७१. एकल्या नव्हे खेळ चांग । धरिला संग म्हणऊनि ॥ १॥ उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ २ ॥ दुसऱ्या परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरेंही ॥ ३ ॥ तुका म्हणे कळत्यां कळे । येर खेळे खेळ म्हणो ॥ ४ ॥

३४७२. लोह कफ गार सिद्ध हे सामुग्री । अग्नि टणत्कारी दिसों येतो ॥ १ ॥ सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥ २ ॥ अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाय घेऊं हेवा ॥ ३ ॥ तुका म्हणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ॥ ४ ॥

३४७३. निवडोनि वाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥ जयाचा विभाग तयासीच फळे । देखणें निराळें कौतुकासी ॥ २ ॥ शूर तो ओळखे घायडायहात । येरां होईल मात सांगायाची ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी केळव ते वाणी । केला निजस्थानीं जानवसा ॥ ४ ॥

३४७४. एकीं असे एक हेवा । येर अनावडी जीवां ॥ १ ॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥ २ ॥ प्रीतीसाठीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥ ३ ॥ तुका म्हणे लळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥ ४ ॥

३४७५. अनुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुलें ॥ १ ॥ कैंची चिका दुधचवी । जरी दावी पांढरें ॥ २ ॥ जातीऐसा दावी रंग । बहु जग या नांव ॥ ३ ॥ तुका म्हणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलिया ॥ ४ ॥

३४७६. न सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥ १ ॥ मवित्याचें पोट भरें । पुढिलासी पुढें उरे ॥ २ ॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥४॥

३४७७. निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीते ॥ १ ॥ आतां पुढें भाव सार । जीवना थोर पाहावया ॥ २ ॥ पारखियाचे पडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥ ४ ॥

३४७८. वाखर घेउनि आले । त्यासी तरवारेनें हाले ॥ १ ॥ नव्हे आपुलें उचित । करूनि टाकावे फजित ॥ २ ॥ अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ ३ ॥ नपुंसकासाठीं । तुका म्हणे नलगे जेठी ॥ ४ ॥

३४७९. शिळें खातां आला वीट । सुने धीट पाय धरी ॥ १ ॥ कान्होबा ते जाणे खूण । उन उन घास घाली ॥ २ ॥ आपुले ठायींचें घ्यावें । लाड भावें पाळावा ॥ ३ ॥ तुका म्हणे मी जुनाट सुनें । मोहो तेणें परतला ॥ ४ ॥

३४८०. आम्हां कांहीं आम्हां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥ १॥ मोल सांगा मोल सांगा । घेणें तिहीं गा पुसावें ॥२॥ कैसें घडें कैसें घडें । बडबड तुज मज ॥३॥ मुद्दलें साठीं मुद्दलें साठीं । लाभ पोटीं त्यामधीं ॥४॥ तुका म्हणे साठवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी॥५

३४८१. मोटळें हाटीं सोडिल्या गांठी । विकऱ्या घातले कण । ज्याचे भाग त्यासी देऊनि निवारिलें । सारूनि लिगाड दान । खरें माप हातीं बैसलों । मानिती तेचि चौघे जण । खरें वित्त तेथें आलें चोजवीत । गिऱ्हाईक संतजन ॥ १ ॥ झाडिला पालव केला हाट वेच । झाली सकळींच आराणूक । याल तरि तुम्हीं करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥ २ ॥ एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन । बहुतां जनांचे बहुत प्रकार । वेगळाले वाण । लाभ हाणि कोणा मुद्दल झालें । कोणासी पडिलें खाण । अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिली । थोडे तैसे बहु जन ॥ ३ ॥ एक सांते आले एके गांवींहून । येकामेचि नव्हे जाणें । येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एकी तेणें । लाग भाग एकी एकानीं गोविली । मागील पुढिलां ऋणें । तुका म्हणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें घेणें ॥ ४ ॥

३४८२. नारायण ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥ १ ॥ जेणें भवव्याध तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥ २ ॥ नलगे कांहीं आटी । बाधा राहों न शके पोटीं ॥ ३ ॥ कैवल्य तें जोडे । ❀कृपा लवकरी घडे

❀ पालट

॥ ४ ॥ जन्ममरण दुःख अटें । जाळें अवघेंचि तुटें ॥ ५ ॥ तुका म्हणे झाला । याचा गुण बहुतांला ॥ ६ ॥

३४८३. मान इच्छी तो अपमान पावे । अमंगळ सर्वें अभाग्याची ॥ १ ॥ एकाचिये अंगीं दुजियाचा वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥ २ ॥ आधीक फळासी कोठें पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ॥ ३ ॥ तुका म्हणे राजहंस ढोरा नांवें । काय तया घ्यावें अळंकाराचें ॥ ४ ॥

३४८४. करूनि कडाविड । जमा घडिली लगड ॥ १ ॥ होतें तेचि झालें । नाम ठायींचें पडिलें ॥ २ ॥ उतरलें डाई । उत्तम ते सुलाखताई ॥ ३ ॥ हिंडवितां देशोदेश । तुका म्हणे नाहीं नाश ॥ ४ ॥

३४८५. एक परि बहिरे बरे । परि तीं ढोरें ग्यानगंडें ॥ १ ॥ कपाळासी लागली आगी । अभागी कां जीतसे ॥ २ ॥ एक परि बरें वेडें । तर्की कुडें जळो तें ॥ ३ ॥ तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ४ ॥

३४८६. तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥ १ ॥ एका शोभवावे । केलें कवतुक देवें ॥ २ ॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥ ३ ॥ तुका म्हणे धुरें । डोळे भरिले परि [illegible] ॥ ४ ॥

३४८७. तीर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥ १ ॥ मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ॥ २ ॥ तीर्थीं भाव फळे । येथें [illegible] ॥ ३ ॥ तुका म्हणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥४॥

३४८८. [illegible] आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण हा [illegible] येथील ॥ १ ॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित । होईल करीत । आला अधिकारी तो ॥ २ ॥ काय पाहातां [illegible] । पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा [illegible] ॥ ३ ॥ [illegible] आहे । तेच अंतरीं जो लाहे । तुका म्हणे [illegible] ॥ ४ ॥

३४८९. देवपण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ॥ १ ॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥ २ ॥ पाहे सांगे

आणि जेवी । अंतर महदंतर तेवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ४ ॥

३४९०. मुदलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ १ ॥ आणिकांची कां लाज नाहीं । आळसा जिहीं जिंतिलें ॥ २ ॥ एके सांते सारिखीं वित्तें । हानि हिते वेगळालीं ॥ ३ ॥ तुका म्हणे हित धरा । नोहे पुरा गांवढाळ ॥ ४ ॥

३४९१. देती घेती परज गेली । घर खालीं करोनियां ॥ १ ॥ धांवणियाचे न पडे हातीं । खादली राती काळोखी ॥ २ ॥ अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥ ३ ॥ सोंगें संपादुनि दाविला भाव । गेला आधीं माव वरि होती ॥ ४ ॥ घराकडे पाहूं नयेसेंचि झालें । अमानत केलें दिवाणांत ॥ ५ ॥ आतां तुका कोणा न लगेचि हातीं । झाली ते निश्चिंती बोलों नये ॥ ६ ॥

३४९२. गोदे काठीं होता आड । करूनि कोड कवतुकें ॥ १ ॥ देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जिवनापें ॥ २ ॥ राखोनियां होतों ठाव । अल्प जीव लावूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांति ॥ ४ ॥

३४९३. काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्ति संहार घडमोडी ॥ १ ॥ बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता शेवटीं एकाचिया ॥ २ ॥ तुका म्हणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें तैसें कळों नये ॥ ३ ॥

३४९४. सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥ १ ॥ नारायणा ऐसे दास । येरयेरांचीच आस ॥ २ ॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता ॥ ३ ॥ तुका म्हणे जाण । तेंच भल्याचें वचन ॥ ४ ॥

३४९५. अहो उभया विटेवरी । भरोवरी चुकाविली ॥१॥ निवारलें येणें जाणें । कोणा कोणें रुसावें ॥ २ ॥ सकळपासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥ ३ ॥ तुका म्हणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥ ४ ॥

३४९६. आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥ १ ॥ ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे बळा ॥ २ ॥ अंकिना एसिया ।

होईल पावविलें ठाया ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें । दिलें आभंड प्रकाशें ॥ ४ ॥

३४९७. आवडीचे भेटी निवे । चित्त पावे विश्रांति ॥ १ ॥ बरवियाचा छंद मना । नारायणा अवीट ॥ २ ॥ तुळणें कांहीं साम्या पुरे । हें तों नुरे ये रुचि ॥ ३ ॥ तुका म्हणे बरवें झालें । फावलें हें कळे त्या ॥ ४ ॥

३४९८. ज्याचे माथां जो जो भार । तोचि फार तयासी ॥ १ ॥ मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥ २ ॥ परिसा अंगीं अमुप सोनें । पोटीं हीन धातुचें ॥ २ ॥ आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥ ४ ॥

३४९९. साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जीं वचनें बोलियेले ॥ १ ॥ साच तें स्वहित साच ते प्रचित । साच वेदें नीत सांगितली ॥ २ तुका म्हणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥ ३ ॥

३५००. ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढा नारायण स्मरवितो ॥ १ ॥ भवव्याधि येणें तुटेल रोकडा । करूनियां झाडा निश्चयेसी ॥ २ ॥ आणिकां उपायां अनुपान कठिण । भोगे बरें शीण शीघ्रव्रत ॥ ३ ॥ तुका म्हणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ॥ ४ ॥

३५०१ लावुनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देऊनियां मिठी । *पडे महिया माथुले ॥ १ ॥ पुढें तोचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । § लावूनि चरफड । हात गोऊनि पळावें ॥२॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । फिरतां मागें कैंचा तो ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुम्हां नार्पिती ॥ ४ ॥

३५०२ जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥ १ ॥ धर्म भूतांची ते दया । संत कारण ऐसीया ॥ २ ॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥३॥ तुका म्हणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥४

---

* पळे § उरवी

३५०३. करितां तडातोडी । वत्स माते सोई ओढी ॥ १ ॥ करि त्याचा आग्रह उरे । एक एकासाठीं झुरे ॥२॥ भुके इच्छी अन्न । तेंही त्यासाठीं निर्माण ॥३॥ तुका म्हणे जाती । एक एकाचिये चित्तीं॥४॥

३५०४ दिली मान तरी नेघावी * शत्रुसी । शरण आलें त्यासी जतन जीवें ॥ १ ॥ समर्थासी असे विचाराची आण । भलीं पाप पुण्य विचारावें ॥ २ ॥ काकुळतीसाठीं सत्याचा विसर । पडिलें अतर न पाहिजे ॥ ३ ॥ तुका म्हणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ ४ ॥

३५०५. वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥ एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥ २ ॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥ ३ ॥ काळिमेनें ज्योती । दिवसें कळों आली राती ॥४॥ उंच नीच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ५ ॥ तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

३५०६. आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥ आहे तें अधीन आपुले हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥ २ ॥ जाणातियां पाठीं लागला उपाध । नेणता तो सिद्ध भोजनासी ॥ ३ ॥ तुका म्हणे भय बांधलें गांठीं । चोर लागे पाठी दुम तया ॥ ४ ॥

३५०७. केलें पाप जेणें दिलें अनुमोदन । दोघांसि पतन सारिखेंचि ॥ १ ॥ विष नवनीता विष करी संगें दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥ २ ॥ देखिलें आंढाळ निघालिया शेता । टाळावें निमित्ता थैक म्हूण ॥ ३ ॥ तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मानितां ॥ ४ ॥

३५०८. पतनासि नेति । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥ बिधिपुरतें कारण । बहू वारावें वचन ॥ २ ॥ सर्वस्वासी नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ ३ ॥ तुका म्हणे दुरीं । राखतां हे तेचि बरी ॥४॥

३५०९. मागील ते आटी येणें घडे सांग । सुताविलें अंग एका सूत्रें ॥ १ ॥ पहिपाहुणेर ते सोहळ्यापुरतें । तेथूनि आरते उपचार

* शत्रूची

ते ॥ २ ॥ आवश्यक तेथें आगळा आदर । चाली थोडे फार संपादत ॥ ३ ॥ तुका म्हणे ऋण फिटे एके घडी । अलभ्य ते जोडी ह्यातां आल्या ॥ ४ ॥

३५१० संचितांवांचून । पंथ न चलवे कारण ॥ १ ॥ कोरडी ते अवघी आटी । वांयां जाय लाळ घोंटी ॥ २ ॥ धनवित्तें जोडे । देव ऐसें तों न घडे ॥ ३ ॥ तुका म्हणे आड । स्वहितासी बहु नाड ॥ ४ ॥

३५११. आडवा तो उभा । असे दाटोनिया प्रभा ॥ १ ॥ देव नाहीं एकविध । एक भाव असे शुद्ध ॥ २ ॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥ ३ ॥ तुका म्हणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥ ४ ॥

३५१२ अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कळीं न घडे साधनें । उचित विधी विधान । न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नांगवे या पापा । येणें जाणें खेपा । येणेंचि एके खंडती ॥ २ ॥ उभारोनि बाहे । विठो पालवीत आहे । दासां मीचि साहे । मुखें बोले आपुल्या ॥ ३ ॥ भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यासी । तुका म्हणे नासी । कुतर्क्यांचे कपाळीं ॥ ४ ॥

३५१३ करितां होय होय चित्तची नाहीं । घटापटा कांहीं करूं नये ॥ १ ॥ मग हालतचि नाहीं जवळून । करावा तो शीण शीणविता ॥ २ ॥ साहताचि नाहीं कांहीं पाकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी बोलावे झांकून । येथें खुणे खुण पुरतेंचि ॥ ४ ॥

३५१४. मथनें भोग सार । ताकें घडे उपकार ॥ १ ॥ बरवी सायासाची जोडी । अनुभविया ठावी गोडी ॥ २ ॥ पाक आणि रुचि । जेथें तेथें ते कइचो ॥ ३ ॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥ ४ ॥

३५१५. जग तरि आम्हां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हणुनी काळा ॥ २ ॥ नाहीं कोणी सखा । आम्हां निपराध पारिखा ॥ ३ ॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ४ ॥

३५१६. ऐकतों दाट । आले एकाचे बोभाट ॥ १ ॥ नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खाणोरी ॥ २ ॥ हेचि यांची जोडी । सदां बोडकीं उघडीं ॥ ३ ॥ तुका म्हणे न्यावें । ज्याचें त्यासी नाहीं ठावें ॥ ४ ॥

३५१७. चंदन तो चंदनपणें । सहज गुणें संपन्न ॥ १ ॥ वेधलिया धन्य जाती । भाग्यें होती सन्मुख ॥ २ ॥ परिसा अंगीं परिसपण । बाणोनि तें राहिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे कैंची खंती । सुजाती ते टाकणी ॥ ४ ॥

३५१८. सोसें वाढे दोष । झाला न पालटे कस ॥ १ ॥ ऐसें बरवें वचन । करिता तो नारायण ॥ २ ॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमाचि उरे श्रमें ॥ ३ ॥ सुख देते शांती । तुका म्हणे धरितां चित्तीं ॥ ४ ॥

३५१९. वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी । हेचि घ्यावी धणी फावेल तों ॥ १ ॥ येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्या ॥ २ ॥ उगाच सारावा वाढिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशा तैसें ॥ ४ ॥

३५२०. कौलें भरियेली पेंठ । निग्रहाचें खोटे तंट ॥ १ ॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळा वाढवितां धर्म ॥ २ ॥ कामवितां लोहो कसे । तांतडीनें काम नासे ॥ ३ ॥ तुका म्हणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥ ४ ॥

३५२१. नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं शीण लटिकाची ॥ १ ॥ एकाचिये माथां असावें निमित्त । नसों नाहीं हित कपाळीं तें ॥ २ ॥ कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ ३॥ तुका म्हणे वर्म कळों येतें कांहीं । ओळखी जे ठायीं होईल ते ॥ ४ ॥

३५२२. चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥ १ ॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावचि कारण देवा ॥ २ ॥ तपें इंद्रियां आघात । क्षण एक वाताहात ॥ ३ ॥ मंत्र चळे थोडा । तरि धडाचि होय वेडा ॥ ४ ॥ व्रत करितां सांग । तरी एक चुकतां भंग

॥ ५ ॥ * धर्मधर्मा सत्वाचि कारण । नाहीं तरी केला सिण ॥ ६ ॥ भूतदयेसि आघात । उंचनीच ‡ पाहे चित्त ॥७॥ तुका म्हणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ॥ ८ ॥

३५२३. ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥ १॥ करितां स्वामीसवे वाद । अधिक अधिक आनंद ॥ २ ॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ ३ ॥ वदे वाग्देवी । तुका विठ्ठलीं गौरवी ॥ ४ ॥

३५२४. करावें गोमटें । बाळा माते तें उमटें ॥ १ ॥ आपुलिया जीवाहुनी । असे वाल्हें तें जननी ॥ २ ॥ वियोग तो तिस । त्याच्या उपचारें विष ❋ ॥३॥ तुका म्हणे पाय । डोळा सुखावे त्या न्यायें ॥४॥

३५२५. अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ १ ॥ मुंगीवरी भार गजाचें पालाण । घालितां ते कोण कार्यसिद्धि ॥ २ ॥ तुका म्हणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥ ३ ॥

३५२६. आम्हांपाशीं सरे एक शुद्ध भाव । चतुराई जाणीव नलगे कळा ॥ १ ॥ सर्व जाण माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळांसी ॥ २ ॥ तुका म्हणे कर्मे धर्मे नये हातां । तयावरी सत्ता भाविकांची ॥ ३ ॥

३५२७. नव्हों वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ १ ॥ कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्यांची ॥ २ ॥ तुका म्हणे लासूं फासूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ ३ ॥

३५२८. ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ १ ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ २ ॥ अवघें साकरेचें

---

* धर्म ‡ वाताहात

❋ कांहीं प्रतींत येथें खालील दोन कडवीं जास्त आढळतात.

हरणी चुकली पाडसा । धुंडाळीती दाही दिशा ॥ ३ ॥
रानीं हिंडों गेली गाय । घरीं वत्स वाट पाहे ॥ ४ ॥

अंग । नये व्यंग निवाडितां ॥ ३ ॥ तुका म्हणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ॥ ४ ॥

३५२९. अभिमानाची स्वामिनी शांति । महत्व येती सकळ ॥१॥ कळोनिही न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥ २ ॥ सर्व सत्ता धरितां धीर । वीर्यो वीर आगळा ॥ ३ ॥ तुका म्हणे तिखट तिखें । मृद सखे आवडी ॥ ४ ॥

३५३० गंगा न देखे विटाळ । तेंचि रांजणी ही जळ ॥ १ ॥ अल्प महदा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥ २ ॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरि कां लोकां ॥३॥ तुका म्हणे आगीविण । बीज वेगळें तों भिन्न ॥ ४ ॥

३५३१. गंधर्वनगरीं क्षण एक न राहावें । तेंचि करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ २ ॥ वंध्यापुत्राच्या लग्नाचा सोहळा । आपुलियां डोळां पाहा वेगीं ॥ ३ ॥ मृगजळीं पोहे घालूनि सज्ञाना । तापलिया जना तोषवावें ॥ ४ ॥ तुका म्हणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ५ ॥

३५३२. पोटीं जन्मती रोग । तरि कां म्हणावें आप्तवर्ग ॥ १ ॥ रानीं वसती औषधी । तरि कां म्हणाव्या निपराधी ॥ २ ॥ तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ॥ ३ ॥

३५३३. ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥ १ ॥ तरीच जोडिलें तें भोगे । कांहीं आघात नलगे ॥ २ ॥ वाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ॥ ३ ॥ तुका म्हणे हे गोमटी । दासा न घालावी तुटी ॥ ४ ॥

३५३४. नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ १ ॥ कांहीं न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ॥ २ ॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥ ३ ॥ ज्याचें तोचि जाणे । मी मापाडें तुका म्हणे ॥ ४ ॥

३५३५. जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ १ ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥ २ ॥ मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम

पावों कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ४ ॥

३५३६. अवगुणांचे हातीं । आहे अवघीच फजीती ॥ १ ॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ २ ॥ विष तांब्या वाटी । भरली लाऊं नये होटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ४ ॥

३५३७. वळितें जें गाई । त्यासी फार लागे काई ॥ १ ॥ निवे भावाचे उत्तरीं । भलते एके धणी वरी ॥ २ ॥ न लगती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ ३ ॥ सांडी थोरपणा । तुका म्हणे सवे दीना ॥ ४ ॥

३५३८. भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥ १ ॥ धन्य-धन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ २ ॥ बहुत बराडी । देवावरी ते आवडी ॥ ३ ॥ तुका म्हणे हे रोकडे । लाभ अधिकारी चोखडे ॥ ४ ॥

३५३९. नये जरी कांहीं । तरी भलतेंचि वाहीं ॥ १ ॥ म्हण-विल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥ २ ॥ समर्थाच्या नांवें । भल-तैसें विकावें ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्ता । वरी असे त्या बहुतां ॥ ४ ॥

३५४०. पाठीं पोटीं देव । कैंचा हरिदासां भेव ॥ १ ॥ करा आनंदें कीर्तन । नका आशंकित मन ॥ २ ॥ ऐथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ ३ ॥ तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

३५४१. लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली ॥ १ ॥ उभयतां आवडी लाड । कोडें कोड पुरतसे ॥ २ ॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमरंग वाढतो ॥ ३ ॥ तुका म्हणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ४ ॥

३५४२. चिंतिलें तें मनिचें जाणे । पुरवी खुणे अंतरींचें ॥ १ ॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥ २ ॥ नवसि-याचे पुरवी नवस । भोगी त्यासी भिन्न नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे समचि देणें । समचरणीं उभा असे ॥ २ ॥

३५४३. गंगेचिया अंतेविण काय चाड । आपुलें तें कोड तृषे-

पाशीं ॥ १ ॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घालूं निरंतर हृदय-पुटीं ॥ १ ॥ कारण तें असे नवनीतापाशीं । गबाळ तें सोसी येर कोण ॥ ३ ॥ बाळाचे सोईतें घांस घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥ ४ ॥ गाऊं नाचूं करूं आनंदसोहळा । भावचि वेगळा नाहीं आतां ॥ ५ ॥ तुका म्हणे अवघें झालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥ ६ ॥

३५४४. गावें म्हणउनि गीत । धरूनि राहे तैसें चित्त ॥ १ ॥ हेंचि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥ २ ॥ ऐकावी म्हूण कथा । राहे तैसें धरूनि चित्ता ॥ ३ ॥ तुका म्हणे धर्णा । नव्हे जेविल्यावांचूनि ॥ ४ ॥

३५४५. चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया । ऐकिलिया वांयां वारता त्या ॥ १ ॥ ऐका जी वोजे पडतसें पायां । भावाचि ते जाया वाट नव्हे ॥ २ ॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें पाहिजे आरालें । बिंबीं निवळलें तरि भासे ॥ ४ ॥

३५४६. जन देव तरि पायाचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥ अग्नीचें सौजन्य शीतानिवारण । पालवीं बांधोन नेतां नये ॥ २ ॥ तुका म्हणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥

३५४७. देव होसी जरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ १ ॥ दुष्ट होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ २ ॥ तुका म्हणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया बाणलें निश्चयेसीं ॥ ३ ॥

३५४८. आर्तभूतांप्रति । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ २ ॥ अल्पें तो संतोषी । स्थळीं सांपडे उद्देशीं ॥ ३ ॥ सहज संगम । तुका म्हणे तो उत्तम ॥ ४ ॥

३५४९. कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥ १ ॥ ऐका हें सोपें वर्म । नलगे श्रम चिंतना ॥ २ ॥ मृत्याचिये अंगीं छाये । उपायाचे खुंटता ॥३॥ तुका म्हणे अवघे जन । येथें मन असों द्या॥४

३७५५. ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्मा अकर्मावेगळें ॥ १ ॥ तोचि एक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥ २ ॥ शौच अशौचाचे संधी । तन आळा तनामधीं ॥ ३ ॥ पापपुण्या नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥ ४ ॥

३७५६. लक्षूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ १ ॥ कर दोन्ही कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २ ॥ व्यापूनि वेगळें राहिलेंसें दुरी । सकळां अंतरीं निर्विकार ॥ ३ ॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी । आपुल्या मानसीं शिव ध्याय ॥ ४ ॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥ ५ ॥ अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥ ६ ॥

३७५७. तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौनपणें ॥ १ ॥ मौनपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ २ ॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हे झकवे ब्रह्मादिक ॥ ३ ॥ ब्रह्मादिक देवा कर्माची कचाटी । म्हणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे गुण नाम रूप । आहेसी अमुप वाणूं काई ॥ ५ ॥

३७५८. स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ २ ॥ रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ॥ ४ ॥

३७५९. ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥१॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुति ॥ २ ॥ शिणलीं सहस्र तोंडें । शेष फणी ऐसें धेंडें ॥ ३ ॥ तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाई ॥ ४ ॥

३७६०. आवडीसारिखें सपादिलें सोंग । अनंत हीं मग झालीं नामें ॥ १ ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही माझी ॥ २ ॥ हातें जेवी एक मुखें मागें घांस । माउली जयास

तैसी बाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ति ॥ ४ ॥

३७६१. तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीही त्रिभुवनीं ॥ १ ॥ सहस्रमुखें शेष शिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ ३ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चितानंदा नारायणा ॥ २ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥४॥ तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

३७६२. जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रमखूण देऊ-नियां ॥ १ ॥ मग मी व्यवहारीं असोनी वर्तत । जेवीं जळा आंत पद्मपत्र ॥ २ ॥ ऐकोनि नाइकें निंदास्तुती कानी । जैसा का उन्मनीं योगिराज ॥ ३ ॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेवीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तो शीण वाटतसें ॥ ५ ॥

३७६३. उपाधिवेगळे तुम्हीं निर्विकार । कांहींच संसार तुम्हां नाहीं ॥ १ ॥ ऐसें मज करूनि ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥ २ ॥ निःसंग तुम्हांसी राहणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥ ४ ॥

३७६४. पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिर-वले ॥ १ ॥ चेष्टविले तरी सांगावें कारण । भक्ती ते * जीवन करा-वया ॥ २ ॥ लावूनियां दृष्टी घातली सामोरी । बैसली जिव्हारीं डसोन ते ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥ ४ ॥

३७६५. गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ १ ॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ २ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । प्रेम अमृताची खाणी ॥ ४ ॥

---

* उजवण

३७६६. आम्ही तरी आस । झालों टाकोनि उदास ॥ १ ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ २ ॥ भलते ठायीं पडो । देह तुरंगीं हा चढो ॥ ३ ॥ तुमचें तुम्हापाशीं ॥ आम्ही आहों जैसीं तैसीं ॥ ४ ॥ गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥ ५ ॥ तुका म्हणे चित्तीं । नाहीं वागवीत खंता ॥ ६ ॥

३७६७. आम्हो जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ १ ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आम्ही आप । आपणासी दाखिलें ॥ २ ॥ एके ठायीं घरिच्याघरीं । न कळतां झाली चोरी । * तेथेंचि तें दुरी । जाणें येणें खुंटलें ॥ ३ ॥ तुका म्हणे धरूनि हातीं । उरी ठेविली मागुती । एकांतीं लोकांतीं । देवभक्त-सोहळा ॥ ४ ॥

३७६८. भोगावरि आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणि-येलें ॥ १ ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ २ ॥ काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥ ३ ॥ केला तरी उरे ¶ वादच कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वप्नींची ते ॥ ४ ॥ अवघेचि वाण आले तुम्हां घरा । मजुरा मजुरा राजकीर्दी ॥ ५ ॥ तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ६ ॥

३७६९. तरुवर बीजापोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥ १ ॥ तैसें तुम्हां आम्हां झालें । एकीं एक सामावलें ॥ २ ॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥ तुका म्हणे बिंबछाया । ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

३७७०. क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणाचि खेळे आप-णाशीं ॥ १ ॥ मधील तें वाव अवघी उपाधि । तुम्हां आम्हांमधीं तेचि परि ॥ २ ॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि ते ॥ ३ ॥ तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । ‡ पत्र पुष्प आलें गेलें वांयां ॥ ४ ॥

---

* तेथें तेचि ¶ शीणाचि ‡ फलपुष्प

३७७१. दूरि तोंचि होतों आपुले आशंके। नव्हते ठाऊके मूळ भेद ॥ १ ॥ आतां जेथें तेथें येईन सांगातें। लपायापुरतें उरों नेदी ॥ २ ॥ मिथ्या मोहें मज लाविला उशीर। तरी हें अंतर झालें होतें ॥ ३ ॥ तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न। लटिकाची शीण लपंडाई ॥ ४ ॥

३७७२. लवण मेळवितां जळें। काय उरलें निराळें ॥ १ ॥ तैसा समरस झालों। तुजमाजी हरपलों ॥ २ ॥ अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उरली काजळी ॥ ३ ॥ तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती ॥ ४ ॥

३७७३. तुज मज नाहीं भेद। केला सहज विनोद ॥ १ ॥ तूं माझा आकार। मी तों तूंची निर्धार ॥ २ ॥ मी तुजमाजी देवा। घेसी माझ्या अंगें सेवा ॥ ३ ॥ मी तुजमाजी अचळ। मजमाजी तुझें बळ ॥ ४ ॥ तूं बोलसी माझ्या मुखें। मी तो तुजमाजी सुखें ॥ ५ ॥ तुका म्हणे देवा। विपरीत ठायीं नांवा ॥ ६ ॥

३७७४. जें जें कांहीं करितों देवा। तें तें सेवा समर्पे ॥ १ ॥ भेद नाहीं सर्वात्मना। नारायणा तुज मज ॥ २ ॥ आम्ही दुजे नेणों कोणा। हेंचि मना मन साक्ष ॥ ३ ॥ तुका म्हणे जगन्नाथा। हें अन्यथा नव्हे कीं ॥ ४ ॥

३७७५. रज्जु धरूनियां हातीं। भेडसाविलीं नेणतीं। कळों येतां चित्तीं। दोरी दोघां सारिखी ॥ १ ॥ तुम्हांआम्हांमध्यें हरी। झाली होती तैसी परी। मृगजळाचे पुरीं। ठाव पाहों तरावया ॥ २ ॥ सरी चिताक भोंवरी। अळंकाराचिया परी। नामें झालीं दुरी। एक सोनें आटितां ॥ ३ ॥ पिसांची पारवीं। करोनि बाजेगिरी दावी। तुका म्हणे तेवीं। मज नको चाळवूं ॥ ४ ॥

३७७६. खडा रवाळी साकर। झाला नामाचाची फेर। न दिसे अंतर। गोडी ठायीं निवडतां ॥ १ ॥ तुम्ही आम्ही पांडुरंगा। भिन्न ऐसें काय सांगा। चाळविलें जगा। मी हें माझें यासाठीं ॥ २ ॥ पायीं हातीं नाकीं शिरीं। हेम राहे अळंकारीं। मुसे आल्यावरी। काय निवडे वेगळें ॥ ३ ॥ निजलिया लाभ हानी। तोंच खरी ते स्वप्नीं। तुका म्हणे दोन्ही। निवारलीं जागतां ॥ ४ ॥

३७७७. अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा । पासूनि अंधारा दुरि झालों ॥ १ ॥ साक्षत्वें या झालों गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥ २ ॥ आठवू विसरु पडियेला मागें । आलें तेचि भागें यत्न केले ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा विनोद देवासीं । आम्हीं तुम्हां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ४ ॥

३७७८ धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥ धन्य झालों आतां यासि संदेह नाहीं । न पडे या वाहीं काळा हातीं ॥ २ ॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे पोट धालेंचि न धाय । खादलेंचि खाय आवडीनें ॥ ४ ॥

३७७९. कासयानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां ॥ १ ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ २ ॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥ ३ ॥ फळदाता तूंच तांबोल अक्षता । तेथें काय आतां वाहों तुज ॥ ४ ॥ वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥ ५ ॥ गातां तूं ॐकार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥ ६ ॥ तुका म्हणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरि ॥ ७ ॥

३७८०. कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वां सर्वांठायीं तूं मज एक ॥ १ ॥ कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ २ ॥ कवणा पाषाणासी धरुनिया भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ॥ ३ ॥ म्हणऊनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥ ४ ॥ जळे जळ काय धोविलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥ ५ ॥ पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ ६ ॥ पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ॥ ७ ॥ तुका म्हणे जीत पिंड तुझे हातीं । देऊनि निश्चिती मानियेली ॥ ८ ॥

३७८१. जन्ममरणाची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥ १ ॥ होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥ २ ॥ लिंगाडाचे मुळें होतीं पंचभूतें । ज्याचें त्यापुरतें विभा-

ोलें ॥ ३ तुका म्हणे झाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा ांडुरंग ॥ ४ ॥

३७८२. वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥ १ ॥ ुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥ गाळूनियां ांद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ ३ ॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजि-ाचा संग ॥ ४ ॥

३७८३. जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहासी ॥ १ ॥ ऐसा ासरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ २ ॥ चित्त जडलें पायीं । ाळती हे ठायीं ठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे पोटीं । देवा घालूनि सांगे ोष्टी ॥ ४ ॥

३७८४. आम्ही न देखों अवगुणां । पापी पवित्र शहाणा ॥ १ ॥ ावघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ २ ॥ मज भक्ती-ावें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥ ३ ॥ तुका म्हणे घोटीं । विष ामृत तुजसाठीं ॥ ४ ॥

३७८५. तुज करितां होते ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ ारि हें वर्म नेणती कोणी । पीडा खाणी भोगितील ॥ २ ॥ उल्लं-घेती पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ ३ ॥ पापी होती पुण्य-ंत । न करी घात दुर्जन ॥ ४ ॥ अवघें हेळामात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापुनि ॥ ६ ॥

३७८६. कडसणी धरितां अडचणीचा ठाव । म्हणऊनि जीव त्रासलासे ॥ १ ॥ लौकिकाबाहेरि राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥ संकोचानें नाहीं होत धणीवरी । उरवूनि उरी काय काज ॥ ३ ॥ तुका म्हणे केले इच्छेची सारिखें । नाहींसें पारिखें येथें कोणी ॥ ४ ॥

३७८७. अंतरायें पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तो तो बाधी ॥ १ ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥ २ ॥ अखंड तें खंडें संकल्पीं विकल्प । मनोजन्य ाप रज्जुसर्प ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे ृशे सुखरूप ॥ ४ ॥

३७८८. माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥ इच्छितातीं मान मागा देवापाशीं । असा संचितासी गुंतले हो ॥ २ ॥ देह आम्हीं केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं मानामाना ॥ ३ ॥ तुका म्हणे कोणें वेचावें वचन । नसतां तो शीण वाढवावा ॥ ४ ॥

३७८९. बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥ १ ॥ एकवेळें झालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ २ ॥ अमृतसंजीवनी *विजविली खाई । अंगें तये ठायीं हारपलीं ॥ ३ ॥ एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥ ४ ॥ अवघीं कर्मं झालीं घटस्फोटापाशीं । संबंध एकेसी उरला नामीं ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदें गोविंदु विस्तारला ॥ ६ ॥

३७९०. नलगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥ माझ्या उपकारासाठीं । वागविला म्हूण कंठीं ॥ २ ॥ घरीं दिला ठाव । अवघा सकळही वाव ॥ ३ ॥ तुका म्हणे एके ठायीं । केलें माझें तुझें नाहीं ॥ ४ ॥

३७९१. एकाएकीं आतां असावेंसें वाटे । तरिच हे खोटे चाळे केले ॥ १ ॥ वाजवूनि तोंड घातलें बाहेरी । †कुलप करुनी दारीं माजी वसा ॥ २ ॥ उजेडाचा केला दाटोनि अंधार । सर्वं हुद्दार चेष्टविला ॥ ३ ॥ तुका म्हणे भय होतें तोंचि वरी । होती काहीं उरी स्वामिसेवा ॥ ४ ॥

३७९२. सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुझे हातीं ॥ १ ॥ त्याचा हाचि उपकार । अंतीं आम्हाशीं वेव्हार ॥ २ ॥ नामरूपा केला ठाव । तुज कोण म्हणतें देव ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥ ४ ॥

३७९३. जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥ २ ॥ सरसावलें मन । केले सोज्वळ लोचन ॥३॥ तुका म्हणे सवें । आतां असिजेत देवें॥४॥

---

* निवविली † कल्पें

३७९४. हेचि तुम्ही पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥ अवघीं तुम्हांच हीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥ २ ॥ न वर्जित दिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥ ३ ॥ नव्हे एकदेशी । तुका म्हणे गुणदोषी ॥ ४ ॥

३७९५. वेठी ऐसा भाव । न करी आह्माच उपाव ॥ १ ॥ रूप डसवीन जीवा । अवघा येच ठायीं हेवा ॥ २ ॥ कृपणाचे परी । लेखा पळनिमेषवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे असा । संनिधचि जगदीशा ॥ ४ ॥

३७९६. नेलें सळेंबळें । चित्ताविताचें गांठोळें ॥ १ ॥ साह्य झालीं घरिच्या घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥ २ ॥ मी पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ४ ॥

३७९७. एक वेळे केलें रितें कलेवर । आतां दिली थार पांडुरंगा ॥ १ ॥ पाळण पोषण नलगे ते सोई । देहाचे ते काई सर्वभाव ॥ २ ॥ माझिया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥ ३ ॥ झाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ऐसें कांहीं बोलों नये ॥ ४ ॥

३७९८. नटनाट्य तुम्हीं केलें याचसाठीं । कवतुकें दृष्टी निववावी ॥ १ ॥ नाहीं तरि काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥ २ ॥ अभेदाचि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहु एकी ॥ ३ ॥ तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ४ ॥

३७९९. मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ १ ॥ एकीं एक दृढ झालें । मुळा आपुलिया आलें ॥ २ ॥ सागरीं थेंबुटा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ ३ ॥ तुका म्हणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥ ४ ॥

३८००. तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥ आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥ २ ॥ मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ ३ ॥ पापपुण्य भेद नाशिलें तिमिर । त्रिगुणें शरीर

सांडियेलें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥ ५ ॥

३८०१. जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥ बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥ अवघे जन मज झाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

३८०२. रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥ देहभाव हरपला । तुज पाहातां विठ्ठला ॥ २ ॥ कळों नये सुखदुःख । तहान हरपली भूक ॥ ३ ॥ तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

३८०३. तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हां भिन्न पासुनि ॥ १ ॥ आतां बोलों नये ऐसें । आनारिसे वेगळें ॥ २ ॥ सन्मुख झालों स्वामीकडे । भव आंगडें निराळें ॥ ३ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ४ ॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वंचेना ॥ ५ ॥ तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥ ६ ॥ तुका म्हणे जाणोनि वर्मं । कर्माकर्मं ठेविलीं ॥ ७ ॥

३८०४. देव सखा आतां केलें नव्हे काई । येणें सकळही सोइ-रींच ॥ १ ॥ भाग्यवंत झालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या नीति पार नाहीं ॥ २ ॥ पाहातां दिसती भरलिया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ ३ ॥ अविनाश जोडी आम्हां भाग्यवंतां । झाली होती सत्ता संचिताची ॥ ४ ॥ पायांवरी डोई ठेवाया आरोथा । झाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ५ ॥ तुका म्हणे जीव पावला विसावा । म्हणवितां देवा तुमचीसीं ॥ ६ ॥

३८०५. तेणें सुखें माझें निववीलें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥ १ ॥ कवतुकें करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥ २ ॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची सर्व गेली ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख झालें माझ्या जीवा । रंगलों केशवा तुझ्या रंगें ॥ ४ ॥

३८०६. दिला जीवभाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥ १ ॥ आतां वर्ते तुझी सत्ता । तेथें सकळ अनंता ॥२॥ माझिया मरणें । तुम्हीं बैसविलें ठाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । मी हें माझें येथें नाहीं ॥ ४ ॥

३८०७. आपुलिया काजा । आम्हीं सांडियेलें लाजा ॥ १ ॥ तुम्हां असों जागवीत । आपुलिया हातीं हित ॥ २ ॥ तुम्हीं देहशून्य । आम्हां कळे पापपुण्य ॥ ३ ॥ सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥ ४ ॥

३८०८. पदांपदीं दिलें अंग । झाले सांग कारण ॥ १ ॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ २ ॥ पुढती चाली मना लाहो । वाढे देहो संतोष ॥ ३ ॥ तुका म्हणे क्षरभागीं । झालों जगीं व्यापक ॥ ४ ॥

३८०९. तुझें अंगभूत । आम्ही जाणतों समस्त ॥१॥ येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥ २ ॥ ठावा थारा मारा । घराचिया संवचोरा ॥ ३ ॥ तुका म्हणे भेदाभेद । करूनि करितसें वाद ॥ ४ ॥

३८१०. नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ १ ॥ कासया जिकीर करणें येविसीं । भयाची मानसीं चिंता खंती ॥ २ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें ती चाली आपुलिये ॥३॥ तुका म्हणे माझें पाळण पोषण । करितां आपण पांडुरंगा ॥ ४ ॥

३८११.* जो वितो तो माझा पिता । उखता तो उखत्याचा ॥ १ ॥ जनार्दनीं सरती कर्में । बाधा भ्रमे अन्यत्र ॥ २ ॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥ ३ ॥ तुका म्हणे खांद्या पानें । सिंचितां भिन्न कोरडीं ॥ ४ ॥

३८१२. चित्ताचा चाळक । त्याचें उभय सूत्र एक ॥ १ ॥ नाचवितो नाचेछंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥ २ ॥ चंद्र कमळणी । नाहीं धाडीत सांगोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टी ॥ ४ ॥

* जीविता तो

३८१३. काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥ १ ॥ चित्तासी प्रसाद होईल चळण । तेंचि तें वळण मनासही ॥२॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठित । नाहीं केलें होत आपुलें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥ ४ ।

३८१४. चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ १ ॥ हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥ २ ॥ रवीचिये अंगीं प्रकाश सकळां । वचनें निराळा भेद दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥ ४ ॥

३८१५. परिसाचे अंगें सोनें झाला विळा । वाकणिया कळाहीन नव्हे ॥ १ ॥ अंतरीं पालट घडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥ २ ॥ पिकालिया सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काय घडे मग ॥ ३ ॥ तुका म्हणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥ ४ ॥

३८१६. शुद्धाशुद्ध निवडे कैसें । चर्म मांस भिन्न नाहीं ॥१॥ कांहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥ २ ॥ उदक भिन्न असे काई । वोहोळ बावी सरिता नई ॥ ३ ॥ सूर्य तेजें निवडे काय । रश्मी रसा सकळा खाय ॥ ४ ॥ वर्णा भिन्न दुधा नाहीं । सकळा गाई सारखें ॥ ५ ॥ करितां भिन्न नाहीं माती । मडक्या गति भिन्न नांवें ॥ ६ ॥ वर्ते एकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥७॥ तुका म्हणे पात्र चाड । किंवा विष अमृत गोड ॥८॥

३८१७. घालुनियां मापीं । देव भक्त बैसले जपीं ॥ १ ॥ तैसीं होते सांडउलंडी । निजनिजांची मुर्कुंडी ॥२॥ अमुपीं उखतें । आपण वोस आपणयातें ॥ ३ ॥ देव आतां झाला । उगवी संकोच वहिला ॥ ४ ॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥ ५ ॥ आडकिला झोंपा । रिता कलेवराचा खोंपा ॥ ६ ॥ गोदातीरीं आड । करिते करविते द्वाड ॥७॥ तुका म्हणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ८ ॥

३८१८. ब्रह्मरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा

स्फटिक माणि ॥ २ ॥ नानाभाषामतें आळविता बाळा । प्रबोध तो मूळा जननीठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥४॥

३८१९. स्वयें पाक करी । संशय तोचि धरी । संदेहसागरीं । आणिकां परी बुडविती ॥ १ ॥ जाणे विरळा एक । झालें तयेंचि हें सुख । देखिलें बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥२॥ तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ ३ ॥ तोचि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धि । संदेहाच्या संधी । वेठी आणीक धरियेले ॥ ४ ॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वांयांविण । ते झांकून बैसती ॥ ५ ॥ करणें जयासाठीं । जो नातुडे कवणे आटी । तुका म्हणे साटी । चित्तवित्तेंवाचूनि ॥ ६ ॥

३८२०. प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥ १ ॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घुरबुडीं ॥ २ ॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥ ३ ॥ हो कां नर अथवा नारी । लहान थोरीं आदर ॥ ४ ॥ झालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥ ५ ॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥६॥ तुका म्हणे दुसऱ्या भावें । छाया नावें न देखवे ॥ ७ ॥

३८२१. नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥ १ ॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥ २ ॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥ ३ ॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥ ४ ॥ तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥ ५ ॥

३८२२. अनुसरे तो अमर झाला । अंतरला संसारा ॥ १ ॥ न देखती गर्भवास । कधीं दास विष्णूचे ॥ २ ॥ विसंबेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥ ३ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । *तो रक्षिता जालिया ॥ ४ ॥

३८२३. पंडित तोचि एक भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥१॥

---

* तुक्या रक्षिता तो जाला

अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वा भूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥ रिता नाहीं कोणी ठाव । सर्वा भूतीं वासुदेव ॥ ३ ॥ तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥ ४ ॥

३८२४. देवें देऊळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥ १ ॥ नव्हे मत गूढ उमान कांहीं । तूं आपआपणापें पाहीं ॥ २ ॥ पाटे पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ ३ ॥ वांझे घरीं बाळ तान्हा । एक बाळी दो कांना ॥४॥ तुका म्हणे पैस । अनुभविया ठावा गोडी रस ॥ ५ ॥

३८२५. सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥ सत्यवादी करी संसार सकळ । आलिप्त कमळ जळीं जैसें ॥ २ ॥ घडे ज्या उपकार भूतांचा ते दया । आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ ३ ॥ न बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनी तो जनीं जनार्दन ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणितल्याविण । पावे कारितां शीण सांडीमांडी ॥ ५ ॥

३८२६. आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरोनि ॥ १ ॥ खांबसूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥ २ ॥ आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥ ३ ॥ जेव्हां असुडितो दोरी । भुमीवरी पडे तेव्हां ॥ ४ ॥ तुका म्हणे तो जाणावा । सखा करावा आपला ॥ ५ ॥

३८२७. संवसार तिहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्यदारा जया चित्तीं ॥ १ ॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥ २ ॥ तुका म्हणे देह दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

३८२८. भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति क्षमा दया ॥ १ ॥ अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । नवजती दूरी दवाडितां ॥२॥ तेथें दुष्ट गुण न मिळे निःशेष । चैतन्याचा वास झाला माजी ॥ ३ ॥ संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणाची ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याचा देव सर्व भार । चालवी कामार होउनीयां ॥ ५ ॥

३८२९. देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास

उपाधीचा ॥ १ ॥ पूर्वपक्षी धातु धिकारिलें जन । स्वयें जनार्दन तेचि झाले ॥ २ ॥ तुका म्हणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येइल कळों ॥ ३ ॥

३८३०. मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता ॥ १ ॥ सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥ तुका म्हणे लागे थोडाच विचार । परी हे प्रकार नागविती ॥ ३ ॥

३८३१. भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥ १ ॥ क्षणक्षणां जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥ २ ॥ दावूनियां सोंग दुजें । अंतर बीजें वसतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणें धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥ ४ ॥

३८३२. अग्नीमाजी पडे धातु । लीन होउनि राहे आंतु । होय शुद्ध न पावे घातु । पटतंतुप्रमाणें ॥ १ ॥ बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघेंचि भूषण । गर्व ताठा हें अज्ञान । मरण सर्वें वाहातसे ॥ २ ॥ पुरें मातलिया नदी । लव्हाळा नांदे जीवनसंधी । वृक्ष उन्मळोनि भेदी । परि तो कधीं भंगेना ॥ ३ ॥ हस्ती परदळ जो भंगी । तया पायीं न मरे मुंगी । कोण जाय संगीं । पाणोवाणी तयाच्या ॥ ४ ॥ पिटितां घणें वरि सैरा । तया पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ॥ ५ ॥ लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका म्हणे वाहोनि ॥ ६ ॥

३८३३. योग्याची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥ १ ॥ येरयेरांवरी जायांचें उसणें । भाग्यस्थळीं देणें झाडा वेसीं ॥ २ ॥ केलीया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो काहवितो ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥ ४ ॥

३८३४. ओनाम्याच्या काळें । खडे मांडविले बाळें ॥ १ ॥ तेंचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ २ ॥ रज्जु सर्प होता । तोंवरी न कळतां ॥ ३ ॥ तुका म्हणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥ ४ ॥

३८३५. आहे तें सकळ कृष्णासि अर्पण । न कळतां मन दुजें
ावी ॥ १ ॥ म्हणउनी पाठी लागतील भुतें । येती गिवसीत
चजणें ॥ २ ॥ ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या
ामित्ताकारणें हा ॥ ३ ॥ तुका म्हणे काळें चेपियेला गळा । मी
ा वेळोवेळा करीतसे ॥ ४ ॥

३८३६. देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभर
१ ॥ लोभाचे संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या
२ ॥ शुद्ध भक्ती मन झालिया निर्मळ । कुश्चळी विटाळ वज्रलेप
३ ॥ तुका म्हणे ज्याचें तयासीच कळे । प्रांत येतो फळें कळों
ग ॥ ४ ॥

३८३७. चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काइ । स्वहित तें ठायीं
ापणापें ॥ १ ॥ मनासी विचार तोचि साच भाव । व्यापक हा
ा अंतर्बाहीं ॥ २ ॥ शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमट
ाचार आणिक ठायीं ॥ ३ ॥ भोगित्यासी काज अंतरींचें गोड ।
हिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण ।
ाट नारायण होईल त्याचा ॥ ५ ॥

३८३८. कुशळ वक्ता नव्हे जाणीव तो श्रोता । राहे भाव
ात्ता धरोनियां ॥ १ ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया
गीं वसतसे ॥ २ ॥ न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं
मराम ॥ ३ ॥ जप तप ध्यान नेणे योग युक्ती । कृपाळु जो भूतीं
ावंत ॥ ४ ॥ तुका म्हणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता
ावाहूनि ॥ ५ ॥

३८३९. भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥ १ ॥
से वोसपले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥ २ ॥ जीव अवघे
ा । खोटा नागवी संदेह ॥ ३ ॥ तुका म्हणे शुद्ध । मग तुटलिया
द ॥ ४ ॥

३८४०. निघालें दिवाळें । झालें देवाचें वाटोळें ॥ १ ॥ आता
वूं नये वाणी । विचारावें मनिंच्या मनीं ॥ २ ॥ गुंडाळिली पोतीं ।
ातरी लावियेली वाती ॥ ३ ॥ तुका म्हणे करा । ऐसा राहे माजी
ा ॥ ४ ॥

३८४१. भूर्ती भगवद्भाव। मात्रासहित जीव। अद्वैत तो ठाव। निरंजन एकला ॥ १ ॥ ऐसीं गर्जती पुराणें। वेदवाणी सकळ जन। संत गर्जतील तेणें। अनुभवें निर्भर ॥ २ ॥ माझें तुझें हा विकार। निरसतां एकंकार। नलगे कांहीं फार। विचाराचें करणें ॥ ३ ॥ तुका म्हणे दुजें। हें तों नाहींच सहजें। संकल्पाच्या काजें। आपेंआप वाढलें ॥ ४ ॥

३८४२. मुक्त होता परि बळें झाला बद्ध। घेउनियां छंद माझें माझें ॥ १ ॥ पाप पुण्य अंगीं घेतलें जडून। वर्म नेणें कोण करिता तो ॥ २ ॥ तुका म्हणे गेलें व्यर्थ वायांविण। जैसा मृग शीण मृगजळीं ॥ ३ ॥

३८४३. प्रगटलें ज्ञान। नारायण भूतीं तें ॥ १ ॥ अनुभवचि घेऊं हावा। विनंती देवा करूनियां ॥ २ ॥ देखोवेखीं वदे वाणी। पडिल्या कानीं प्रमाण ॥ ३ ॥ तुका म्हणे योगक्षेम। घडे तें वर्म साधावें ॥ ४ ॥

३८४४. *देव आहे सुकाळ देशीं। अभाग्यासी दुर्भिक्ष ॥ १ ॥ नेणतां हा करूं सांटा। भरले फांटा आडरानें ॥ २ ॥ वसवूनि असे घर। माग दूर घातला ॥३॥ तुका म्हणे मन मुरे। मग जें उरे तेंचि तूं ॥ ४ ॥

३८४५. आहे ऐसा देव वदवावी वाणी। नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ १ ॥ आवडी आवडी कलेवरा कलेवरीं। वरिलें अंतरीं ताळा पडे ॥२॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी। रडे मागे तुटी हर्षयोगें ॥ ३ ॥ तुका म्हणे एकें कळतें दुसरें। बरियानें बरें आहाचें आहाच ॥ ४ ॥

३८४६. होईल झाला अंगें देव जो आपण। तयासी हे जन अवघे देव ॥ १ ॥ येरांनीं सांगावी रेमट काहाणी। चित्ता रंजवणी करावया ॥२॥ धाला आणिकांची नेणे तहानभूक। सुखें पाहे सुख आपुलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव। शब्दांचें गौरव कामा नये ॥ ४ ॥

---

* देह

३८४७. तेंही नव्हे जें करितां कांहीं । ध्याता ध्यायी तेंही नव्हे ॥ १ ॥ तेंही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥ २ ॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेंही नव्हे ॥३॥ तेंही नव्हे जें भोंवतीं भोंवे । नागवें धांवे तेंही नव्हे ॥ ४ ॥ तुका म्हणे एकाचि आहे । सहाजिं पाहें सहज ॥५॥

३८४८. पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥ दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥२॥ तिसरी माझी ओवी तिला नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥ ३ ॥ चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ४ ॥ पांचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंगा ॥ ५ ॥ साहावी माझी ओवी साहाही आटली । गुरुमूर्ति भेटली पांडुरंग ॥ ६ ॥ सातवी माझी ओवी आठवी वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥७॥ आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरग ॥ ८ ॥ नववी माझी ओवी सरले दळण । चुकलें मरण संसारींचें ॥ ९ ॥ दहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावें संसारा तुका म्हणे ॥ १० ॥

३८४९. क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ १ ॥ न घडवी पायीं तुटी । मनें मिठी घातली ॥ २ ॥ विचार तो वचना आधीं । धरुनि शुद्धी ठेविली ॥ ३ ॥ तुका म्हणे मागें भ्यालों । तरी झालों जागृत ॥ ४ ॥

३८५०. भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रम्हीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥ उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥३॥ तुका म्हणे मज कळते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥४॥

३८५१. देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्याऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥ मर्यादा ते जाणे अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥२॥ काय पडिलासी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडी ॥ ३ ॥ तुका म्हणे पुढे दिसतसे घात । करितों फाजित म्हणउनि ॥ ४ ॥

३८५२. आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां ते मग गोवी नाहीं ॥ १ ॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥२॥ पळणें ते पळा सांडूनि कां बळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ ३ ॥ तुका म्हण येथें शूर तो निवडे । पाडिलें बापुडे काळचक्रीं ॥ ४ ॥

३८५३. एकविध नारायण । तेथें विषमाचा शीण । पालटोंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ १ ॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥२॥ कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणेंपाडें लवलाहो ॥ ३ ॥ तुका म्हणे आळस निद्रा । येथें देउनियां चिरा । देउनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥४॥

३८५४. शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥ १ ॥ रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥ २ ॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ ३ ॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका राहे उपदेशीं ॥ ४ ॥

३८५५. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥ १ ॥ सहज पूजा याचि नांवे । गळित अभिमान व्हावें ॥ २ ॥ अवघें भोगिता गोसावी । आदीं अवसानीं जीवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे शीण । न धरितां नव्हे भिन्न ॥ ४ ॥

३८५६. अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥ १ ॥ अवघियाचा तळ धरीं । जीवा उरी नुरवुनी ॥ २ ॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तई ॥ ३ ॥ तुका म्हणे हा गे देव । पुढें भाव सारावा ॥ ४ ॥

३८५७. संदेह बाधक आपआपणातें । रज्जुसर्पवत भासतसे ॥ भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥ १ ॥ आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी आपणयां ॥ शुकनाळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ २ ॥ पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला ॥ जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥ ३ ॥ दुरा

ष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न म्हणे चाडा ॥ धांवतांचि
ंटे नव्हे समाधान । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥ ४ ॥

३८५८. आशा ते करविते बुद्धीचा तो लोप । संदेह तें पाप
सें नव्हे ॥ १ ॥ आपुला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार
न ग्वाही ॥ २ ॥ नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । ह्यातें तें निर्मळ
द्ध बुद्ध ॥ ३ ॥ अंधळ्यासी नये देखण्याची चाली । चाले ऐसी
ली तुका बोल ॥ ४ ॥

३८५९. साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या
लें ॥ १ ॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कलेवर । संचिताची थार
डूनियां ॥ २ ॥ महत्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें
ष्टा पंचभूतां ॥ ३ ॥ तुका म्हणे मग कैंचा संवसार । जयाचा
दर तोचि व्हावें ॥ ४ ॥

३८६०. भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥ १ ॥
र्ती धरणे जिवासाटीं । दशा उत्तम गोमटा ॥ २ ॥ देह लेखावा
सार । सत्य परउपकार ॥ ३ ॥ तुका म्हणे हे मिरासी । बुडी
वी ब्रह्मरसीं ॥ ४ ॥

३८६१. नटनाट्य अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न
लटे ॥ १ ॥ मांडियेला खेळ कौतुकें बहुरूप । आपलें स्वरूप
णतसों ॥ २ ॥ स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी
वेळे लाल संगें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही या जनाविरहित ।
उनि निश्चित क्रीडा करूं ॥ ४ ॥

३८६२ काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥ १ ॥
ग्या कैंच मुगळे । नटनाट्य तुझें चाळे ॥२॥ जाली तरी मर्यादा ।
कैंवा त्रासावें गोविंदा ॥ ३ ॥ तुका म्हणे साचा । कोठें जासी
दयींचा ॥ ४ ॥

३८६३. मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं
वा ॥ १ ॥ कोणाचा कोणासीं न धरें संबंध । आहे शुद्धबुद्ध
यींचे ठायीं ॥ २ ॥ काढा जी आपुलें मोह बुंथी जाळें । नका
वूं बळें वेड आम्हां ॥ ३ ॥ जीव शिव कांहीं ठेवियेलीं नावें ।
त्य तुम्हां ठावें असोनियां ॥ ४ ॥ सेवेच्या अभिळासें न धराचि

विचार । आम्हां दारोदार हिंडविलें ॥ ५ ॥ आहे तैसें आतां कळलियावरी । परतें सांडा दुरी दुजेपण ॥ ६ ॥ तुका म्हणे काय छायेच्या अभिळासें । हंस पात्रे नाश तारांगणीं ॥ ७ ॥

३८६४. आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥ १ ॥ बहुरंगें माया असे विखुरली । कुंठिताचि चाली होतां बरी ॥ २ ॥ पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं । भाव विश्वंभरीं समर्पावा ॥ ३ ॥ तुका म्हणे गेला फिटोनियां भेव । मग होतो देव मनाचाचि ॥ ४ ॥

३८६५. चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ १ ॥ सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ २ ॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरों धरूं ॥ ३ ॥ तुका म्हणे भय धरी रज्जूसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ४ ॥

३८६६. दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरि । आपणाबाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥ १ ॥ इतुलें जाणावया जाणा । कोड तरी मनें मना । पारधीच्या खुणा । जाणतेणेचि साधाव्या ॥ २ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा । बुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥ ३ ॥ तुका करी जागा । नको वासपूं वाउगा । आहेसि तूं अंगा । अंगीं डोळे उघडी ॥ ४ ॥

३८६७. मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥ १ ॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । काय त्या वेव्हारें लाभ हानी ॥ २ ॥ मंगळदायकें करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥ स्वप्नींचें जें सुख दुःख झालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥ सारी झाली मेली लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

३८६८. माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया जयापरी ॥ १ ॥ तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणतळीं हारपती ॥ २ ॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणीक ते आटी विचाराची ॥ ३ ॥ तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ४ ॥

३८६९. सहज पावतां भगवंतीं । परि हीं विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं । आठवण न धरिती ॥ १ ॥ हरि व्यापक सर्वगत । हा तंत्र मुख्यत्वें वेदांत । चिंतनामी चित्त । असों द्यावें सावध ॥ २ ॥ विरजाहोम याचि नांवें । देह नव्हे मी हें जाणावें । मग कां जी यावें । वरी लागे सकल्पा ॥ ३ ॥ कामक्रोधें देह माळिण । स्वाहाकारीं कैंचें पुण्य । मत्रीं पूजिलिया यज्ञानें । मुंडण नव्हेचि ॥४॥ अनन्यभक्तीचे उपाय । ते या विठोबाचे पाय । ध्याइल तो काय । चुकों जाणे मारग ॥५॥ आतां सांगे तुका । एक तुम्हीं चुकों नका । सांडीमांडी धोका । शरण रिघतां गोमटें ॥ ६ ॥

३८७०. हेचि याच्या ऐसें मागावें दान । वंदुनि चरण नारायणा ॥ १ ॥ धीर उदारीव निर्मळ निर्मत्सर । गोणें मरेश्वर ऐसें नांव ॥ २ ॥ हाचि होईजल याचिया विभागें । अनुभव अंगें अनुभविल्या ॥ ३ ॥ जोडे तयाचे कां न करावे सायास । झाला तरि आळस दीनपणें ॥ ४ ॥ फांवल्या मागें का न घलावी धाव । धरिल्या तरि हांव बळ येतें ॥ ५ ॥ तुका म्हण घालूं खंडीमध्यें टाक । देवाचें हें एक करुनी घेऊं ॥ ६ ॥

३८७१. इच्छा चाड नाहीं । न धरा संकोचही काहीं ॥ १ ॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ २ ॥ मोहरी कांदा ऊस । एक वाफा भिन्न रस ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥ ४ ॥

३८७२. सर्वस्वाची साटी । तरिच देवासवें गांठी ॥ १ ॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगविल इच्छा ॥ २ ॥ द्यावे तोंच द्यावे । म्हणउनि ज्यावें जावें ॥ ३ ॥ तुका म्हण उरी । मागें नुरवितां बरी ॥ ४ ॥

३८७३. अमर आह्मां अमर आह्मां । खरें कीं पहा खोटें हे॥१॥ न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ॥२॥ कैंचा धाक कैंचा धाक । मक्लिक हें आपुलें ॥ ३ ॥ देवाचि बरे देवाचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥ ४ ॥

३८७४. मरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ॥ १ ॥ नलगे सांडावें मांडावें । आहे शुद्धाचि स्वभावें ॥ २ ॥ घातला तो आशा ।

मोहोजाळें गळां फासा ॥ ३ ॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ॥ ४ ॥ करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥ ५ ॥ तैसा मान अपमान । लाभ हानि हे समान ॥ ६ ॥ तुका म्हणे याचें । नांव सोंवळें हें साचें ॥ ७ ॥

३८७५. चित्ताचें बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ १ ॥ अंतरीं वसावा उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न शकेची ॥ २ ॥ ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ घरिचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥ ४ ॥

३८७६. नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥ १ ॥ हर्षामर्षा अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा साडियेलें ॥ २ ॥ न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख देहनिरसनें । चिंतनें चिंतन तद्रूपता ॥ ४ ॥

३८७७. देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें झालें ब्रह्मरूप ॥ २ ॥ यजन याजन तप व्रतें करितां । विकल्पें नागवतां शुद्ध पुण्या ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥ ४ ॥

३८७८. साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं । प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ १ ॥ मग कासयानें पुन्हां संवसार । बीजाचे अंकुर दग्ध होती ॥ २ ॥ जिणें दिल्हें त्यासी द्यावा पिंडदान । उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥ ३ ॥ तुका म्हणे निज भोगइल निजतां । नाहीं होइल सत्ता दुजियाची ॥ ४ ॥

३८७९. विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥ आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥ कोणाहीं जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

३८८०. पुरुषावें तें ठाईं आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालु-

नियां ॥ १ ॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान ते ॥ २ ॥ फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनावें मूळ न पालटे ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघे गव्हांचे प्रकार । सोने अळंकार मिथ्या नांव ॥ ४ ॥

३८८१. पंचभुतांचा गोंधळ । केला एके ठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥१॥ तेथें काय मी तें माझें । काग वागवी तें ओझें । दहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ २ ॥ जीव न देखे मरण । धरा नवीं सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभा अशुभासी ॥३॥ इच्छा वाढविते वेल । खुटावा तो खरा बोल । तुका म्हणे मोल । झाकलें तों पावेल ॥ ४ ॥

३८८२. मी हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥ १ ॥ नाहीं होत उल्लंघन । नपतां भिन्न दुसरें ॥ २ ॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीग्वालें अंतर ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्वे देव । घेतां ठाव दावील ॥४॥

३८८३. मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥१॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥ २ ॥ दखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ ३ ॥ तुका म्हणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ४ ॥

३८८४ रूप नांव माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरी* ॥ १ ॥ शींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ २ ॥ पोटा आलें तिच्या लोळ मांडीवरी । पारखी न करी खंती चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्तिसाठीं हरिहर । अरूपीच क्षरविभाग हे ॥ ४ ॥

३८८५. सुख सुखा विरजण झालें । तें मथिलें नवनीत ॥ १ ॥ हाले डोळे हरुष काया । निवती बाह्या नयन ॥ २ ॥ प्रबळ तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ ३ ॥ तुका म्हणे भरली शीग । वरी मग वोसंडे ॥ ४ ॥

३८८६. कासया जी ऐसा माझा माथां ठेवा । भार तुम्ही देवा संतजन ॥ १ ॥ विचित्र विंदानी नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥ २ ॥ काय वानरांचे अंगीची ते शक्ति । उदका तरती

---

* तयापरी

वरी शिळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी निमित्याचि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ॥ ४ ॥

३८८७. देवाची भांडारी । आदा विनियोग करी ॥ १ ॥ आतां नमाखे हातपाय । नेणों हातें कैसें काय ॥ २ ॥ देवें नेला चिंता । झाला सकळ करिता ॥ ३ ॥ तुका म्हणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥ ४ ॥

३८८८. आतां येणेंविण नाहीं मज चाड । कोण बडबड करी वांयां ॥ १ ॥ सुख तेंचि दुःख पुण्य पाप खरें । हें तों आम्हां बरें कळों आलें ॥ २ ॥ तुका म्हणे वाचा वाहेली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ ३ ॥

३८८९. बहुतां जातींचा केला अंगीकार । बहुतही फार सर्वोत्तमें ॥ १ ॥ सत्ताचा नाहीं कोणाचिये वेचें । अक्षाभ्य ठायींचें ठायीं आहे ॥ २ ॥ लागताचि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणूचेंही ॥ ३ ॥ तुका म्हणे केला होय ठाकां ऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥ ४ ॥

३८९०. नव्हे शब्द एक देशी । सांडी गिवशी कोणाला ॥ १ ॥ झाली माझी वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ २ ॥ मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाहिला ॥ ३ ॥ आतां येथें कैंचा तुका । बोले शिक्का स्वामीचा ॥ ४ ॥

३८९१. आपुलें तों कांहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥ १ ॥ परि हे वाणी वायचळे । छंद करवितें बरळे ॥ २ ॥ पंचभूतांचा हा मेळा । देह सत्यत्वें निराळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भुली । इच्या उफराट्या चाली ॥ ४ ॥

३८९२. हीन शूर बुद्धीपासीं । आकृतीसी भेद नाहीं ॥ १ ॥ एक दांडा एक खांदी । पदोपदीं भोगणें ॥ २ ॥ एकाऐसें एक नाहीं । भिन्न पाहीं प्रकृती ॥ ३ ॥ तुका म्हणे भूमी खंडे । पीक दंड ऊर्थें तें ॥ ४ ॥

३८९३. देवासी तो पुरे एकभाव गांठी । तोचि त्याचे मिठी ले पायीं ॥ १ ॥ पाहोनि राहीन कवतुकें निराळा । मी मजवेगळा होऊनियां ॥ २ ॥ कांहीं नेघें शिरीं निमित्ताचा भार । नलगे उत्तर

वेचावेंचि ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें पडिलिया गांठी । मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ४ ॥

३८९४. जाय तिकडे लागे पाठी । नाहीं तुटी आठवाची ॥ १ ॥ हिरोनियां नेलें चित्त । माझें थीत भांडवल ॥ २ ॥ दावूनियां रूप डोळां । मन चाळा लावियलें ॥ ३ ॥ आणीक तोंडा पडिली मिठी । कान गोठी नाइकती ॥ ४ ॥ बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥ ५ ॥ तुका म्हणे प्रेमधगी । भरली अंगीं अखंड ॥६॥

३८९५. देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागवूनि केला भिकारी ॥१॥ धांवणियां धांवा धांवणियां धांवा । मागाचि नाहीं जावें कवणिया गांवा ॥२॥ सर्वांचि होता चोर घरिचिया घरीं । अवघें केलें वाटोळें फांवलियावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें कोणीच नाहीं । नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ४ ॥

३८९६. झालें आतां मोठें । कासयाचें लहान मोठें ॥ १ ॥ एक एका पडिलों हातीं । झाली तेव्हांची निश्चिंती ॥ २ ॥ नाहीं फिरों येत मागें । झालें साक्षीचिया अंगें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । आतां येथें नहीं हेवा ॥ ४ ॥

३८९७. वचनें ही नाड । न बोलतें मुकें खोड ॥ १ ॥ दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥ २ ॥ अंधार प्रकाशी । जाय दिवस पावे निशी ॥ ३ ॥ बीज पृथिवीच्या पोटीं । तुका म्हणे दावी दृष्टी ॥ ४ ॥

३८९८. वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥ १ ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ २ ॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ ३ ॥ तुका म्हणे काळ । अवघा गोविंदीं सुकाळ ॥ ४ ॥

३८९९. याजसाठीं भक्ति । जगीं रूढवावया ख्याति ॥ १ ॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलावया सहजें ॥ २ ॥ गौरवावया-साठीं । स्वामिसेवेची कसोटी ॥ ३ ॥ तुका म्हणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥ ४ ॥

३९००. निरंजनीं एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥ १ ॥ पाहा चाळविलें कैसें । लावूनि पिसें गोवळें ॥२॥ लपविलें अंगें अंग । दिला संग होता तो ॥३॥ तुका म्हणे नव्हतें ठावें । झालें भावें वाटोळें ॥४

३९०१. जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥ १ ॥ कोठोनियां कांहीं नलगे आणावें । नलगे कोठें जावें तरावया ॥ २ ॥ जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षु ॥ ३ ॥ तुका म्हणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

३९०२. अखंड मुद्दतर । सासुरवास करकर ॥ १ ॥ याची झाली बोळवण । आतां न देखो तो शीण ॥ २ ॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥ ३ ॥ तुका म्हणे मुळें । खंड झाला एक वेळे ॥ ४ ॥

३९०३ वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ १ ॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥ २ ॥ काळा नाहीं वाव । पराश्रमा कोठें ठाव ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ४ ॥

३९०४. माझ्या मुखें मज बोलवितो हरि । सकळांच्या अंतरीं नारायण ॥ १ ॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आम्ही ॥ २ ॥ तुका म्हणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकावितां ॥ ३ ॥

३९०५. उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ १ ॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐसीं झाडें किती नव खंडीं ॥ २ ॥ हेंचि ब्रह्मांड आम्हांसी । ऐसीं अगणित अंडें केशीं ॥ ३ ॥ विराटाचे अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥ ४ ॥ ऐशा विराटाच्या कोटी । सांठवल्या ज्याच्या पोटीं ॥ ५ ॥ तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा म्हणवी परमानंद ॥ ६ ॥ ऐशी अगम्य ईश्वरी लीला । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥ ७ ॥

३९०६. भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । संचिताची वाट । वाटा होऊनि फांकती ॥ १ ॥ भोगा ऐसें ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पा ॥ २ ॥ दिला पाडुनियां धडा । पापपुण्याचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥ ३ ॥ तुका म्हणे पराधीनें । झालीं ओढलीया ऋणें । तुटती बंधनें । जरि देवा आळविती ॥ ४ ॥

३९०७. तोंचि हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें बोळखी

तों ॥ १ ॥ नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ २ ॥ रवि नुगवे तों दीपिकांचें काज । प्रकाशें तें तेज सहज लोपे ॥ ३ ॥ तुका म्हणे देहसंबंधें संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ४ ॥

३९०८. ब्रह्मरसगोडी तयासी फावली । वासना निमाली समूळ ज्याची ॥ १ ॥ नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळा । उपाधीवेगळा जाणिवेच्या ॥ २ ॥ मन हें निश्चळ झालें एके ठायीं । तया उणें काइ निजसुखा ॥ ३ ॥ तेचि पुण्यवंत तेचि परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ५ ॥

३९०९. नेमणें आलें होतें गळया । लोक गळ्या करिती ॥ १ ॥ आपणियां सावरिलें । जग भलें आपण ॥ २ ॥ संबंध तो तुटला येणें । जागेपणें चेष्टांच्या ॥ ३ ॥ भलती सवा होती अंगें । वासर वेगें पडिलें ॥४॥ सावरिलें नीट वोजा । हाष्ट्रिलाजा पुढिलांच्या ॥५॥ बरे उघडिले डोळे हळहळेपासूनि ॥ ६ ॥ तुका म्हणे विटबना । नारायणा चुकली ॥ ७ ॥

३९१०. पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥१॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥ २॥ आइताच पाक । संयोगाचा सकळिक ॥ ३ ॥ तुका म्हणे धणी । सीमा राहिली होउनी ॥ ४ ॥

३९११. इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ २ ॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥ ३ ॥ तुका म्हणे काय बोलें । आतां भलें मौन्यचि ॥ ४ ॥

३९१२. देव आड आला । तो मी भोगितो उगला । अवघा निवारिला । शीण शुभअशुभाचा ॥ १ ॥ जीवाशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया कौतुकें । कैचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ २ ॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ ॥ ३ ॥ अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ४ ॥ प्रमादाचा रस । तुका लाधला सौरस । पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥५॥

३९१३. दाता नारायण । स्वयें भोगीता आपण ॥ १ ॥ आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥ २ ॥ देखतां जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥ ३ ॥ तुका म्हणे नाद । झाला अवघा गोविंद ॥ ४ ॥

३९१४. अक्षई तें झालें । आतां न मोडे रचिलें ॥ १ ॥ पाया पडिला खोले ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥ २ ॥ होतें विखुरलें । ताळा जमे झडतीं आलें ॥ ३ ॥ तुका म्हणे बोली । पुढें कुंठिताचि झाली ॥ ४ ॥

३९१५ मन वोळी मना । बुद्धि बुद्धि क्षणक्षणां ॥१॥ मींच मज राखण झालों । ज्यानें तेथेंचि धरिलो ॥२॥ जें जें जेथें उठी । तें तें तया हातें खुंटी ॥ ३ ॥ भांजणी खांजनी । तुका साक्ष उरला दोन्ही ॥४॥

३९१६. एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ १ ॥ अहंकारा नांवें दोष । त्याचे वोस पाडिले ॥ २ ॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञ सिद्धि देहहोम ॥ ३ ॥ जीवशिवा होता चुका । तेथें तुका विनटला ॥ ४ ॥

३९१७. उत्तम घालावें आमुचिये मुखीं । निवारावें दुःखी होऊं नेदी ॥ १ ॥ न बैसे न वजे जवळून दुरी । मागें पुढें वारी घातपात ॥ २ ॥ नाहीं शका असों भलतिये ठायीं । मावळलें पाही द्वैताद्वैत ॥ ३ ॥ तुका म्हणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥४॥

३९१८. सांपडला हातीं । तरी झाली हे निश्चिंती ॥ १ ॥ नाहीं धांवा घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥ २ ॥ सांडियला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥ ३ ॥ तुका म्हणे काम । निरसुनियां घेतों नाम ॥ ४ ॥

३९१९. एसिया संपत्ती आम्हां सवमार्गी । भोगाचिया परि काय सांगों ॥ १ ॥ काम तो कामना भोगीतसे देवा । आलिंगनें हेवा चरणचुंबीं ॥ २ ॥ शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥ ३ ॥ तुका म्हण पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें निरसलें ॥ ४ ॥

३९२०. भक्तिचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥ माउलीचे मागें बाळकांची हारी । एका सूत्रें

दोरी ओढतसे ॥ २ ॥ जेथील जें मागें तें गयासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ ३ ॥ सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥ ४ ॥ आदि अंत ठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे जग उल्हासनीं ॥ ५ ॥ भावारूढ तुका झाला एकाएकीं । देवचि लौकिकीं अवघा केला ॥ ६ ॥

३९२१. जाणपण बरें देवाचे तें शिरीं । आम्ही ऐसीं बरीं नेणतींच ॥ १ ॥ देखणियापुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ २ ॥ आशंकेची बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥ ३ ॥ तुका म्हणे दिशा मोकळ्या सकळा । अवकाशीं खेळा ठाव झाला ॥ ४ ॥

३९२२. जळों आतां नांव रूप । माझें पाप गांठीचें ॥ १ ॥ संताचिया चरणरजें । उतरूं ओझें मातीचें ॥ २ ॥ लटिक्याचा अभिमान । होता शीण पाववीत ॥ ३ ॥ तुका म्हणे अरूपींचें । सुख साचें निनांवें ॥ ४ ॥

३९२३. नव्हतियाचा सोस होता । झडों आतां पदर ॥ १ ॥ देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥ २ ॥ लाभ वळों आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ४ ॥

३९२४. समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥ १ ॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस वोविया मंगळीं ॥ २ ॥ धार अखंडीत । ओघ चालियेला नित्य ॥ ३ ॥ पूर्णाहुति जीव । तुका घेऊनि ठेला भाव ॥ ४ ॥

३९२५. अवघाचि आकार ग्रासियेला काळें । एकाचि निगळें हरिचें नाम ॥ १ ॥ धरूनि राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांठविलें ॥ २ ॥ शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥ ४ ॥

३९२६. बोलणेंचि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥ १ ॥ एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥ पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टि धाय ॥ ३ ॥ तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहाणें ॥ ४ ॥

३९२७ पट्टे ढाळूं आम्ही विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पाप-पुण्य ॥ १ ॥ निर्भर अंतरीं सदासर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ २ ॥ बळिवंत जेणें रचिलें सकळ । आम्हां त्याचें बळ अंकितासी ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही देखताचि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥ ४ ॥

३९२८. पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥ १ ॥ आव-श्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ २ ॥ भिक्षा कामधेनु ऐशी । अवकाशीं शयन ॥ ३ ॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥ ४ ॥

३९२९. सांगतां गोष्टी लागती गोडा । हा तो रोकडा अनुभव ॥ १ ॥ सुख झालें सुख झालें । नये बोलें बोलता ॥ २ ॥ अंतर तों नये दिसों । आतां सोस कासया ॥ ३ ॥ तुका म्हणे जतन करूं । हेंचि धरूं जीवेंसी ॥ ४ ॥

३९३०. आठवूंचि नेदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्हीं राहे ॥ १ ॥ मन धांवे तेथें तिचेंचि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ २ ॥ नलगे वळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे समपाउलाचा खुंट । केला बळकट हालों नेदी ॥ ४ ॥

३९३१. साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण सेवकें स्वामि-सत्ता ॥ १ ॥ प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्म रसें अलिप्त त्या ॥ २ ॥ सांगणें त नाहीं करणें आपण । मोलाही वचन वाढ झालें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां भांडवल हातीं । येरझार खाती केवढिये ॥ ४ ॥

३९३२. आमुचें जीवन हें कथाअमृत । आणिकही संत समागम ॥ १ ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ २ ॥ धालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥३॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । राशी ते अंबरीं न समाये ॥ ४ ॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका म्हणे ॥ ५ ॥

३९३३. जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ १ ॥ संचित सारूनि बांधिलें धरणें । तुंबिलें जीवन

आक्षेपे* हें ॥ २ ॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाहीं एक झालें ॥ ३ ॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळ । प्राप्तबीज मूळ अवघें नासे ॥ ४ ॥ तुका म्हणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥ ५ ॥

३९३४. ‡ परमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥१॥ सकळही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥ सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥३॥ तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं॥४॥

३९३५. तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें । मानावया जग आप्त-पणें ॥ नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें ॥ भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचिपणें ॥ विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं तुटित तेणें ॥ १ ॥ आतां त्यांसीं काय चाले माझें बळ । झालोंसें दुर्बळ सत्त्वहीन ॥ दग्ध पट दिसे संगति× बरवंट । काय त्याचें कारण ॥ २ ॥ आळस दृष्टी न पाहे आपुलें । एकाचि देखिलें सर्वरूप ॥ मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन तो कोण बाप ॥ ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप ॥ विठ्ठल वांचुनि कांहींच नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥ ३ ॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया ॥ सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुर्ग तया ॥ मीतूंपणा निष्काम होऊनि । राहिलों आपुलिया ठाय ठायां ॥ तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका म्हणे देवराया ॥ ४ ॥

३९३६. वेद जया गाती । आम्हां तयाची संगती ॥ १ ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥२॥ ॐकाराचें बीज । हातीं आमुचें तें निज ॥३॥ तुका म्हणे बहु मोठें । अणुरेणुया धाकुटें ॥४॥

३९३७. जेथें माझी दृष्टी जाय । तेथें पाय भावीन ॥ १ ॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ २ ॥ अवघाच अवघे देशी । सुखराशी संपन्न ॥ ३ ॥ तुका म्हणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ४ ॥

---

* साक्षेपें. ‡ प्रेमअमृतें. × संगित.

३९३८. उपाधीचें बीज । जळोनि राहिलें सहज ॥ १ ॥ आम्हां राहिली ते आतां । चाली देवाचिया सत्ता ॥ २ ॥ पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणें पाय । खुंटले आणीक उपाय ॥ ४ ॥

३९३९. नव्हती हीं माझीं जायाचीं भूषणें । ऐसें नारायणें उचित केलें ॥ १ ॥ शब्दाच्या वोवणीं रत्नाचिया माळा । मुक्तींचा जिव्हाळा झरवणी ॥ २ ॥ अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें उरों दिलें ॥ ४ ॥

३९४०. बहु नांवें ठेविलीं स्तुतीची आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥ १ ॥ बहु मोमें सेवन केलें बहुवम । बहु झाला दिस गोमटयाचा ॥ २ ॥ बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥ ३ ॥ बहु तुका झाला बहु निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनियां ॥ ४ ॥

३९४१. हा तों नव्हे कांहीं निगशेचा ठाव । भलें पोटीं वाव राखिलिया ॥ १ ॥ विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं । तेथेंचि शेवटीं आम्ही असों ॥ २ ॥ नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥ ३ तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणे खुणा जाणतसों ॥ ४ ॥

३९४२. न संडावा आता ऐसा वाटे ठाव । भयासी उपाव रक्षणाचा ॥ १ ॥ म्हणऊनि मनें वळियेलें मन । कारियाकारण चाड नाहीं ॥ २ ॥ नाणावी उपाधि करूनियां मूळ । राखतां विटाळ तेंचि व्हावें ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें न वेंचे वचन । निजीं निजखूण सांपडली ॥ ४ ॥

३९४३ सत्तेचें भोजन समर्थां आतुडे । सेवनही घडे रुचिनेसी ॥ १ ॥ वर्मे भ्रम नेला झाले एकमय । हृदयस्थीं सोय संग झाला ॥ २ ॥ कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वित्त नेम झाला ॥ ३ ॥ तुका म्हणे धणी ऐसा झालों आतां । करीन तें सत्ता माझी आहे ॥ ४ ॥

३९४४. कोण होईल आतां संसारपांगिलें । आहे उगवलें

सहजाचि ॥ १ ॥ केला तो चालवीं आपुला प्रपंच। काय कोणां वेच आदा घे दे ॥ २ ॥ सहजाच घडे आतां मोळ्याविण । येथें काय श्रीम आणि लाभ ॥ ३ ॥ तुका म्हणे झालों सहज देखणा । ज्याच्या त्यानें खुणा दाखविल्या ॥ ४ ॥

३९४५. म्हणऊनि झालों क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापाशीं आवरूनि ॥ १ ॥ कदापिही नव्हे सीमा उल्लंघन । केलें विसर्जन आव्हानींच ॥ २ ॥ पारिखा तो आतां झाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ॥ ३ ॥ तुका म्हणे कार्यकारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ॥ ४ ॥

३९४६.* शुद्धारसें ओलावली । रसना धाली न धाये ॥१॥ कळों नये झाली धणी । नारायणीं पूर्णता ॥ २ ॥ आवडे ते तेचि यासी । ब्रह्मरसीं निरसें ॥३॥ तुका म्हणे बहुता परी । ¶करूनि करीं सेवन ॥ ४ ॥

३९४७. मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ॥ १ ॥ पाहिजे हें क्षमा केलें । येणें बोलें विनवणी ॥ २ ॥ मीच माझें मीच माझें । झालें ओझें अन्याय ॥३॥ आधीं आंचवला आधीं आंचवला । तुका जाला निमनुष्य ॥ ४ ॥

३९४८. होंच भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ १ ॥ सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या तहान भूक जाय ॥ २ ॥ दूरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जीवनासी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम घेतां वेळोवेळां । होतील शीतळा सकळा नाडी ॥ ४ ॥

३९४९. कां रे तुम्हीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोढवलें ॥ १ ॥ भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥ २ ॥ पुसिलें पडळ तिमिर विटलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ॥ ३ ॥ तुका म्हणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळा असे वरी ॥ ४ ॥

३९५०. शरणागत झालों । तेणें मीपणा मुकलों ॥ १ ॥ आता

---

* सुधारसें ¶ करुणाकरीं

दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ॥ २ ॥ नलगे उचित । कांहीं पाहावें सांचन ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवा । माने तैसी करूं देवा ॥ ४ ॥

३९५१. आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ॥ १ ॥ अवघिया केली काळें तडातोडी । अवसर घडी पुरों नेदी ॥ २ ॥ वांटणी घातल शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियला ॥ ३ ॥ आवडीच्या आलें आहारासी रूप । पृथक संकल्प मावळले ॥ ४ ॥ काम तरी क्रोध बुद्धि मन नामे । भ्रमाचें वोळसे गिळिलें शांती ॥ ५ ॥ तुका ह्मणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकाविध ॥ ६ ॥

३९५२. आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥ १ ॥ काय सांगों झालें कांहींचियाबाई । पुढे चालेना नाहीं आवडीनें ॥ २ ॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ॥ ४ ॥

३९५३. नाहीं लाग माग । न देखेंसें झालें जग ॥ १ ॥ आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ २ ॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ४ ॥

३९५४. धवळलें जगदाकार । अंधार तो निरसला ॥ १ ॥ लपों जातां ठाव नाहीं । प्रगट पाहीं पसारा ॥ २ ॥ खरियाचा दिवस आला । वाडी बोला न पुरे ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें साटीं । पाडिली मिठी धुरेसी ॥ ४ ॥

३९५५. रुसलों संसारा । आम्ही आप आणि परा ॥ १ ॥ म्हणऊनि केली मांडी । देऊनि पडिलों मुरकुंडी ॥ २ ॥ परतेचि ना मागें । मोहो निष्ठुर झालों अंगें ॥ ३ ॥ सांपडला देव । तुका म्हणे गेला भेव ॥ ४ ॥

३९५६. एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाटीं ॥ १ ॥ घेतो काम सत्ताबळें । माझें करूनि भेडोळें ॥ २ ॥ धांव मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ॥ ३ ॥ तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥ ४ ॥

३९५७. कोणापाशीं द्यावें मास । आपेआप राहिलें ॥ १ ॥ कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥ २ ॥ एकें दाखविलें दाहा ।

फांटा पाहा पुसून ॥ ३ ॥ तुका म्हणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ॥ ४ ॥

३९५८. प्रवृत्तिनिवृत्तींचे आटूनियां माग । उतरिलें चांग रसायन ॥ १ ॥ ज्ञानाग्निहुताशीं कडशिलें वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥ २ ॥ ब्रम्हीं ब्रह्मरस सिद्ध झाला पाक । घेतला रूचक प्रतीतीमुखें ॥ ३ ॥ स्वानुभव अंगीं झाला समरस । साधनीं निजध्यास ग्रासोग्रासीं ॥ ४ ॥ आरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरवला रंगीं निजात्मरंगें ॥ ५ ॥

३९५९. विचारिलें आधीं अपुल्या मानसीं । वाचों येथें कैसी कोण्या द्वारें ॥१॥ तंव साह्य झाला हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नाश नाहीं ॥ २ ॥ उद्वेगाचे हातों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तीरीं पाविजेल ॥ ३ ॥ तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासवीस ॥ ४ ॥

३९६०. आतां नव्हे गोड करितां संसार । आणीक संचार झाला माजी ॥ १ ॥ ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥ २ ॥ रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निवविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥ ४ ॥

३९६१. चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मी सांपडलों ॥१॥ पाठी लागे करी नाम । गर्भवास भोगवी ॥२॥ माझें तुझें भिन्नभावें । गळां दावें मोहाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥ ४ ॥

३९६२. पाहातां हें बरवें झालें । कळों आलें यावरी ॥ १ ॥ मागिलांचा झाला झाडा । त्या निवाडास्तव हे ॥ २ ॥ विसांवलें अंग दिसे । सरिसे सरिसें अनुभवें ॥ ३ ॥ तुका म्हणे बरें झालें । देवें नेलें गवसूनि ॥ ४ ॥

३९६३. चक्रफेरीं गळीं गळा । होता गोंवियेला माळा ॥ १ ॥ फुटोनियां गेला कुंभ । झालों निष्काम स्वयंभ ॥ २ ॥ धरिताचि नाहीं थारा । वेठी भ्रमण लोंकरा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोडें । आगी काय जाणे मडें ॥ ४ ॥

३९६४. माझिया मनाची बैसली आवडी । आवसान घडी एकी नेघे ॥ १ ॥ पाय चित्तीं रूप डोळांच बैसलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥ २ ॥ अवघियांचा झाला विसरू हा मार्गे । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥ ३ ॥ तुका म्हणे कानीं आइकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ॥ ४ ॥

३९६५. याची कोठें लागली चट । बहु तंट झालेंसे ॥ १ ॥ देवपिसी देवपिसी । मज ऐसी जग म्हणे ॥ २ ॥ एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥ ३ ॥ तुका म्हणे याचे भेटी । झाली तुटी आपल्यासी ॥ ४ ॥

३९६६. पडिलिया ताळा । मग अवघा निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥ १ ॥ जोडिलें तें लागे हातीं । आपआपलीं निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेयें दोन्ही नासलीं ॥ २ ॥ सहज सरलिया कारण । मग एकला आपण । दिसेतरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ ३ ॥ करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागती ॥ ४ ॥

३९६७. स्वामीचिया सत्ता । आधीं वर्मे येती हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥ १ ॥ करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ॥ २ ॥ मन मेळविलें मना । नाहीं अभावीं शहाणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्या उमटोनि ॥ ३ ॥ * पराश्रमें + काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥ ४ ॥

३९६८. एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥ १ ॥ वेळोवेळां जागवितों । दुर्जे येइल म्हूण भीतों ॥ २ ॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥ ३ ॥ तुका झालासे शहाणा । आड लपे नारायणा ॥ ४ ॥

३९६९. हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥ १ ॥ नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥ २ ॥ अवघा रुधावला ठाव ।

---

*नाहीं पराश्रमें +कळा

नेला ठाव मी माझें ॥ ३ ॥ तुका म्हणे एके ठायीं । असों नाहीं क्षण भिन्न ॥ ४ ॥

३९७०. भय होतें आम्हीपणें । पाठी येणें घातलें ॥ १ ॥ अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेचि ना ॥२॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ॥ ३ ॥ तुका म्हणे नारायणें । केलें जिणें सुखाचें ॥ ४ ॥

३९७१. विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ॥ १ ॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ४ ॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥ ५ ॥

३९७२. मागें पुढें नाहीं । दुजें यावेगळें कांहीं ॥ १ ॥ नाहीं उरलें आणीक । केला झाला सकळिक ॥ २ ॥ विश्वासावांचून । नांवें दुजियाचें शून्य ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाची उरी नाहीं ॥ ४ ॥

३९७३. म्हणउनि झाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥ १ ॥ दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥ २ ॥ हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥ ३ ॥ तुका म्हणे एकांतसुखें अवघीं गोतें गुंतलीं ॥ ४ ॥

३९७४. तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥ १ ॥ आर्तचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥ २ ॥ तुका म्हणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥ ३ ॥

३९७५. उपचारासी वांझ झालों । नका बोलों यावरी ॥ १ ॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥ २ ॥ दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहुमतें ॥ ३ ॥ एकाएकी आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ४ ॥

३९७६. मागें बहुत झालें खळ । आतां बळ वोसरलें ॥ १ ॥ झालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥ २ ॥ भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहातां घडी । जगा जोडी अंगारा ॥ ४ ॥

३९७७. शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥ १ ॥ म्हणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्य अभिषेक ॥ २ ॥ एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहात ध्वनी गगन गर्जे ॥ ३ ॥ तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनी उल्हासा सप्रमता ॥ ४ ॥

३९७८. मानूं कांहीं आम्हीं आपुलिया इच्छा । ना तरी सरसा अंकरावो ॥ १ ॥ आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जा जीवीं चाड नाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हीं खेळों सहज लीळे । म्हणोनि निराळे सुखदुःखा ॥ ३ ॥

३९७९. लटिकें हांसें लटिकें रडें । लटिकें उडें लटिक्यापें ॥ १ ॥ लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥ २ ॥ लटिकें गाय लटिकें ध्याय । लटिकें जाय लटिक्यापें ॥ ३ ॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जगमाया ॥ ४ ॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥ ५ ॥

३९८०. ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ॥ १ ॥ तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण झाला हरि ॥ २ ॥ चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगों काय । एकाएकीं वृत्ति हरिमय ॥ ४ ॥

३९८१. देव झाले अवघे जन । दोष गुण हारपले ॥ १ ॥ बरवें झालें बरवें झालें । चित्त धालें महालाभें ॥ २ ॥ दर्पणीचें दुसरें भासें । परि तें असे एक तें ॥ ३ ॥ तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी वोहोळासी ॥ ४ ॥

३९८२. मायबापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ॥ १ ॥ भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥ २ ॥ उत्तम तें बाळा-साठीं । लावी ओठीं माउली ॥ ३ तुका म्हणे झाली धणी । आनंद मनीं न समाये ॥ ४ ॥

३९८३. ज्यांच्या संगें होतों पडिलों भोवणीं । ते केली धोवनी झाडोनियां ॥ १ ॥ आतां एकाएकीं मनासीं विचार । करूं नाहीं भार दुजियाचा ॥ २ ॥ प्रसादसेवनें आली उष्टावळी । उचित ते

काळीं अवचित ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म सांपडलें हातीं । सांडिली ते खंती चिंता देवा ॥ ४ ॥

३९८४. गोडपणें जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ॥ १ ॥ आतां भजों कवणें परी । देव सबाह्य अंतरीं ॥ २ ॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ ३ ॥ हेम अळंकार नामीं । तुका म्हणे तैसे आम्ही ॥ ४ ॥

३९८५. येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥ उंच देवाचे चरण । तेथें झालें अधिष्ठान ॥ २ ॥ आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ॥ ३ ॥ तुका म्हणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ॥ ४ ॥

३९८६. रंगलिया रंग पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥ १ ॥ सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसे शोभा देती ॥ २ ॥ पवित्र झालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥ ४ ॥

३९८७. अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ १ ॥ मदें माने तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ॥ २ ॥ आणिकांची वाणी वदे तेणें मुखें । उपचारदुःखें नाठवती ॥ ३ ॥ तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ४ ॥ तुका म्हणे बाह्य रंग जो विटला । अंतरीं निवाला ब्रह्मरसें ॥ ५ ॥

३९८८. बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जनीं आम्हां ॥ १ ॥ भोगीं त्याग झाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥ तुका म्हणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ॥ ३ ॥

३९८९. उपाधीच्या नांवें घेतला शितोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ १ ॥ काशासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवे मारगासि ॥ २ ॥ कांहीं नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविलें ॥ ४ ॥

३९९०. चिंतनें आचिंत राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ॥ १ ॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ॥ २ ॥ करूं आला तो तो केला लवलाहो । उरोंचि संदेहो दिला नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मोहो परतेचि ना मागें । ह्मणउनि त्यागें त्याग झाला ॥ ४ ॥

३९९१. कृष्णांजनें झाले सोज्ज्वळ लोचन । तेणें दिले वाण निवडुनी ॥ १ ॥ निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें तेणें गोड नारायणें ॥ २ ॥ भाग्यवंताघरीं करितां विश्वासें । कार्य त्यासरिसें होईजेतें ॥ ३ ॥ तुका म्हणे पोट भरे बऱ्या वोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ॥ ४ ॥

३९९२. अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥ १ ॥ तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न समाये । उपमेशीं काय देऊं सुखा ॥ २ ॥ भावाचें मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी सांठवण ॥ ४ ॥

३९९३. श्रमपरिहारा । मूळ झालों दातारा ॥ १ ॥ देह निवेदूनि पायीं । झालों निष्काम उतराई ॥ २ ॥ आपली ते सत्ता । येथें असों नेदी आतां ॥ ३ ॥ राहिला निराळा । तुका खटपटीवेगळा ॥ ४ ॥

३९९४. मनाचिये साक्षी झाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥ १ ॥ तुम्हां परामृष घेतां सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वांचों ॥ २ ॥ मी माझें मांडून यावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥३॥ तुका म्हणे आम्ही तुजविण एका । निढळ लौकिका माजी असों ॥ ४ ॥

३९९५. पंचभूतांचे सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥ १ ॥ आपल्या आपण बांधविला गळा । नेणोंचि निराळा असतांही ॥ २ ॥ कामया हा सत्य मानिला संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ ३ ॥ कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ४ ॥ किंचित सुखाचा धरिला अभिलास । तेणें बहु नास केला पुढें ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करुनि सांडूं होळी संचिताची ॥ ६ ॥

३९९६. देवासी लागे सकळांसी पोसावें । आम्हां नलगे खावें काय चिंता ॥ १ ॥ देवा विचारावें लागे पापपुण्य । आम्हांसी हें जन अवघें भलें ॥ २ ॥ देवासी उत्पत्ति लागला संहार । आम्हां नाहीं फार थोडें कांहीं ॥ ३ ॥ देवासी काम लागला धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥ ५ ॥

३९९७. यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारिय कारणा । पावावया उपासना । ब्रम्हस्थानीं प्रस्थान ॥ १ ॥ एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ॥ २ ॥ अवश्यक तो शेवट । येर अवघी खटपट । चालों जाणें वाट । ऐसा विरळा एखादा ॥ ३ ॥ तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरा वेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥ ४ ॥

३९९८. थुंकोनियां मान । दंभ करितो कीर्तन ॥ १ ॥ झालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ २ ॥ अर्थ अनर्थासारिखा । करुनि ठेविला पारिखा ॥ ३ ॥ उपाधि वेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ४ ॥

३९९९. अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघींच दान दिली भूमि ॥ १ ॥ अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ २ ॥ अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि सांग झालें कर्म ॥ ३ ॥ अवघेंचि फळ आलें आम्हां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ५ ॥

४०००. मज अंगाच्या अनुभवें । कांहीं वाईट बरें ठावें ॥ १ ॥ झालों दोहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥ २ ॥ वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ ३ ॥ तुका म्हणे घेऊं देवा । सवें करुनि वोळावा ॥ ४ ॥

४००१. संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा जाला नारायण ॥ १ ॥ नाहीं आम्हांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥ २ ॥ द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ॥ ३ ॥ तुका म्हणे हरि । आम्हांमाजी क्रीडा करी ॥ ४ ॥

४००२. पिंडदान पिंडें ठेविलें करून । तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥ १ ॥ सारिले संकल्प एकाचि वचनें । ब्रम्हीं ब्रह्मार्पणें शेवटींच्या ॥ २ ॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एका एक वर्म एकोविष्णु ॥ ३ ॥ पित्यापुत्रत्वाचें झालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥४॥ आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ॥ ५ ॥ तुका म्हणे केला अवघ्यांचा उद्धार । आतां नमस्कार शेवटींचा ॥६॥

४००३. नभोमय झालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥ १ ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ २ ॥ कैचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥ ३ ॥ तुका म्हणे कल्प झाला । अस्त गेला उदय ॥ ४ ॥

४००४. उद्योगाची धांव बैसली आसनीं । पडिलें नारायणीं मोटळें हें ॥ १ ॥ सकळ निश्चिंती झाली हा भरंवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥ २ ॥ आपुलिया सत्ते नाहीं आम्हां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ॥ ३ ॥ तुका म्हणे चळे एकाचिया सत्ते । आपुलें मी रितेपणें असें ॥ ४ ॥

४००५. सहज लीळा मी साक्षी याचा । नये वेंचू वाचा ऐसें झालें ॥ १ ॥ उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुंफों नेणें ॥ २ ॥ तमनासी परी वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हां नये तोंड दावूं ॥ ४ ॥

४००६. भयाची तों आम्हां चित्तीं । राहों खंती शकोचिना ॥१॥ समर्पिलों जीवेंभावें । काशा भ्यावें कारणें ॥ २ ॥ करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेल ॥ ३ ॥ तुका म्हणे माप भरूं । दिवस सारूं कवतुकें ॥ ४ ॥

४००७. इहलोकीं आम्हां वस्तीचें तें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥ १ ॥ कार्यापुरतें कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ २ ॥ सोंगसंपादणी चालवितों वेव्हार । अत्यंतीं आदर नाहीं गोवा ॥ ३ ॥ तुका म्हणे वेंच लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणा ॥ ४ ॥

४००८. नाहीं आम्हां शत्रु सोइरे पिशुन । दाटलें हें घन माहियेर

॥ १ ॥ पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥ २ ॥ लाज भय कांहीं आम्हां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगतां ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचीं बाळें । झालों लडिवाळें मकळांचीं ॥ ४ ॥

४००९. शुभ झाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ १ ॥ हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ॥ २ ॥ सुखदुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हित फळें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आम्हांसी हे भले । अवघेचि झाले जीव जंत ॥ ४ ॥

४०१०. जालें पीक आम्हां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥ १ ॥ झाली आराणूक अवघियांपासून । अवघा गेला शीणभाग आतां ॥ २ ॥ अवघा झाला आम्हां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥ ३ ॥ अवघेचि आम्ही ल्यालों अळंकार । शोभलोंहि फार अवघ्यांवरी ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचे दास । करणें नलगे आस आणिकांची ॥ ५ ॥

४०११. संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥ १ ॥ आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ॥ २ ॥ नाहीं कामा हातीं । आराणूक दिवसरातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्ता । आतां पुरे पराधीनता ॥ ४ ॥

४०१२. आतां बरें झालें । माझें माथांचें निघालें ॥ १ ॥ चुकली हे मरमर । भार माथाचे डोंगर ॥ २ ॥ नसतां कांहीं जोडी । केली बहुतें तडातोडी ॥ ३ ॥ झाला झाडापाडा । तुका म्हणे गेली पीडा ॥ ४ ॥

४०१३. भावाचिया बळें । आम्ही निर्भर दुबळें ॥ १ ॥ नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥ २ ॥ तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥ ३ ॥ एकछत्री राज । तुक्या पांडुरंगीं काज ॥ ४ ॥

४०१४. धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ॥ १ ॥ क्रीडा करूं निरंजनीं । न पुरे धणी हरिसवें ॥ २ ॥ अवघें खेळों

अवघ्यामधीं । डाई न पडो ऐसी बुद्धि ॥ ३ ॥ तुका म्हणे वांचवितां । आम्हां सत्ता समर्थ ॥ ४ ॥

४०१५. आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ १ ॥ मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥ २ ॥ नाहीं निपराध । कोणां आम्हांमध्यें भेद ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम । अवघें आमचें हें धाम ॥ ४ ॥

४०१६ विषयीं विसर पाडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥१॥माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे॥२॥ लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥३॥ तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ॥ ४ ॥

४०१७. आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हां पोटीं ॥ १ ॥ प्रेमा चालिला प्रवाहो । नाम ओघ लवलाहो ॥ २ ॥ अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥ ३ ॥ थडी अहिक्य परत्र । तुका म्हणे समतीर ॥ ४ ॥

४०१८. तान्हे तहान प्याली । भूक भुकेनें खादली ॥ १ ॥ जेथें तेंच नाहीं झालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ २ ॥वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ ३ ॥ शेष उरला तुका । जीवीं जीवा झाला चुका ॥ ४ ॥

४०१९. घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवीं । तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षी वर्तनें ॥ १ ॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ॥ २ ॥ देह संकल्पासारिखें । एकएकांसी पारिखें । सुख आणि दुःखें । अंगीं कर्मे त्रिविध ॥ ३ ॥ तुका म्हणे कोडें । नकळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडें । उगवे केलें विदान ॥ ४ ॥

४०२०. आम्ही क्षेत्रींचे संन्यासी । देह भरित हृषीकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ॥ १ ॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आम्हां भागा । दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिती ॥२॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडन । बंदी बंदाची कौपीन । बहिरवास औटडें ॥ ३ ॥ काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ ।

लौकिकी विटाळ । धरूनि असों एकांत ॥ ४ ॥ कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें केली । स्वरूपींच वोळखी ॥ ५ ॥ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरिवरि । आहे तैसीं बरीं । खंडें निवडी वेदांचीं ॥ ६ ॥

४०२१. काम नाहीं काम नाहीं । झालों पाहीं रिकामा ॥ १ ॥ फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ॥ २ ॥नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ॥ ३ ॥ एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ॥ ४ ॥

४०२२. सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ॥ १ ॥ गोत पति विश्वंभरीं । झाला हरि सोयरा ॥ २ ॥ वोळखी ते एका नांवें । इतर * भाव खंडणा ॥ ३ ॥ तुका म्हणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ४ ॥

४०२३. ज्या ज्या आम्हापाशीं होतील ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥ १ ॥ अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणा ठाव पुसियेला ॥ २ ॥ ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाय बोल बोल गाय नाचे ॥ ४ ॥

४०२४. याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ॥ १ ॥ आता निश्चिंतीनें पावलों विसांवा । खुटालिया धांवा तृष्णेचिया ॥ २ ॥ कवतुक वाटे झालिया वेंचाचें । नांव मंगळाचे तेणें गुणें ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ४ ॥

४०२५. अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मन ठायीं ॥ १ ॥ पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥ २ ॥ एकाचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हीं जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ॥ ४ ॥

४०२६. खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ १ ॥ वीट

* वाव

नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ॥ २ ॥ हृदयाची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥ ३ ॥ तुका म्हणे पोट भरे । परि तें उरे भूक पुढें ॥ ४ ॥

४०२७. आतां मी सर्वथा नव्हें गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ॥ १ ॥ माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ २ ॥ बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकासी ॥ ३ ॥ दुष्ट नव्हों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥ ४ ॥ संवसार आम्हां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥ ५ ॥ तुका म्हणे झालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥ ६ ॥

४०२८. स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठी । झालिया शेवटीं । जागे लटिकें सकळ ॥ १ ॥ वायां भाकिली करुणा । मूळ पावावया शीणा । राव रंक राणा । कैचे स्थानावरी आहे ॥ २ ॥ सोशिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभवही सांगे । दुःखें डोळ उघडीले ॥ ३ ॥ तुका म्हणे संतीं । सावाचेत केलें अंतीं । नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ४ ॥

४०२९. न देखोनि कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥ १ ॥ झालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ॥ २ ॥ न घेतां घेतलें । हात पाय उसंतिलें ॥ ३ ॥ खादलें न खातां । रसना रस झाली घेतां ॥ ४ ॥ न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ॥ ५ ॥ नाइकिलें कानीं । तुका म्हणे आलें मनीं ॥ ६ ॥

४०३०. निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥ मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहींपासुनी ॥ २ ॥ देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें तें बरें ॥ ३ ॥ अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुकयाचें ॥ ४ ॥

४०३१. जन विजन झालें आम्हां । विठ्ठलनामाप्रमाणें ॥ १ ॥ पाहें तिकडे मायबाप । विठ्ठल आहे रखुमाई ॥ २ ॥ वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता झाला ॥ ३ ॥ आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ॥ ४ ॥

४०३२. माझिया मीपणा । झाला यावरी उगाणा ॥ १ ॥ भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ॥ २ ॥ टाळिलें निमित्त । फार थोडे घात हित ॥३॥ यावें कामावरी । तुका म्हणे नाहीं उरी ॥४॥

४०३३ माझें माझ्या हाता आलें । आतां भलें सकळ ॥ १ ॥ काशासाठीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ॥ २ ॥ झालीं तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥ ३ ॥ तुका म्हणे शुद्ध कुळ । तेथें मळ काशाचा ॥ ४ ॥

४०३४. निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलोंसे ॥ १ ॥ निराभासीं पूर्ण झालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आम्ही ॥ २ ॥ तुका म्हणे आतां नाहीं अहंकार । झालों तदाकार नित्य शुद्ध ॥ ३ ॥

४०३५. पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥ जीवशिवा शेज रचिली आनंदें । आउटाविण पदीं आरोहण ॥ २ ॥ निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहत बाळका हल्लरु गाती ॥ ३ ॥

४०३६. रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ १ ॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली । कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥ २ ॥ देशकाळवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ ३ ॥ न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रम्ह आकळलें ॥ ४ ॥ तत्वमसि विद्या ब्रम्हानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥ ५ ॥

४०३७. बीज भाजुनि केली लाही । आम्हां जन्ममरण नाहीं ॥१॥ आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ॥ २ ॥ साकरेचा नोहे ऊस । आम्हां कैंचा गर्भवास ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघा जोग । सर्वांघटीं पांडुरंग ॥ ४ ॥

४०३८. पिकलिया मेंद कडुपण गेलें । तैसे आम्हां केलें पांडुरंगें ॥ १ ॥ काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि झाली ॥ २ ॥ आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ॥ ३ ॥ तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥ ४ ॥

४०३९. सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥ सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥ २ ॥ असों ऐसा कोठें आठवाचि नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आम्ही झालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥ ४ ॥

४०४०. पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानिलाभशंका नासलिया ॥ १ ॥ जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ॥ २ ॥ अधिकार जात वर्णधर्मयात । ठाव नाहीं सत्य असत्याशीं ॥ ३ ॥ जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्व पूजा ॥ ५ ॥

४०४१. भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आह्मांवरूनि चुकला ॥ १ ॥ करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥ २ ॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरी । आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ ३ ॥ तुका म्हणे ये आवडी । आम्हीं पायीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मांतरींचें ठेवणें ॥ ४ ॥

४०४२. बाहिर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासी जीवें वेटाळिलों ॥ १ ॥ एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडिलें ॥ २ ॥ झालीं दोन्हीं नामें एकाचि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ॥ ३ ॥ तुका म्हणे दाखविलीं मुक्ताफळीं । शिपलेचि स्वस्थळीं खुंटलिया ॥ ४ ॥

४०४३. बहुतां दिसांची आजि झाली भेटी । झाली होती तुटी काळगती ॥ १ ॥ येथें सावकाश घेइन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥ २ ॥ बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । व्याढला हा श्रमें श्रम होता ॥ ३ ॥ बहु दिस होता सांडिला मारग । क्लेशाचा त्या त्याग आजि झाला ॥ ४ ॥ बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥ ५ ॥ तुका म्हणे येथें झालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥ ६ ॥

४०४४. न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥ १ ॥

ज्याणें लौकिक हा केला । तो हा निवारिता भला ॥ २ ॥ माझे इच्छे काय । होणार ते एके ठाय ॥ ३ ॥ सुखा आणि दुःखा । म्हणे वेगळा मी तुका ॥ ४ ॥

४०४५. आम्ही मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥ १ ॥ सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ॥ २ ॥ बोलतसें जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥ ३ ॥ पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आह्मांसवें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्ही आइका हो मात । आम्ही या अतीत देहाहूनी ॥ ५ ॥

४०४६. आपुलें मरण पाहिलें म्या डोळां । तो झाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥ आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥ एकदेशी होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥ ३ ॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी झालों ॥ ४ ॥ नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥ तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ६ ॥

४०४७. मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ॥ १ ॥ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभाव ॥ २ ॥ आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बुनादीचें । झालें साचें उजवणें ॥ ४ ॥

४०४८. जगा काळ खाय । आम्हीं माथां दिले पाय ॥१॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करी माहे॥२॥ हरिच्या गुणें धाला। होता खातचि भुकेला ॥ ३ ॥ तुका म्हणे हळ । झाला कढत शितळ ॥४॥

४०४९. हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कलेवरा पाठी ॥१॥ नेऊनि निजविलें स्मशानीं । माणसें जाळी तें *ठिकाणीं ॥२॥ काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ॥ ३ ॥ नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥ ४ ॥ याजसाठीं हें निर्वाण । केलें कासियेलें मन ॥ ५ ॥ तुका म्हणे अनुभव बरा । नाहीं तरीं × हस्त पाय चोरा ॥ ६ ॥

---

* ठाकणीं × आस्त होय.

४०५०. मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाची ॥ २ ॥ न देखेंसें झाले श्रम । आलें वर्म हाता हें ॥ ३ ॥ तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥ ४ ॥

४०५१. जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानींचा ॥ १ ॥ रडती रात्रंदिवस कामक्रोधमाया । म्हणती हायहाय यमधर्म ॥ २ ॥ वैराग्याच्या शेर्णा लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसी ॥ ३ ॥ फिराविला घट फोडिला चरणीं । महावाक्य ध्वनि बोंब झाली ॥ ४ ॥ दिली तिळांजुळी कुळनामरूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ५ ॥ तुका म्हणे रक्षा झाली आपोआप । उजळला दीप गुरुकृपा ॥ ६ ॥

४०५२. कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥ १ ॥ सत्ता झाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोंवसा ॥ २ ॥ लडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुढावया ॥ ३ ॥ तुका म्हणे घटिका दिस । निमिषही न विसंबे ॥ ४ ॥

४०५३. आम्हां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ॥ १ ॥ परि हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहातों सकळ ॥ २ ॥ * अभयदानवंदें । आम्हां कैंचीं भयद्वंद्वें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही । हरिजन साधनाचे स्वामी ॥ ४ ॥

४०५४ अणुरेणुया थोडका । तुका आकाशा एवढा ॥ १ ॥ गिळुनी सांडिले कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥ २ ॥ सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ४ ॥

४०५५. माझे मनोरथ पावले जैं सिद्धी । तंइ पायीं बुद्धि स्थिरावली ॥ १ ॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥ २ ॥ त्रिविध तापाचें झालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ ३ ॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगोअंगीं संग अखंडित ॥ ४ ॥ जीवनाचा झाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं मावळलें ॥ ५ ॥ तुका म्हणे माप भरू आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥ ६ ॥

* अभयदानवृंदे.

## [ मागील अभंगांत राहिलेले स्फुट अभंग. ]

देवाशीं मलगीचीं भाषणें.

४०५६. अहो उभया विटेवरी । भरोवरी चुकविली ॥ १ ॥ निवारलें येणें जाणें । कोणा कोणें रुसावें ॥ २ ॥ संकल्पासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥ ३ ॥ तुका म्हणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥ ४ ॥

४०५७. कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥ १ ॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ २ ॥ कां हें चित्त नाहीं पावत विश्रांती । इंद्रियांची गति खुंटोचि ना ॥ ३ ॥ तुका म्हणे कां हो धरियेला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ॥ ४ ॥

४०५८. विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥ १ ॥ विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं । उतरील पारू भवनदीचा ॥ २ ॥ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधु ॥ ३ ॥ विठ्ठल हें जन विठ्ठल माझें मन । सोइरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ४ ॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । नस्वरित गांवा जाइन त्याच्या ॥ ५ ॥

४०५९. देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥ २ ॥ आरुष हे वाणी । गोड करुनि घेतां कानीं ॥ ३ ॥ आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहळे ॥ ४ ॥

स्थितीपर. ( जनाशीं उद्गार )

४०६०. लाडकी लेक मी संताची । मजवरी कृपा बहुतांची ॥ १ ॥ अखंड चुडा हातीं आला । आंकण मोती नाकाला ॥ २ ॥ बोध मुराळी श्रृंगारिला । चवऱ्यायशींचा सिक्का केला ॥ ३ ॥ तुका तुकीं उतरला । साहानकेचा कौल दिला ॥ ४ ॥

४०६१. उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ॥ १ ॥ बोलविले बोलें बोल । धनी विठ्ठल सन्निध ॥ २ ॥ नगी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गाबाळ ॥ ४ ॥

कोडें

४०६२. पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई । रुसूं नका तुगवे तो झवे आपुली आई ॥१॥ कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनी फार राहे गुंफोनियां थोडें॥२॥सांगतों हें मूळ काहीं न धरावी खंती। ज्यालें जीवों मेलें मरों प्रारब्धा हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळी ॥ ४ ॥

शीताशोक

४०६३. वासुगीच्या बनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येऊनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ १ ॥ सांग वो त्रीजटे सखिये ऐसी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उतावीळ जाला दुरी पंथ । राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥ २ ॥ काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें । तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगिलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥ ३ ॥ नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिले रघुनाथा पाठिलागे तेणें । उल्लंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखुनी सुनाट घेऊनि आलें सुनें ॥ ४ ॥ नाहीं मूळ मारग लागे अणीक सोय । एकाविण नामें रघुनाथाच्या माय । उपटी पाक्षिया एक देऊनि पाय । उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काय ॥ ५ ॥ जनकाची नंदिनी दुःखें ग्लांती थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी । संबोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी । घेईल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥ ६ ॥

## कान्होबाचे अभंग.

### नाट

४०६४. अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका । अगा जनार्दना जगव्यापका । अगा पालका भक्तांचिया॥१॥अगा ये वसुदेव-देवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंधा वामना । अगा निधाना गुणनिधी ॥ २ ॥ अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जिवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥ ३ ॥ अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरी गरुडध्वजा । अगा सुंदरा

सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णु ॥ ४ ॥ अगा अंबरऋषि परंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धनधरणीधरा । अगा माहेरा दीनाचिया ॥ ५ ॥ अगा धर्मराया धर्मशीळा । अगा कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ॥ ६ ॥ अगा चतुरा सुजाणा । मधुरगिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखे शरणा तुकयाबंधु ॥ ७ ॥

४०६५. देवा मी चांडाळ चांडाळ । म्हणतां लागताहे वेळ । नसे पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥ १ ॥ जन्मा उपजलियापासूनी । असत्य कर्म ते अझूनी । सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ २ ॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवे वार्ता । अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनीं ॥ ३ ॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी जैसा ॥ ४ ॥ निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संतउपहास । अभक्ष तेंही भक्षिलें ॥ ५ ॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलो नये घडलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी ॥ ६ ॥ काया मनें वाचा इंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु म्हणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥ ७ ॥

४०६६. काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । पतना नेऊं आदरिलें ॥ १ ॥ भलतिया सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कुडें काहीं कपट । घात बळकट मांडियेला ॥ २ ॥ न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्तही पाताळें आकाशा । घालीं उडी बळचि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ॥ ३ ॥ चेतवूनी इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुरावलीं शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ॥ ४ ॥ आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासावीसी । तुकयाबंधु म्हणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ॥ ५ ॥

४०६७. एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥१॥ नको दुजी

बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धि परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥ २ ॥ मना येईल तो जन्म देई । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनी तुवां न व्हावें ॥३॥ इतुकें करीं भलत्यापरी । भलत्याभावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनी कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ४ ॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥ ५ ॥

४०६८. तूं बळिया शिरोमणी । आहेसी माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी म्हणउनी । आतां करीन मी अमल तें॥१॥तूं देवा प्रतापदिनकर । सुराअसुरांचा सुर । महावीरा वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥ २ ॥ कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवांची बंदीशाळ । संहारूनी राक्षसदळ । शरणागत राज्यीं स्थापिला ॥ ३ ॥ उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥ ४ ॥ किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवेंभावें । तुकयाबंधु म्हणे करावें । क्षेम अवघें येणें काळें ॥ ५ ॥

४०६९. उभा देखिला भीमातीरीं । कर मिरविले कटावरी । पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तारि अनंत अतिगोड॥१॥ शंखचक्रांकित भूषणें । जाडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपली तेणें रवितेजें ॥ २ ॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिकामाळ । दंत ओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥३॥ कटीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभीं रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । धन्य ते माता प्रसवली ॥ ५ ॥

४०७०. कई देखता होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ति सांवळी । जीवा भाव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥ १ ॥ ऐसी कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापीं ॥ २ ॥ ऐसा कई येईन दैवास । दृश्य

नासोनी जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष भणीवरी ॥ ३ ॥ कई नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वी जळ सागर । वाहाती पूर आनंदाचे ॥ ४ ॥ प्रसन्न दया क्षमा शांति । कई नवविधा होईल भक्ति । भोगीन वैराग्यसंपत्ति । मनोरथ कळती तईं पुरले ॥५॥ तुकयाबंधु म्हणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । म्हणोनी घातलें साष्टांग । पांडुरंगा चरणावरी ॥ ६ ॥

कान्होबास तुकोबाच्या वियोगानें झालेला विरह.

४०७१. दुःखें दुभागलें हृदयसंपुष्ट । गहिंवरें कंठ दाटताहे ॥१॥ ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनियां वनामाजी ॥ २ ॥ आक्रंदतां बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ॥ ३ ॥ काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ॥४॥ तुज ठावें आम्हां कोणी नाहीं सखा । उभयलोकीं तुका तुजविण ॥५॥ कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । झालों दे रे भेटी बंधुराया ॥६॥

४०७२. सख्यत्वासी गेलों करित सलगी । नेणोचि अभागी महिमा तुझा ॥ १ ॥ पावलों आपुलें केलें लाहें रस । निदैवा परिस काय होय ॥ २ ॥ कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं । अद्यापिवरि तरी उपदेशीं ॥ ३ ॥ उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । कान्हा म्हणे कांहीं बोलों आतां ॥ ४ ॥

४०७३. असो आतां कांहीं करोनिया ग्लांती । कोणा काकुलती येइल येथें ॥१॥करूं कांहीं दिस राहे तो सायास । झोंबों त्या लागास भावाचिये ॥ २ ॥ करितां रोदना बापुडें म्हणती । परि नये अंतीं कामा कोणी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हें ॥ ४ ॥

४०७४. चरफडे चरफड शोकें शोक होये। कार्यमूळ आहे धीरापाशीं ॥ १ ॥ कल्पतसे मज ऐसें हे पाहातां । करावा ते चिंता मिथ्या खोटी ॥ २ ॥ न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकटाचि सत्वा होईल हानी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे दिला बंद मना । वांचुनी निधाना न पवीजे ॥ ४ ॥

कान्होबाचें तुकोबाच्या वियोगामुळें देवाशीं कठोर भाषण.

४०७५. नलगे चिंता आतां अनुमोदन होता । आलें मूळ भ्राता गेला त्याचें ॥१॥ घरभेद्या येथें आहे तें सुकानु । धरितों कवळून पाय दोन्ही ॥ २ ॥ त्याचें त्याचिया मुखें पडियेलें ठावें । नलगे सारावें मागें पुढें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे करील भेटी भावा । सोडीन तेधवां या विठ्ठला ॥ ४ ॥

४०७६. मूळ स्थल ज्याचें गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ॥ १ ॥ ऐसें हें कळलें असावें सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥ वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे आलें अनुभवास । तेणेंच आम्हांस नागाविलें ॥ ४ ॥

४०७७. नये सोमसरी उपचाराची हरी । करकरेचें करीं काळें तोंड ॥ १ ॥ मागतों इतुकें जोडूनियां कर । ठेऊनियां शीर पायावरी ॥ २ ॥ तुम्हां आम्हां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय खरा ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे बहुतां बहुतां रीती । अनंता विनंती परिसावी हे ॥ ४ ॥

४०७८. बरा रे निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी॥१॥ एके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरापरी केली आम्हां ॥ २ ॥ कान्हा म्हणे कां रे निष्काम देखिलें । म्हणोनी मना आलें करितोसी ॥३ ॥

४०७९.निनांव हें तुला । नांव साजे रे विठ्ठला । बरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ॥ १ ॥ कांहीं तरी विचारिलें । पापपुण्य ऐसें केलें । भुरळें घातलें । एकाएकीं भावासीं ॥ २ ॥ मुद्रा धारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फांशांचें गुंडाळें । कोण चाळे गृहस्था हे ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे मिस्किन । करितोसी देखोन । पाहा दुरीवरी विच्छिन्न । केला परी संसार ॥ ४ ॥

४०८०. लालुचाईसाठीं बळकाविसी भावा । परि मी जाण देवा जिरों नेदीं ॥१॥ असों द्या निश्चय हा मनीं मानसीं । घातली येविशीं दृढ कास ॥ २ ॥ मज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ

हृदय तुझें ॥ ३ ॥ करुणारसें तुकयाबंधु म्हणे भुलवीन । काढूनी घेईन निज वस्तु ॥ ४ ॥

४०८१. भक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोन भावा वेगीं ॥१॥ रिद्धि सिद्धि मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ २ ॥ नको आपुलिया नेऊं वैकुंठासी । दे माझ्या भावासी आणून वेगीं ॥ ३ ॥ नको होऊं कांहीं होसील प्रसन्न । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ ४ ॥ तुकयाबंधु म्हणे पहा हो नाहीं तरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥ ५ ॥

४०८२. धींद धींद तुझ्या करीन चिंधड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥१॥ केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरी नास आरंभिला ॥२॥ मरावें मारावें या आलें प्रसंगा । बरें पांडुरंगा कळलें सावें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥ ४ ॥

४०८३. तुझीं वर्मे आम्हां ठावीं नारायणा । परी तूं शाहणा होत नाहीं ॥ १ ॥ मग कालावुली हाका देते वेळे । होतोसी परि डोळे नुघाडिसी ॥ २ ॥ जाणोनी अज्ञान करावें मोहरे । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे कारण प्रचिती । पाहातां वेळ किती तेच गुण ॥ ४ ॥

४०८४. मुख्य आहे आम्हां मातेचा पठंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी॥१॥ नको लावूं आम्हां सवे तूं तोंवरी । पहा दूरवरी विचारुनी ॥ २ ॥ साहे संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे अईक्यें ऐक्यता । वाढतें अनंता दुःखें दुःख ॥ ४ ॥

४०८५.नाहीं घटिका म्हणसी । लाग लागला तुजपाशीं । पडिला हृषीकेशी । जाब सकळ करणें ॥ १ ॥ माझें नेलें पांघरुण । ठावें असोन दुर्बळ दीन । माणसामधून । उठविलें खाणोऱ्या ॥ २ ॥ आम्हीं हे जगवूनि होतों पाणी । संदी देवदेव करूनी । जालासी कोठोनी । पैदा चोरा देहाच्या ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे केलें । उघडें मजचि उमगिलें । ऐसें काय गेलें । होतें तुज न पुरतें ॥ ४ ॥

४०८६. अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें

पांडुरंगा ॥१॥ म्हणतां लाज नाहीं सकळाची माउली । जवळीं धरिलीं एकें दूरी ॥ २ ॥ एका सुख द्यावें घेऊनी वोसंगा । एकें दारीं गळा श्रमविती ॥३॥ एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ॥ ४ ॥ एकें वाटतील नवजावीं दूर । एकांचा मत्सर जवाळि येतां ॥ ५ ॥ तुकयाबंधु म्हणे नावडती त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ६ ॥

४०८७. कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ॥ १ ॥ काय केलें होतें आम्ही । सांग तुझें एक ये जन्मीं । झालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ॥ २ ॥ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करूनी बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे भला । कैसें म्हणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ॥ ४ ॥

४०८८. आतां कळों आले गुण । अवघेचि वावरून । चोखट लक्षण । धरियेलें हें घरघेणें॥१॥या नावें कृपासिंधु । म्हणवितोसी दीनबंधु । मज तरी मैंदु । दिसतोसी पहातां ॥ २ ॥ अंमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि कपटी । आंधळ्याची काठी । माझी गुदरसीच ना ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे पुरता । नाहीं म्हण बरें अनंता । एरवीं असतां । तुझा घोंट भरियेला ॥ ४ ॥

४०८९. काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला ऐसा । गिळायासी निमिषा । निमिष लागों नेदावें ॥१॥ माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करोनि ॥ २ ॥ जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे देवा । भावाचिया निमित्यें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे जग । बरें वाईट म्हणो मग । याकारणें परि लाग । न संडावा सर्वथा ॥ ४ ॥

४०९०. मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तोहि परि हरी । तुज जाला असमाई ॥ १ ॥ हें कां भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । शेवटीं हे झालासी ॥२॥ एका जीवावरी । होतों दोनी कुटुंबारी । चाळवूं तो तरी । तुज येतो निर्लज्जा ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे भला । आणिक काय म्हणावें तुला । वेडा त्यानें केला । तुजसवे संबंधु ॥ ४

४०९१. पूर्वी पूर्वजांची गती। हेचि आइकिली होती। सेवे लावूनी श्रीपती। निश्चिती केली तयांची ॥ १ ॥ कां रे पाठी लागलासी। ऐसा सांग हृषीकेशी। अद्यापवरी न राहासी। अंत पाहासी किती म्हूण ॥ २ ॥ जन्मजन्मांतरीं दावा। आम्हां आपणां केशवा। निमित्य चालवा। काईसयास्तव हें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे अदेखणा। किती होसी नारायणा। देखों शकवेना। खातयासी न खात्या ॥४॥

४०९२. निसुर संसार करून। होतों पोट भरून। केली विवसी निर्माण। देवपण दाखविलें ॥ १ ॥ ऐसा काढियेला नीस। काय म्हूण सहित वंश। आणिलें शेवटास। हाउस तरी न पुरे ॥ २ ॥ उरलों पालव्या शेवटीं। तेंही न देखवे दृष्टी। दोघांमध्यें तुटी। रोकडीचि पाडिली ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे गोड। बहु जालें अति वाड। म्हणोनी कां बुड। मुळ्यांसहित खावें ॥ ४ ॥

४०९३. बरा जाणतोसी धर्मनीति। उचित अनुचित श्रीपति। करूं येते राती। ऐसी डोळे झांकूनी ॥१॥ आतां जाब काय कैसा। देसी तो दे जगदीशा। आणिला वोळसा। आपणाभोंवता ॥ २ ॥ सेवेचिया सुखास्तव। बळें धरिलें अज्ञानत्व। येईल परि हा भाव। ज्याचा त्यासी कारणा ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे नाहीं। आतां आम्हां बोल काहीं। जडोनिया पायीं। तुझे ठायीचि घेतलें ॥ ४ ॥

४०९४. कांहीं विपत्ति आपत्यां। आतां आमुचिया होतां। काय होईल अनंता। पहा बोलों कासया ॥ १ ॥ बरें अनायासें जालें। सायासेंविण बोले चाले। काबाड चुकलें। केलें कष्टांवेगळें ॥ २ ॥ बरा सांपडलासी वोजा। वर्मावरी केशीराजा। बोलायासी तुझा। उजुराचि नाहींसा ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे दगा। बरा दिला होता बगा। झडकरी चला गा। चांग दैवें पावलों ॥ ४ ॥

४०९५. देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण। आहे तें कां नेदिसी अझून। अवगलासी झोंडपणें। परि मी जाण जीवें जिरों नेदीं ॥१॥ कळों येईल रोकडें। उभा करीन संतांपुढें। तुझें काय एवढें। भय आपुलें मागतां ॥ २ ॥ आजीवरी होतों नेणता। तों तुज फावलें रे अनंता। कवडीचा तों आतां। पडों नेदीन फेर ॥ ३ ॥ ठेविला ये जीवनीं जीव। म्हणे तुकयाचा बांधव। माझा गळा तुझा पाव।

एके ठायीं बांधीन ॥ ४ ॥

४०९६. मागें असतासी कळला । उमस घेऊं नसता दिला । तेणेंचि काळें केला । असता अवघा निवाडा ॥ १ ॥ इतका न लागता उशीर । न धरितों भीडभार । सिद्धासी व्यवहार । कासयासी लागला ॥ २ ॥ असोनियां माल खरा । किती केल्या येरझारा । धरणेंही दिवस तेरा । माझ्या भावें घेतलें ॥ ३ ॥ अझून तरी इतक्यावरी । चुकवीं अनाचार हरी । तुकयाबंधु म्हणे उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ॥ ४ ॥

४०९७.आतां न राहें क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदीं हालों एक । कांहीं केल्यावांचूनी ॥ १ ॥ संबंध पडिला कोणाशीं । काय डोळे झांकितोसी । नेईन पांचांपाशीं । दे नाहीं तरी वोढूनी ॥ २ ॥ सुखें नेदीस जाणवलें । नास केल्याविण उगलें । तरि तेंही विचारिलें । आम्ही आहे तुज आधीं ॥ ३ ॥ असेंच करूनी किती । नागविली नाहीं नीती । तुकयाबंधु म्हणे अंतीं । न सोडिसी ते खोडी ॥ ४ ॥

४०९८. तुज ते सवे आहे ठावें । घ्यावें त्याचें बुडवावें । परि तें आम्हांसवें । आतां न फावे कांहीं ॥ १ ॥ नव्हों सोडायाचे धणी । कष्टें मेळविलें करोनी । पाहा विचारोनी । आधीं धरोनी काम नाहीं ॥ २ ॥ अवघे राहिले प्रकार । झालों जिवासी उदार । असा हा निर्धार । कळला असावा असेल ॥ ३ ॥ आतां निदसुर नसावें । गांठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु म्हणे राखावें । देवा महत्त्व आपुलें ॥ ४ ॥

४०९९. बहू बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आम्हां । काय सांगणें तें सांगा ॥ १ ॥ देणें आहे कीं भंडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ॥ २ ॥ मागें गेलें जें होऊनी । असो तें धारित नाहीं मनीं । आतां पुढें येथूनी । कैसा काय विचार ॥ ३ ॥ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधु म्हणे खळखळ । करावी ते उरले ॥ ४ ॥

४१००. आतां हें न सुटे न चुके । बोल कां दवडिसी फिके ।

जन लोक पारिखें । अवघें केलें म्यां यासाठीं ॥१॥ नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढीलें । देहाचें मुळीं दिवाळें ॥ २ ॥ दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुण भेंदाचे चाळे । दिसताती ये वेळे । काय करूं विसंबोनी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे देखतां । अंध बधिर ऐकतां । कैसें व्हावें आतां । इतुकिया उपरी ॥ ४ ॥

४१०१. तिहीं ताळीं हेचि हाक । म्हणती पांढरा स्फटिक । अवघा बुडाविला लौकिक । सुखेंचि भिके लाविली ॥ १ ॥ थोंटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं । म्हणोनी शहाणे ते कोणी । तुझे दारीं बैसतीना ॥ २ ॥ निर्गुण निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा । नागवणा या नांवा । वांचूनि दुजा नाइकों ॥ ३ ॥ सर्वगुणें संपन्न । कळों आलासी संपूर्ण । तुकयाबंधु म्हणे चरण । आतां जीवें न सोडीं ॥ ४ ॥

४१०२. तोचि प्रसंग आला सहज । गुज धरितां नव्हे काज । न सांडितां लाज । पुढें वोज न दिसे ॥ १ ॥ तूं तर न होसी शहाणा । नये सांगतों तेंही मना । आपण आपणा । आतां प्रयत्न देखावा ॥ २ ॥ न पुरवी पाहातां वाट । द्यावें प्रमाण चोखट । कास घालूनियां नीट । चौघाचार करावा ॥ ३ ॥ आतां श्रमाचें कारण । नव्हें व्हावें उदासीन । न पडे तयाविण । गांठी तुकयाबंधु म्हणे ॥ ४ ॥

४१०३. हळूहळू जाड । होत चालिलें लिगाड । जाणवेल निवाड । न करिसी परि पुढें ॥ १ ॥ मी तो सांगून उतराई । झालों आतां तुज काई । कळों येईल भाई । तैसा करीं विचार ॥ २ ॥ मागें युगें अठ्ठावीस । जालीं दिवसांचा दिवस । मुद्दल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे राखें । आतां टाकीं तुझीं तीं सुखें । जगजाहिर ठाउकें । झालें नाहीं खंडलेंसें ॥ ४ ॥

४१०४. पत्र उचटिलें प्रयत्नें । ग्वाही करायाकारणें । नाहीं तरी पुण्यें । तुझ्या काय उणें आम्हां ॥ १ ॥ नांव तुझेंचि करोनी । आहों सुखें पोट भरोनी । केली केली जाणवणी । म्हणउनि नाहीं म्हणसील ॥ २ ॥ आतां इतुकियांउपरी । दे नको भलतें करीं । म्हणती ऋणकरी । आमुचा इतकें उदंड ॥ ३ ॥ तुकयाबंधु जागा । आळवाबया पांडुरंगा । केला कांहीं मागा । याची नव्हती गरज ॥ ४ ॥

४१०५. माझ्या भावें केली जोडी । न सरेसी कल्पकोडी । आणियेलें धाडीं । घालूनी अवघें वैकुंठ ॥ १ ॥ आतां नलगे यावें जावें । कोठें कांहींच करावें । जन्मोजन्मीं सुखें खावें । बैसोनसें जालें ॥ २ ॥ असंख्य संख्या नाहीं पार । आनंदें दाटलें अंबर । न माये अपार । त्रिभुवनीं सांठवितां ॥ ३ ॥ अवघें भरलें सदोदित । जाले सुखाचे पर्वत । तुकयाबंधु म्हणे परमार्थ । धन अद्भुत सांपडलें ॥४॥

४१०६. आतां चुकलें देशावर । करणें अकरणें सर्वत्र । घरासी आगर । आला सकळ सिद्धींचा ॥ १ ॥ जालों निधाई निधानें । लागलें अनंतगुणरत्न । जन्माचें विछिन्न । दुःख झालें दारिद्र ॥ २ ॥ तारूं सागरिंचें अवचितें । हेंदोवलें आलें येथें । ओढिलें संचितें । पूर्वदत्तें लाधलें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा । आतां पुरुषोत्तमा । ऐसा सौदागर सांपडला ॥ ४ ॥

४१०७.सांपडलें जुनें । आमुच्या वाडिलांचें ठेवणें । केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वीचिया ॥ १ ॥ सुखें आनंदरूप आतां । आम्ही आहों याकरितां । निवारिली चिंता । देणें घेणें चुकलें ॥ २ ॥ जालें भांडवल घरींचें । अमूप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाड दुसरी विठ्ठला-। वांचूनियां आणिक ॥ ४ ॥

४१०८.कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥ १ ॥ दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नकों पाहों केलें पापपुण्य ॥ २ ॥ पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥ ४ ॥

४१०९. *वचन ऐका कमळापती । मज रंकाची विनंती ॥१॥ कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळीं ॥ २ ॥ घेई घेई माझी भाक । जरि कां मागेन आणिक ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाची राखावा ॥ ४ ॥

४११०. करूनी उचित । प्रेम घालीं हृदयांत ॥ १ ॥ आलों दान

---

* ऐकें वचन.

मागायास । थोरी करूनियां आस ॥२ ॥ चिंतनसमयीं । सेवा आपुलीच देई ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे भावा । मज निरवावें देवा ॥४॥

४१११ कामक्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देई । आणीक दुजें मागणें तुज नाहीं ॥ १ ॥ कृपा देई दान । नाशीं तिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावें भेटी देऊन । नको उपेक्षूं आलिया शरण ॥ २ ॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी । न पडो विसर क्षण जागृतीं स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावूनी । आणीक दुजें कांहीं नेणें तुजवांचूनी ॥ ३ ॥ पंथपुरिंचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं आडताळा त्रैलोक्यामाजी सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवुनि माथा ॥ ४ ॥

४११२. आतां मागतों तें एक नारायणा । भावपूर्वक मनापासूनिया ॥ १ ॥ असो दे मोकळी जिव्हा जरी गाईल गुण । नाहीं तरी खिळुन टाकीं परती ॥ २ ॥ मातेचिया परि देखतां परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरी नको ॥ ३ ॥ तरी बरें कांटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानांचाही देख प्रेत्न ॥ ४ ॥ सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक । राखावीं पृथक तोडोनि भ्रम ॥ ५ ॥ तुकयाबंधु म्हणे तेचि वाट प्राणां । पडतां नारायणा विसर तुझा ॥ ६ ॥

४११३. नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनें हित आलों शरण ॥ १ ॥ अंगीकार नको मोकलूं हरी । पतित पावन ब्रीदें करावीं खरीं ॥ २ ॥ नेणें भक्तिभाव तुझा म्हणवितों दास । जरी देसी अंतर तरी लज्जा कोणास ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाय । आतां कोण दुजा ऐसा आम्हांसी आहे ॥ ४ ॥

४११४. तूंच मायबाप बंधु सखा आमुचा । वित्त गोत जिवलग जीवाचा ॥ १ ॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥ २ ॥ तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूंच तप तीर्थ व्रत गुरू सकळ ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु करिता कारयिता देवा । तूंच भाव भक्ति पूजा पुरस्कार आघवा ॥ ४ ॥

४११५. गाऊं वाहूं टाळी रंगीं नाचों उदास । सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥ १ ॥ बाळेयाचा बळी तो कैवारी आमुचा ।

भक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ॥ २ ॥ मारूं शब्दशस्त्रें बाण निःशंक अनिवार । कंटकांचा चूर शिर फोडूं काळाचें ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ४ ॥

४११६. सांडूनी वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥१॥ आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥ २ ॥ पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे अंबर । गजर होतो जय जयकार ॥ ४ ॥

४११७. कृपाळू भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ १ ॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ॥ २ ॥ भाव देखोनि निर्मळ । रजा वोडवी कृपाळ ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥ ४ ॥

४११८. केला अंगीकार पंढरीच्या देवें। आतां काय करितील काळ मशक मानवें ॥ १ ॥ घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यानें । बैसला आपण तेथें घालुनिया ठाणें॥२॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां॥४॥

कान्होबा देवाशीं बोलले ते अभंग.

४११९. अगोचरीं बोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें राउळें ॥ १ ॥ जाईल रोकडा बोल न पुसतां आम्हां । तुझा तुझें म्हणविलें पहा पुरुषोत्तमा ॥ २ ॥ न व्हावा न वजावा न कळता अन्याय । न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु हीन मी म्हणोनि लाजसी । वारा लागों पाहाताहे उंच्या झाडासीं ॥ ४ ॥

४१२०. मरोनि जाईन गुणनामावरूनी । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥ १ ॥ चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥ २ ॥ केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंता तळमळ नाहीं ऐसी ॥ ३ ॥ काळें तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र झालें सज्जनसखें ॥ ४ ॥ तुकयाबंधु म्हणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥ ५ ॥

४१२१. कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं । जाहाज पृथ्वीपति । केली ख्याती अद्भुत ॥ १ ॥ भला रे पुंडलिका भला । महिमा नव जाये वर्णिला । दगा देउनि अवघियांला । सांठविलें अविनाश ॥२॥ केलें एके घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे किल्लया । संतांचे हातीं दिल्या । आंगावेगळे आपुल्या । टाकुनिझाला महिमा ॥ ४ ॥

४१२२. चवदा भुवनें लोक तिन्ही दाढें जो कवळी । संपुष्ट तो संबाळिमध्यें देखा ॥ १ ॥ उत्पत्ति संहार करिता जो पाळण । तो नंदानंदन म्हणवितसे ॥ २ ॥ असूर तोडरीं दैत्यांचा काळ । झाला द्वारपाळ बळीचा तो ॥ ३ ॥ लक्षुमीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्टकवळा पसरी मुख ॥ ४ ॥ तुकयाबंधु म्हणे चतुरांचा रावो । भावें तो पाहा हो केला वेडा ॥ ५ ॥

४१२३. चित्तीं बैसलें चिंतन । नारायण नारायण ॥१॥ नलगे गोड कांहीं आतां । आणीक दुसरें सर्वथा ॥ २ ॥ हरपला द्वैत भाव । तेणें देह झाला वाव ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे आम्ही । झालों निष्काम ये कामीं ॥ ४ ॥

४१२४. व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरीं अंतर ॥१॥ ऐसें गोविंदें गोविलें । बोलें नवजाये बोलिलें ॥ २ ॥ संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ॥ ४ ॥

४१२५. केली हार्णाळां अंघोळी । येउनि बैसलों राउळीं ॥ १ ॥ आजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे नास । नाहीं कल्पांतीं जयास ॥ ३ ॥

४१२६. राम म्हणतां कामक्रोधांचे दहन । होय अभिमान देशधडी ॥ १ ॥ राम म्हणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम शीण स्वप्नामाजी ॥ २ ॥ राम म्हणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ॥ ३ ॥ राम म्हणतां यम शरणागत बापुडें । अढळपद पुढें काय तेथें ॥ ४ ॥ राम म्हणतां धर्म घडती सकळ । तिमि-

रपडळ नासे हेळा ॥ ५ ॥ राम म्हणतां म्हणे तुकयाचा बंधु। तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥ ६ ॥

४१२७. तट्टाचे जातीला नाहीं भीड भार। लाता मारी थोर लहान नेणें ॥ १ ॥ परि त्या विशेष मनुष्य होऊनि। करि खंड मान वडिलांचा ॥ २ ॥ बेरसा गाढव माय ना बहिण। भुंके चवींविण भलतेंचि ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे बोकड मातलें। न विचारी आपुले तोंडीं मुते ॥ ४ ॥

४१२८. मायझवा खर गाढवाचें बीज। तें ऐसें सहज कळों येतें ॥ १ ॥ अपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन। तोचि त्याची खूण ओळखावी ॥ २ ॥ मद्यपी तो पुरा अधम यातीचा। तया उपदेशाचा राग वांयां ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे पिसाळलें सुनें। आप पर तेणें न विचारावें ॥ ४ ॥

४१२९. हम उदास तिन्हके सुनाहो लोकां। रावन मार बिभीषण दिई लंका ॥ १ ॥ गोवरधन नखपर गोकुल राखा। बर्सन लागा जब मेहु फत्तरका ॥ २ ॥ वैकुंठनायक काल कौंसा सुरका। दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥ ३ ॥ स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका। प्रल्हादके लिये कहे भाई तुकयाका ॥ ४ ॥

४१३०. चुराचुराकर माखन खाया। गौलनीका नंदकुमर कन्हैया ॥ १ ॥ काहे बराई दिखावत मोहि। जानतहुं प्रभुपना तेरा सबहि ॥ २ ॥ और बात सुन उखलसुं गला। बांधलिया आपना तूं गोपाला ॥ ३ ॥ फेरत बनबन गाऊं घरावत। कहे तुकयाबंधु लकरी हेले हात ॥ ४ ॥

४१३१. मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार। पृथिवीचा भार वाहावया ॥ १ ॥ काय धाक आम्हां कासयाची चिंता। ऐसा तो असतां साहाकारी ॥ २ ॥ शंखचक्रगदा आयुधें अपार। वागवितो भार भक्तांसाठीं ॥ ३ ॥ पांडवा जोहरीं राखिलें कुसरी। तो हा बंधुचा कैवारी तुकयाच्या ॥ ४ ॥

४१३२. नमस्कारी भूतें विसरोनि याती। तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ १ ॥ परउपकारीं वेचियेल्या शक्ती। तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ २ ॥ द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं। तेणें आत्मस्थिती

जार्णातली ॥ ३ ॥ ज्याचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जार्णातली ॥ ४ ॥ उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भावभक्ति मानव तो ॥ ५ ॥ तुकयाबंधु ह्मणे वस्कड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥ ६ ॥

४१३३. उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥ १ ॥ वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक सावरुनी ॥ २ ॥ केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥ ३ ॥ लागतो चरणां । तुकयाबंधु नारायणा ॥ ४ ॥

४१३४. कंसरावें गर्भ वधियेले सात । ह्मणोनि गोकुळासी आले अनंत । ध्यावया अवतार झालें हेंचि निमित्त । असुर संहारूनी तारावे भक्त ॥१॥ जय देव जय देव जय विश्वरूपा श्रीविश्वरूपा । ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥२॥ स्थूळरूप होउनि धरितसे सानें । जैसा भाव तैसा तयां कारणें । दैत्यांसी भासला सिंह गजानें । काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥ ३ ॥ अनंत वर्णी कोणा न कळेचि पार । सगुण कीं निर्गुण हाही निर्धार । पांगलीं साहीं अठरा करितां वेव्हार । तो वळितसे गौळियांचें खिल्लार ॥ ४ ॥ तेहतीस कोटी तिहीं देवांसी श्रेष्ठ । पाउलें पाताळीं स्वर्गीं मुगुट । गिळिलीं चौदा भुवनें तरी न भरेचि पोट । तो खाउन धाला गोपाळांचें उच्छिष्ट ॥ ५ ॥ महिमा वर्णूं परि पांगालिया श्रुति । सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुति । भावेंविण कांहीं न चलेचि युक्ति । राखे शरण तुकयाबंधु करी विनंति ॥ ६ ॥

४१३५. सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ । सांवळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकती दिव्य तेजें दंत माज पातळ । मिरवलिं मयूरपत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥ जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया । ओंवाळीन सुंदरा ॥ जय० ॥ २ ॥ गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी । शोभती शंख चक्र गदा पद्म मोहरी । हृदयीं ब्रह्मपद बाणलें श्रृंगारीं । गर्जती चरणीं वांकी कंठ कोकिळस्वरीं ॥ ३ ॥ घवघवित उटी अंगी बावन चंदनाची । ललाटीं कस्तूरीचा कास पितांबराची । कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकु-

माची ॥ ४ ॥ सौभाग्यसुखसागर गुणलावण्यखाणी । लाघवी दीनवत्सल विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥ ५ ॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न रूळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ति । तुकयाबंधु म्हणे स्तवूं मी काय किती ॥ ६ ॥

४१३६. परमानंदा परमपुरुषोत्तमरामा । अच्युता अनंता हरि मेघश्यामा । अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळा-पति न कळे महिमा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जयश्रीपती । मंगळ-शुभदायका करीन आरती ॥ २ ॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा । दीनवत्सल सकळां मूळजयनिधाना ॥ ३ ॥ विश्वंभरा सर्वेश्वरा जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा । सुखसागर गुण आगर मुगुटमणी शूरा । कल्याण कैवल्यमूर्ति मनोहरा ॥ ४ ॥ गरुडासना शेषशयना नरहरी । नारायणा ध्याना सुरवरहरगौरी । नंदा नंदनवंदन त्रिभुवनाभीतरी । अनंतनामीं ठसा अवतारावरी ॥ ५ ॥ सगुण निर्गुण साक्ष श्रीमंत संतां । भगवाना भगवंता कालकृतांता । उत्पत्तिपालनापासुन संहारणसत्ता । शरण तुकयाबंधु तारीं रितीं बहुतां ॥ ६ ॥

४१३७. म्हणसी दावीन अवस्था । तैसें नको रे अनंता ॥ १ ॥ होऊनियां सहाकार । रूप दाखवीं सुंदर ॥ २ ॥ मृगजळाचिया परी । तैसें न करावें हरी ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे हरी । कामा नये बाह्यात्कारीं ॥ ४ ॥

४१३८. उदार कृपाळ सांगसी जना । तरी कां त्या रावणा मारियेलें । नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं । तेणें तुझें काय केलें ॥ १ ॥ काय बडिवार सांगसी वांयां । ठावा पंढरिराया आहेसि आम्हां । एकलाचि जरी देऊं परिहार । आहे दुरिवरी सीमा ॥ २ ॥ कर्णाऐसा वीर उदार झुंजार । तो तुवां जर्जर केला बाणीं । पडिला भूमी परी नयेची करुणा । दांत पाडियेले दोन्ही ॥ ३ ॥ श्रियाळ बापुडें सात्विकवाणी । खादले कापूनि त्याचे पोर । ऐसा

कठिण कोण होईल दुसरा । उखळीं कांडविलें शिर ॥ ४ ॥ शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग । त्याचें चिरलें अंग ठायीं ठायीं । जाचउनि प्राण घेतला मागें । पुढें न पाहतां कांहीं ॥ ५ ॥ बळीचा अन्याय सांग होता काय । बुडविला तो पाय देउनि माथां । कोंडिले द्वार हा काय कहार । सांगतोसी चित्र कथा ॥ ६ ॥ हरिश्चंद्राचें राज्य घेउनियां सर्व । विकाविला जीव डोंबाघरीं । पाडिला विघड नळदमयंतीमधीं । ऐसी तुझी बुद्धि बुरि ॥ ७ ॥ आणिकही गुण सांगावे किती । केलिया विपत्ति माउसीच्या । वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा । म्हणे बंधु तुकयाचा ॥ ८ ॥

४१३९. तुम्हां आम्हांसी दरुषण । जालें दुर्लभ भाषण ॥ १ ॥ म्हणऊनि करितों आतां । दंडवत घ्या समस्तां ॥ २ ॥ भविष्याचें माथां देह । कोण जाणे होइल काय ॥ ३ ॥ म्हणे तुकयाचा बांधव । रामचा तो झाला भाव ॥ ४ ॥

४१४०. अनंतजन्में जरी केल्या तपराशी । तरी हा न पावसी म्हणे देह ॥ १ ॥ ऐसें जें निधान लागलेंसे हातीं । त्याची केली माती भाग्यहीना ॥ २ ॥ उत्तमाचें सार वेदाचें भांडार । ज्याच्यानें पवित्र तीर्थें होतीं ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु आणिक उपमा । नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ४ ॥

४१४१. न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे ॥ १ ॥ तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा । दिसती दिशा ओसा वो ॥ २ ॥ नाठवे भूक तान विकळ जालें मन । घडि जाय प्राण जुगा एकी वो ॥ ३ ॥ जरी तुम्हीं नोळखा सांगतों ऐका । तुकयाबंधूचा सखा जगजीवन ॥ ४ ॥

४१४२. विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद । विठ्ठला रे दग्ध झालीं पापें ॥ १ ॥ विठ्ठला रे तुझें पाहातां श्रीमुख । विठ्ठला रे सुख झालें नयना ॥ २ ॥ विठ्ठला रे तुज देतां आलिंगन । विठ्ठला तनमन निवल्या बाह्या ॥ ३ ॥ विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्ति । विठ्ठला हे विश्रांती पावले स्मरणें ॥ ४ ॥ विठ्ठला रे तुकयाबंधु म्हणे देहभाव । विठ्ठला जीवीं पाव धरितां गेला ॥ ५ ॥

४१४३. आकारवंत मूर्ति । जेव्हां देखेन मी दृष्टीं ॥ १ ॥ मग मी राहेन निवांत । ठेवूनियां तेथें चित्त ॥ २ ॥ श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्रचिती ॥ ३ ॥ म्हणे तुकयाचा सेवक । उभा देखेन सन्मुख ॥ ४ ॥

४१४४. बरवा बरवा बरवा रे देवा तूं । जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ॥१॥ पाहतां वदन संतुष्ट लोचन । झाले आइकतां गुण श्रवण रे देवा ॥ २ ॥ अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥ ३ ॥ मन जालें उन्मन अनुपम ग्रहण । तुकयाबंधु म्हणे महिमा नेणें रे ॥ ४ ॥

४१४५. आली लळिताची वेळ । असा सावध सकळ ॥ १ ॥ लाहो करा वेगीं स्मरा । टाळी वाहोनि विश्वंभरा ॥ २ ॥ जालिया अवसान । न संपडती चरण ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ॥ ४ ॥

४१४६. मनु राजा ऐक देहपुरी । असे नांदतु त्यासीं दोघी नारी । पुत्रपौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आम्हांवरी गा ॥१॥ म्हणउनी आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा । दाता तो मज भेटला इच्छा । येउनी मारग दाविला सरिसा गा ॥ २ ॥ सवें घेउनि चौघेजण । आला कुमर सुलक्षण । कडे चुकवूनि कांटवण । ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ ३ ॥ पुढें भक्तिनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती । स्थिर केलीं जीं अचपळें होतीं । सिद्ध आणुनि लाविलीं पंथीं गा ॥ ४ ॥ केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय । धर्में त्याच्या हे देखियेले पाय । दिलें अभय दान अक्षय गा ॥ ५ ॥ होतों पीडत हिंडतां गांव । पोट भरे ना राहावया ठाव । तो येणें अवघा संदेह । म्हणे फेडियेला तुकयाचा बांधव गा ॥ ६ ॥

४१४७. गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठेवुनि ठायीं भावें एका । डोळे झांकुनी रात्र करूं नका । काळ करीत बैसला लेखा गा ॥ १ ॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदीं । सांडा वाउगिया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ २ ॥ अल्प आयुष्य मानवी देह । शत गणिलें तें अर्ध रात्र खाय । पुढें

बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासी उरलें तें पाहें गा ॥ ३ ॥ क्षणभंगुर नाहीं भरंवसा । व्हारे सावध सोडा माया आशा । न चले गळां मग पडेल फासा । पुढें हुशार थोर आहे ओळसा गा ॥ ४ ॥ कांहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा बळकट । तन मन ध्यान द्या लावुनियां नीट । जरी करणें असेल गोड शेवट गा ॥ ५ ॥ विनवितों सकळां जनां । कर जोडुनि थोरां लहानां । दान इतुकेंचि द्या मज दीना । म्हणे तुकयाबंधु राम म्हणा गा ॥ ६ ॥

४१४८. गेले टळले पहार तीन । काय निदसुरा अझून । जागे होउनि कांहीं करा दान । नका ऐकों झांकुनी लोचन गा ॥ १ ॥ हरी रामकृष्णा । वासुदेव जाणवितसे जना । चिपळ्या टाळ हातीं विणा । मुखीं घोष नारायणा गा ॥ २ ॥ जें ठाकेल कोणां कांहीं । फळ पुष्प अथवा तोयीं । द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ ३ ॥ देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त । झालें एक चित्त तरी बहुत । तेवढ्यासाठीं नका करूं वाताहात गा ॥ ४ ॥ आलों येथवरी बहु सायास । कारितां दान हेंचि मागावयास । नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ५ ॥ आतां मागुतां येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । म्हणे तुकयाबंधु राम धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ६ ॥

४१४९. पहा हो कलिचें महिमान । असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥ १ ॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ । प्रळयकाळ आरंभला ॥ २ ॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडुनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥ ३ ॥ ऐसे यथार्थाचे अनर्थ । झाला बुडाला परमार्थ । नाहीं झाली ऐसी नीत । आहा भूत पातलें ॥ ४ ॥ शांती क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्व धैर्य भंगिलें ॥ ५ ॥ राहिलें वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म । म्हणवितां रामराम । श्रम महा मानिती ॥६॥ येर भोरपाचेविशी । धांवती भूतें आमिषां तैसीं । कथा पुराण

म्हणतां सिसी । तिडिक उठी नकऱ्याचे ॥ ७ ॥ विषयलोभासाठीं । सर्वार्थेसीं प्राण साठी । परमार्थी पीठ मुठी । मागतां उठती खुर्नीसी ॥ ८ ॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मानिती आवश्यक । अपमानिलें वेदपाठक । सात्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ ९ ॥ पुत्र ते पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा झाल्या आंदण्या ॥ १० ॥ खोटें झालें आलीं विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या भ्रतारासी । रंक तैसीं मानिती ॥ ११ ॥ नस्मकारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा । पोटासाठीं खौसा । वंदिती मलिंच्छाच्या ॥ १२ ॥ बहुत पाप जालें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥ १३ ॥ कैसें झालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । अविंदवाणी वदताती ॥ १४ ॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासींची चुंबिति । सोवळ्याच्या स्फीती । जगीं मिरविती पवित्रता ॥ १५ ॥ मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी । केवळ ती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥ १६ ॥ केवढी दोषाची सबळता । झाली पहा हो भगवंता । पुण्य धुडावोनि संता । तीर्थी हारी आणिली ॥ १७ ॥ भेणें मंद झाली मेघवृष्टी । आकांतली कांपे सृष्टी । देव रिगाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ॥ १८ ॥ अपीक धान्यें दिवसें दिवसें । गाई म्हैसी चेवल्या गोरसें । नगरें दिसती उध्वंसें । पिकलीं बहुवसें पाखांडें ॥ १९ ॥ होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें । जपतपादि साधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥ २० ॥ अठरा यातींचा व्यापार । करिती तस्कराई विप्र । सांडोनिया शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरती ॥ २१ ॥ गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं । अश्वाचिये परी । कुमारी विकिती वेदवक्ते ॥ २२ ॥ वेदाध्ययनसंहितारुचि । भकांद्या करिती तयांची । आवड पंडितांची । मुसाफावरी बैसली ॥ २३ ॥ मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनि केलीं दीनें । कुडीं कापट्यें महा मौन्यें । मिरविताती दुर्जनें ॥ २४ ॥ कळा कुशळता चतुराई । तर्कवादी भेद निंदेठायीं । विधिनिषेधाच्या वाही । एकहीं ऐसीं नाडलीं ॥ २५ ॥ संन्यासी तापसी

ब्रह्मचारी । होता दिगांबर निस्पृही वैराग्यकारी । कामक्रोधें व्यापिले भारी । इच्छेकरीं न सुटती ॥ २६ ॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक । राजे झाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर एकाएक । शत्रुघातें वर्तती ॥ २७ ॥ केवढी ये रांडेची अंगवण । भ्रमविले अवघे जन । याती अठरा चाऱ्ही वर्ण । कर्दम करूनि विटाळिले ॥ २८ ॥ पूर्वीं होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ झालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥ २९ ॥ आतां असो हें आघवें । मति नव्हे कळीमध्यें वावरावें । देवासी भाकोनि करुणारवें । वेगें स्मरावें अंतरीं ॥ ३० ॥ अगा ये वैकुंठनायका । काय पाहतोसि या कौतुका । धांव कलीनें गांजिलें लोकां । देतो हाका सेवक तुकयाचा ॥ ३१ ॥

## रामेश्वरभट्ट यांचे अभंग.

४१५०. तुकाराम तुकाराम । नाम घेतां कांपे यम ॥ १ ॥ धन्य तुकोबा समर्थ । जेणें केला पुरुषार्थ ॥ २ ॥ जळीं दगडासहित वह्या । तारियल्या जैशा लाह्या ॥ ३ ॥ म्हणे रामेश्वरभट्ट द्विजा । तुका विष्णु नाहीं दुजा ॥ ४ ॥

४१५१. पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ॥ १ ॥ शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥ २ ॥ कर्मअभिमानें वर्णअभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ ३ ॥ तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥ ४ ॥ अमृताची वाणी वरूषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥ ५ ॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥ ६ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे । करूनि निराळे ठेविले ते ॥ ७ ॥ भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥ ८ ॥ जपतप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तन करूनिया ॥ ९ ॥ मागें कवीश्वर झाले थोर थोर । नेलें कलेवर कोणें सांगा ॥ १० ॥ म्हणे रामेश्वर सकळां पुसोनि । गेला तो विमानीं बैसोनिया ॥ ११ ॥

४१५२. माझी मज आली रोकडी प्रचीत । होऊनि फजित दुःख

पावे ॥ १ ॥ कांहीं द्वेष त्याचा कारितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥ २ ॥ ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं साविस्तर सांगितलें ॥ ३ ॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जो अवतार नामयाचा ॥ ४ ॥ त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । म्हणुनि हे बाधा जडली तुज ॥ ५ ॥ आतां एक करीं सांगेन तें तुला । शरण जाईं त्याला निश्चयेंसी ॥ ६ ॥ दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥ ७ ॥ तोचि हा विश्वास धरोनी मानसीं । जाय कीर्तनासी नित्यकाळ ॥ ८ ॥ म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । झालें हें आराम देह माझें ॥ ९ ॥

४१५३. वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥ १ ॥ ऐशी वेदश्रुति बोलतीं पुराणें । नाहीं तीं दूषणें हरीभक्तां ॥ २ ॥ उंच नीच वर्ण न म्हणावा कोणीं । जे कां नारायणीं प्रिय झालें ॥ ३ ॥ चहूं वर्णांसीही असे अधिकार । कारितां नमस्कार दोष नाहीं ॥ ४ ॥ जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रांसी ॥ ५ ॥ गुरु परब्रह्म देवाचा ही देव । त्यासी तो मानव म्हणूं नये ॥ ६ ॥ म्हणे रामश्वेर नामीं जे रंगले । स्वयें तेचि झाले देवरूप ॥ ७ ॥

४१५४. आरती तुकारामा । स्वामी सद्गुरु धामा । सच्चिदानंद-मूर्ति । पाय दाखवीं आम्हां ॥ १ ॥ आरती० ॥ राघवें सागरांत । पाषाण तारियेलें । तैसे या तुकोबानें । अभंग रचियेले ॥२॥ आरती०॥ तुकितां तुळणेसी । ब्रह्म तुकासी आलें । म्हणोनि रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ॥ ३ ॥ आरती० ॥

४१५५. तूंचि आत्माराम नव्हे जी देहधारी । स्तुति जरी होय झडो माझी वैखरी ॥ पातकी मूढजन पडतील अघोरीं । यालागीं अवतार केला महीवरी ॥ १ ॥ जय जय भक्तराया धर्ममूर्ति तुकया । आरती ओंवाळीं भावें तुझिया पायां ॥ २ ॥ तुझे ठायीं असे भ्रम कोणा न कळे नेम । जन हें काय जाणे अनुभावितों राम । टाकोनि अभिमान जीवीं धरिलें प्रेम । बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ॥ ३ ॥ अद्भुत महिमा तुझा काय वर्णूं दातारा । उदकेंविण अन्न दिवस क्रमिले तेरा ॥ आतां हे ऐसी प्राप्ति काय घडेल येरा ।

उदकीं कागद दिन राखिले आठरा ॥ ४ ॥ ऐकतां तुझें वचन मन होय उन्मन । सच्चिदानंद गाभा तुजसाठीं पूर्ण ॥ नित्य हें असो माझें तुझें ठायीं अनुसंधान । करूनि कृपादान देईं इतुकें दान ॥ ५ ॥ शास्त्र आणि वेदांत शिष्टाचार समस्त । आणिला एक वाक्या जन लोक कृतार्थ । विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत । विनवितों तुज आतां देवीं मस्तकीं हात ॥ ६ ॥

४१५६. भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं ॥ १ ॥ ऐसिया अनंता माजी तूं अनंत । लीलावेश होत जगत्राता ॥ २ ॥ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ ३ ॥ शास्त्रशिष्टाचार आविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली ॥४॥ देउनि तिळांजुळी काम्यनिषिद्धासी । विधिविनियोगेशीं ब्रह्मार्पण ॥ ५ ॥ संतग्रहमेळीं जगदांध्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका ॥ ६ ॥ संतवृंदें तीर्थें गौतमी हरिकथा । तुकया नरसिंहस्ता भेटों आली ॥ ७ ॥ शांतिपातिव्रते झालें परिणयन । कामसंतर्पण निष्कामता ॥ ८ ॥ क्षमा क्षमेपणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥ ९ ॥ दया दीनानाथा तुंवा जीवविली । विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी ॥१०॥ वेदवाक्य बाहो उभारिला ध्वज । पूजिले देवद्विज सर्वभावें ॥ ११ ॥ अधर्मक्षयव्याधि धर्मांशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति ॥१२॥ ब्रह्म ऐक्य भावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सफल केलीं वेदविहितें ॥ १३ ॥ देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे ॥१४॥ न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्रा ॥ १५ ॥

## क्षेपक.

'संताजीतेली जगनाडे' यांचे वहीबरहुकुम रा. भावे यांनीं छापलेल्या अस्सल गाथ्यांत आढळून येणारे अभंग.

४१५७. धृ ॥ राम हरे राम हरे राम हरे : रघुराज हरे : ॥ छा ॥ राम जपतां बीज मंत्र नळा : सींधु तरती ज्याच्या प्रतापें सीळा : ॥ १ ॥ कंठ सीतळ जपतां शुळपाणी : राम जपतां आवीनास

भोवाणी : ॥ २ ॥ तारक मंत्र स्रवण कासी : राम जपतां वाल्मीक रुसी : ॥ ३ ॥ अहील्या जेणे तारीली रामे : वैस्या परलोका नेली नामे : ॥ ४ ॥ ध्यान जप जीवन मुंनी जना : तुकया स्वामी रघुनंदना : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

४१५८. नामाचिया बळे कैवल्य साधन : उगें ची णीधान : हाता चढे : ॥ जाणौनि हें वर्म भक्त भागवत : राहीलें नीवांत प्रेमबोधें : ॥ १ ॥ धृ ॥ कोण जप तप वाहे हें काबाड : म्हणती अवघड : यारे नाचों : ॥ छ ॥ उघडी समाधी हरीकथा सोहळा : नर नारी बाळा : लाहानथोरें : ॥ छ ॥ छंदे वाती टाळी : गावो नामावळी : जेजेकारी होळी : दहन दोश : ॥ २ ॥ येणे ब्रह्मांनंदे दुमदुमीले जग : सुलभ हा मार्ग : सापडला : ॥ तुका म्हणे हरीभक्तीचे उल्हस : आणीलासे त्रास : येमदुतां : ॥ ३ ॥ छ ॥

४१५९. [ व. पृ. ६८ ] नाही यैसें गाठी पुन्ये : जेणे घडे दरुशेण : करुनी चींतन : काळ सारु या रीतीं : ॥ १ ॥ धृ ॥ नाचैईन या संतांपुढे : लाज सांडुनी उघडें : सेवीन तो कोडें : उचीस्टाचा प्रसाद : ॥ छ ॥ घालुनीयां कास : होईन मोकळा उदास : करुं ब्रह्मरस : सेवन हा आनंदें : ॥ २ ॥ आला तो चीं घ्यावा : होईल संचिताचा ठेवा : पुढीलाचा हेवा : तुका म्हणे अनुचींत : ॥ ३ ॥ छ ॥

४१६०, जे या धाले ब्रह्मानंदे: आह्मां सोये त्याची पदें : संताच्या संवादे : मथैल तें नवनीत: ॥ १ ॥ धृ ॥ याचकासी कस्ट नाहीं : वेळ रापोनियां राही : भोजन समई : होईल येकी पंगती ॥ छ ॥ वीस्वस हे उपासन : भांडवल आह्मां दीना : आणीका त्या हीणा : सर्व शक्ती पुंटीत : ॥२॥ तुका म्हणे वर्म : हा ची येक सर्व धर्म : ॥ मागणे ते प्रेम : आह्मां भीक्षा उद्देश : ॥३॥

४१६१. कर्मभुमी उत्तम ठाव : साहे भाव : जालीयां : ॥ १ ॥ पावीजैल उर्ध्व गती : ब्रह्मस्थीती जीवासी : ॥ छ ॥ धीराचीये आंगी फळ : जाले बळ : कारण : ॥ २ ॥ तुका म्हणे देव भाग्ये : अवघी मागेः पाहातीः ॥ ३ ॥ छ ॥

४१६२. माह्मा दंड पायां पडणें : हे वचने वारांवी : ॥१॥ धृ ॥

तो वरी तो नो बोलावें : षोटें जीव गेलीयां ॥ छ ॥ अवघे पाप या ची नावें : सत्य ठावे असो द्या : ॥२॥ तुका म्हणे वीज्ञापना : अवघ्या जणाः परीसा हे ॥ ३ ॥

४१६३. नाहीं कोठे अधीकार : गेलें नर वायां तें : ॥ १ ॥ धृ ॥ आईका हें सोपे वर्म : न लगे श्रम चींतना : ॥ छ ॥ मृत्यार्चीये आंग छाये : उपाये ची षुंटतां : ॥ छ ॥ तुका म्हणे अवघे जन : येथें मन : आसों द्या : ॥ ३ ॥ छ ॥

४१६४. नीजों नव्हे सकाळी वेळीः राती काळी चीनचींनीः ॥१॥ धृ ॥ वोंगळानें घेतली पाठी : केली साटी : जीवासीं : ॥ छ ॥ मेळउनीया रवनें : चीतां नेणें देवळी च : ॥ २ ॥ तुका म्हणे आलों घरा : तो डागोरा : बाईलचा : ॥ ३ ॥

४१६५. लेववीला तैसा शोभे अळंकार : केला तैसा थोर : लाहान हीं : ॥ १ ॥ धृ ॥ गोवी पडों नेदी अधीकारा ऐसी : गुणाची हे रासी : पांडुरंग : ॥ छ ॥ जाणत्या जाणतां नेणत्या सारीषा : न दीसे पारीषा : जीवाहुनी : ॥ २ ॥ तुका म्हणे पाहे चींतनाची वाट : मग घ्यावी नीट : धांवं नेटे : ॥ ३ ॥

४१६६. आठ प्रहर माता : वाहे वेडी याची चीतां : ॥१॥ धृ ॥ तैसें करुणी माझे आई : ठाव देउनी राषें पाई : ॥ छ ॥ काढीतां तळमळी : बाहेरी जीवना मासोळी : ॥ २ ॥ तुका म्हणे कुडी : जेवी प्राणाचे अवडी : ॥ ३ ॥

४१६७. अवघाच अन्यायी । तेथें एकल्याचें काइ ॥ १ ॥ आतां अवघे एक वेळे । जळोनि सरो तें निराळें ॥ २ ॥ काय माझें खरें । एवढेंच राखों बरें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । परिहार नलगे चित्ता ॥ ४ ॥

४१६८. अवघ्या कोल्ह्यांचें वर्म अंडीं । धरितां तोंडीं खीळ पडे ॥ १ ॥ भुंकूं नका भुंकूं नका । आला तुका विष्णुदास ॥ २ ॥ कवणे ठायीं सादर व्हावें । नाहीं ठावें गाढवा ॥ ३ ॥ दुर्जनासी पंचानन । तुका रजरेण संतांचा ॥ ४ ॥

भावे यांनीं छापलेल्या अस्सल गाथ्यांत व पंढरपूर येथील माळ्याचे प्रतींत सांपडणारे अभंग

४१६९. छळी विष्णुदासां कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ २ ॥ नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥ ३ ॥ तुका म्हणे याति । भ्रष्ट तयाची ते मति ॥ ४ ॥

४१७०. धन्य देहू गांव पुण्यभूमि ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥ धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ २ ॥ कर कटीं उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमादेवी ॥ ३ ॥ गरुड पारीं उभा जोडूनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ४ ॥ दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ५ ॥ लक्ष्मीनारायण बल्लाळाचें बन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ६ ॥ विघ्नराज द्वारीं बहिरव बाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ७ ॥ तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ८ ॥

४१७१. माझें म्हणतां याला कां रे नाहीं लाज । कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥ कोणी सोडवीना काळाचे हातींचें । एकाविण साचें नारायणा ॥ २ तुका म्हणे किती सांगावें चांडाळा । नेणें जीवकळा कोण्या जीतो ॥ ३ ॥

पंढरपूर येथील माळी यांचे प्रतींत सापडणारे अभंग.

४१७२. ज्यासी नावडे एकादशी । तो जिताचि नरकवासी ॥ १ ॥ ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक नाहीं भीत ॥ २ ॥ ज्यासी मान्य एकादशी । तो जिताचि मुक्तवासी ॥ ३ ॥ ज्यासी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥ ४ ॥ तुका म्हणे पुण्य राशी । तोचि करी एकादशी ॥ ५ ॥

४१७३. कोठें गुंतलासी योगीयाचे ध्यानीं । आनंदकीर्तनीं पंढरीच्या ॥ १ ॥ काय काज कोठें पडलीसे गुंती । कानीं न पडती बोल माझे ॥ २ ॥ काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां सांडिली तुम्हीं देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोठें गुंतलेती सांगा ।

किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ४ ॥

४१७४. ऐसें काय उणें झालें तुज देवा । भावेंविण सेवा घेसी माझी ॥ १ ॥ काय मज द्यावा नलगे मुशारा । पाहावें दातारा विचारूनि ॥ २ ॥ करितों पाखांडें जोडून अक्षरें । नव्हे ज्ञान खरें भक्तिरस ॥ ३ ॥ गुणवाद तुझे न बोलवे वाणी । आणिका छळणी वाद सांगे ॥ ४ ॥ तरी आतां मज राखें तुझे पायीं । देखसील कांहीं प्रेमरस ॥ ५ ॥ तुका म्हणे तुज हांसतील लोक । निष्काम सेवक म्हणोनियां ॥ ६ ॥

४१७५. ऐसा सर्व भाव तुज निरोपिला । तूं मज एकला सर्वभावें ॥ १ ॥ अंतरींची कां हे नेणसील गोष्टी । परि सुखासाठीं बोलविसी ॥ २ ॥ सर्व माझा भार तुज चालवणें । तेथें म्यां बोलणें काय एक ॥ ३ ॥ स्वभावें स्वहित हिताचें कारण । कौतुक करून निवडिसी ॥ ४ ॥ तुका म्हणे तूं हें जाणसी गा देवा । आमुच्या स्वभावा अंतरीच्या ॥ ५ ॥

४१७६. कुरंगी पाडस चुकलेंसें वनीं । फुटे दुःखें करोनि हृदय त्याचें ॥ १ ॥ तैसा परदेशी झालों तुजविण । नको हो निर्वाण पाहूं माझें ॥ २ ॥ अपराधाच्या कोटि घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ ३ ॥ तुका म्हणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पाडुरंगा ॥ ४ ॥

४१७७. किती एका दिवशीं । बुद्धि जाली होती ऐसी ॥ १ ॥ कांहीं करावें स्वहित । तों हें न घडे उचित ॥ २ ॥ अवलंबूनी भोक । लाज सांडली लौकिक ॥ ३ ॥ तुका म्हणे दीन । जालों मनुष्यपणा हीन ॥ ४ ॥

४१७८. काय बा करिसी सोंवळें ओवळें । मन नाहीं निर्मळ वाउगेंचि ॥ १ ॥ काय बा करिसी पुस्तकाची मोट । घोकितां हृदय स्फोट हातां नये ॥ २ ॥ काय बा करिसी टाळ आणि मृदंग । जेथें पांडुरंग रंगला नाहीं ॥ ३ ॥ काय बा करिसी ज्ञानाचिया गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥ ४ ॥ काय बा करिसी दंभ लौकिकातें । हित नाहीं मातें तुका म्हणे ॥ ५ ॥

४१७९. काय फार जरी झालों मी शहाणा । तरी नारायणा

नातुडसी ॥ १ ॥ काय झालें जरी मानी मज जन । परि नातुडती चरण तुझे देवा ॥ २ ॥ काय झालें जरी झालों उदासीन । परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ ३ ॥ काय झालें जरी केले म्यां सायास । म्हणवितों दास भक्त तुझा ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज दाविल्या वांचुन । तुझें वर्म कोण जाणे देवा ॥ ५ ॥

४१८०. काय तुझी थोरी वर्णू मी पामर । होसी दयाकर कृपासिंधु ॥ १ ॥ तुज ऐसी दया नाहीं आणिकांसी । ऐसे हृषीकेशी नवल एक ॥ २ ॥ कुरुक्षेत्र भूमिवरी पक्षी व्याले । तृणामाजीं केलें कोठें त्यानीं ॥ ३ ॥ अकस्मात तेथें रणखांब रोविला । युद्धाचा नेमिला ठाव तेथें ॥ ४ ॥ कौरव पांडव दळभर दोन्ही । झुंजावया रणीं आले तेथें ॥ ५ ॥ तये काळीं तुज पक्षी आठवीती । पाव बा श्रीपती म्हणोनिया ॥ ६ ॥ हस्ती घोडे रथ तेथें धांवतील । पाषाण होतील शतचूर्ण ॥ ७ ॥ ऐशिये आकांतीं वांचों कैसें परी । धांव बा श्रीहरी लवलाहे ॥ ८ ॥ टांकोनिया पिलीं कैसें जावें आतां । पावे जगन्नाथा लवलाही ॥ ९ ॥ आली तिये काळीं कृपा तुझ्या चित्ता । अनाथांच्या नाथा नारायणा ॥ १० ॥ एका गजाचिया कंठीं घंटा होती । पाडिली अवचिती तयांवरी ॥ ११ ॥ अठरा दिवस तेथें द्वंद्वयुद्ध झालें । वारा ऊन लागलें नाहीं तया ॥ १२ ॥ झुंज झाल्यावरी दाविलें अर्जुना । तुम्ही नारायणा पक्षियांसी ॥१३॥ पाहे आपुलिया दासां म्यां रक्षिलें । रणीं वांचविलें कैशा परी ॥ १४॥ ऐसी तुज माया आपुल्या भक्तांची । माउली आमुची तुका म्हणे ॥ १५ ॥

४१८१. नामाचें सामर्थ्य कां रे दवडिसी । कां रे विसरसी पवाडे हे ॥ १ ॥ खणखणां हाणती खर्गे प्रल्हादासी । न रुपे आंगासी किंचितही ॥ २ ॥ राम कृष्ण हरि ऐसी मारी हांक । तेणें पडे धाक बळियासी ॥ ३ ॥ असों द्या सामर्थ्यें ऐसांया कीर्तीचीं । आवडी तुकयाची भेटी देई ॥ ४ ॥

४१८२. नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥१॥ शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळ हेम ॥ २ ॥ पर्जन्य वर्षतां जीवना वाहावट । तें समसकट गंगे मिळे

॥ ३ ॥ सर्व तें हें जाय गंगाचि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ४ ॥ महापुरीं जैसें जातसे उदक । मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ५ ॥ तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केवी ते बुडती अनामिक ॥ ६ ॥ नाना काष्ठजात पडतां हुताशनीं । ते जात होउनी एकरूप ॥ ७ ॥ तेथें निवडेना घुरे की चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ८ ॥ पूर्वानुवोळख तेंचि पै मरण । जरि पावे जीवन नामामृत ॥ ९ ॥ नामामृतें झालें मुळींचें स्मरण । सहज साधन तुका म्हणे ॥ १० ॥

४१८३. नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथेंची काशी ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । जाणे वाल्मीक शंकर उमा ॥ २ ॥ नाम प्रल्हादबाळ । जाणे पापी अजामेळ ॥ ३ ॥ नाम जाणे तो नारद । नामें ध्रुवा अक्षयपद ॥ ४ ॥ नाम गणिकेतें तारी । पशु गजेंद्र उद्धरी ॥ ५ ॥ नाम जाणे हनुमंत । जाणताती महासंत ॥ ६ ॥ नाम जाणे शुकमूर्ति । जाणे राजा परिक्षिती ॥ ७ ॥ नाम जाणे तुका । नाहीं संसाराचा धोका ॥ ८ ॥

४१८४. न लगावी दिठी । माझी तुझे मुखवटी ॥ १ ॥ आधीं पाउलें पाउलें । तें मी पाहेन तें भलें ॥ २ ॥ देईन हे काया । वरी सांडणें सांडाया ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । बहु आवडसी जीवा ॥४॥

४१८५. धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरिंचें ॥ १ ॥ ऐकिलेंही होतें तेसेंचि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण झाली । कांहीं न राहिली वासना हे ॥ ३ ॥

४१८६. धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥ १ ॥ कठिण हृदय तया चांडाळाचें । जो नेणे पराचें दुःख कांहीं ॥ २ ॥ आपुला हा प्राण तैसे सकल लोक । न करी विवेक पशु जैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखें कापितसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

४१८७. धन्या आतां काय करूं । माझें तान्हुलें लेंकरूं ॥ १ ॥ धन्या अवचित मरण आलें । मज कोणासी निरविलें ॥ २ ॥ माझें दार नका पाडूं । त्याचे हात पाय तोडूं ॥ ३ ॥ एके हातीं धरिली

दाढी । दुजे हातीं घे कुऱ्हाडी ॥ ४ ॥ येरी घाव घालूं पाहे । तंव तो उठोनि उभा राहे ॥ ५ ॥ तुका म्हणे॰ अवघीं चोरें । सेखी रामनाम सोइरें ॥ ६ ॥

४१८८. धडकला अग्नि आह्मा येती वरी । गोपाळ श्रीहरी विनविती ॥ १ ॥ अरे कृष्णा काय विचार करावा । आला रे वोणवा जळों आतां ॥ २ ॥ अरे कृष्णा तुझें नाम बळिवंत । होय कृपावंत राख आतां ॥ ३ ॥ तुका म्हणे अरे कृष्णा नारायणा । गोपाळीं करुणा भाकितीलें ॥ ४ ॥

४१८९ दोष करूनि आम्हीं पतित सिद्ध झालों । पावन मागों आलों ब्रीद तुझें ॥१॥ आतां पतिता तारावें कीं ब्रीद हें सोडावें । यांत जें पुरवे तेंचि सांगा ॥२॥ उद्धार तुमच्यानें नव्हे हो श्रीहरि । सोडा झडकरी ब्रीद आतां ॥ ३ ॥ तें ब्रीद घेऊनी हिंडों दारोदारीं । सांगूं तुझी हरि कीर्ति जगा ॥ ४ ॥ देवें हारविलें ब्रीद हें सोडिलें । पतितें जिंकिलें आम्हीं देवा ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं उठलों दैन्य-वरि । विचारा श्रीहरी तुम्ही आतां ॥ ६ ॥

४१९०. पांडुरंगा तुझे काय वाणूं गुण । पवाडे हें धन्य जगीं तुझे ॥ १ ॥ दंडिलें दुर्वासा सुरा असुरानें । तो आला गाऱ्हाणें सांगावया ॥ २ ॥ बळीचेये द्वारीं तुम्ही बैसलेति । दुर्वास विनंती करी भावें ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपासागरा श्रीहरी । तुझी भक्तांवरी प्रेमछाया ॥ ४ ॥

४१९१. प्रल्हादाकारणें नरसिंह झालासी । त्याचिया बोलासी सत्य केलें ॥ १ ॥ राम कृष्ण गोविंद नारायण हरि । गर्जे राजद्वारीं भक्तराज ॥ २ ॥ विठल माधव मुकुंद केशव । तेणें दैत्यराव दचकला ॥ ३ ॥ तुका म्हणे तयाकारणें सगुण । भक्ताचें वचन सत्य केलें ॥ ४ ॥

४१९२. प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार । चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ १ ॥ तो देव नटला गौरीबाळ । पायीं बांधोनी घागऱ्या घोळ । नारद तुंबर सहित मेळ । सुटला पळ विघ्नासी ॥ २ ॥ नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग । सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ ३ ॥

जया मानवती देव ऋषिमुनि । पाहातां न पुरे डोळियां धणी । असुर जयाच्या चरणीं । आदि अवसानीं तोचि एक ॥ ४ ॥ सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार । तुका म्हणे आमुचा दातार । भवसागर तारील हो ॥ ५ ॥

४१९३. प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोढवीं कथा । मति सौरस करीं प्रबळता । जेणें फिटे आतां अंधकार ॥ १ ॥ तुझिये कृपेचें भरितें । आणीक काय राहिलें तेथें । मारग सिद्धाच्यानि पंथें । पाववीसी तेथें तूंचि एक ॥ २ ॥ आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करितां कारण । देव ऋषिमुनि आदि करून । ग्रंथ पुराण निर्माणीं ॥ ३ ॥ काय वर्णूं तुझी गति । एवढी कैंची मज मति । दीनानाथ तुज म्हणती । करीं सत्य वचन हेंचि आपुलें ॥ ४ ॥ मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं । तुजवांचूनि कोण तारी । पाव झडकरी तुका म्हणे ॥५॥

४१९४. प्रगट व्हावें हे अज्ञानवासना । माझी नारायणा हीनबुद्धि ॥ १ ॥ खाणीवाणी होसी काष्ठीं तूं पाषाणीं । जंतु जीवजनीं प्रसिद्ध हा ॥ २ ॥ ज्ञानहीन तुज पाहे अल्पमति । लहान हा चित्तीं धरोनियां ॥ ३ ॥ परि तूं कृपाळ होसी देवराणा । ब्रीदें तुझीं जना प्रसिद्ध हें ॥ ४ ॥ उतावीळ बहु भक्तांचिया काजा । होसी केशीराजा तुका म्हणे ॥ ५ ॥

४१९५. पंढरी चोहटा मांडियेला खेळ । वैष्णव मिळोनी सकळ रे । टाळ टिपरी मांदळे एक नाद रे । झाला बळवंत देवकीचा बाळ रे ॥ १ ॥ चला तें कवतुक भाई रे । पाहों डोळां कामीं गुंतलेती काई रे । भाग्यवंत कोणी गेले सांगाती । ऐसें सुख त्रिभुवनीं नाहीं रे ॥ २ ॥ आनंदाचे वाद सुखाचे संवाद । एक एका दाखविती छंद रे । साही अठरा चारी घालूनियां घाई । नाचती फेरीं टाळ शुद्ध रे ॥ ३ ॥ भक्तीची भूषणें मुद्रा आभारणें । शोभती चंदनाच्या उट्या रे । सत्व सुंदर कास घालुनि कुसरी । गर्जती नाम बोभाटीं रे ॥ ४ ॥ हरि हर ब्रह्मा तीर्थासहित भीमा । देव कोटी तेहतीस रे । विस्मित होऊनि ठाकले सकळ जन । अमरावती केली ओस रे ॥५॥ वाणितील थोरी वैकुंठींचि परी । नपवे

पंढरीची सरी रे । तुकयाचा दास म्हणे नका आळस करूं । सांगतों नरनारींस रे ॥ ६ ॥

४१९६. पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ १ ॥ पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥ जप तप अनुष्ठान । पोटासाठीं झाले दीन ॥ ३ ॥ पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ४ ॥ पोट काशियानें भरे । तुका म्हणे झुरझुरूं मरे ॥ ५ ॥

४१९७. पांडुरंगा आतां ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ १ ॥ नाहीं आइकिलें संतांचिया मुखें । तें या मज लोकें भेडसाविलें ॥ २ ॥ विष्णुदासां गति नाहीं तरावया । म्हणती गेलें वायां कष्टतही ॥ ३ ॥ धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळींचा ॥ ४ ॥ तुका म्हणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ५ ॥

४१९८. पायां लावुनियां दोरी । भृंग बांधिला लेंकुरीं ॥ १ ॥ तैसा पावसी बंधन । मग सोडवील कोण ॥ २ ॥ गळां बांधोनियां दोरी । वानर हिंडवी घरोघरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहें । रीस धांपा देत आहे ॥ ४ ॥

४१९९. पाया झाला नारू । तेथें बांधला कापरू ॥ १ ॥ तेथें बिबव्याचें काम । अधमासी तो अधम ॥ २ ॥ रुसला गुलाम । धणी करितो सलाम ॥ ३ ॥ तेथें चाकराचें काम । अधामासी तों अधम ॥ ४ ॥ रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥ तेथें बटकीचें काम । अधमासी तो अधम ॥ ६ ॥ देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ॥ ७ ॥ तेथें पैंजारेचें काम । अधमासी तो अधम ॥ ८ ॥ तुका म्हणे जाती । जातींसाठीं खाती माती ॥ ९ ॥

४२००. पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता-वरी बोल ॥ १ ॥ भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥ २ ॥ नाठवी तो खळ आपुली करणी । देवासी निंदोनी बोलतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या तोंडा लागो कांटी । नाहीं जगजेठी जया चित्तीं ॥ ४ ॥

४२०१. पापाचीं संचितें देहासी दंडणा । तुज नारायणा बोल नाहीं ॥ १ ॥ पेरी कडू जिरें मागे अमृतफळें । अर्कवृक्षा केळें कैसीं येती ॥ २ ॥ सुख अथवा दुःख भोग हा देहाचा । नाश हा ज्ञानाचा न करावा ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां देवा कां रुसावें । मनासी पुसावें काय केलें ॥ ४ ॥

४२०२. श्रीराम सखा ऐसा धरी भाव । मीपणाचा ठाव पुसीं मना ॥ १ ॥ शरण निरंतर म्हण तूं गोविंदा । वाचे लावीं धंदा नारायण ॥ २ ॥ यापरि सोपान नाहीं रे साधन । वाहातसे आण तुझी मना ॥ ३ ॥ नको कांहीं करूं आळस अंतरीं । जपें निरंतरीं रघुपती ॥ ४ ॥ तुका म्हणे मोठा लाभ नरदेहीं । देहींच विदेही होती नामें ॥ ५ ॥

४२०३. श्रीमुख वोणवा गिळीत चालिलें । भ्यासुर वांसिलें वदनांबुज ॥ १ ॥ विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना । धांउनी रसना ज्वाळ गिळी ॥ २ ॥ जिव्हा लांब धांवे गोळा करी ज्वाल । मोठें मुखकमळ त्यांत घाली ॥ ३ ॥ तुका म्हणे आवघा वोणवा गिळीला । आनंद जाहला गोपाळांसी ॥ ४ ॥

४२०४. शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत । परि नाहीं चित्त हाता आलें ॥ १ ॥ क्षणा एका साठीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ २ ॥ तोळाभर सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ ३ ॥ हरीचे अंकित असती विरळागत । तयांसी अच्युत कृपा करी ॥ ४ ॥ तुका म्हणे काय धुडवण्या गोष्टी । जंव नाहीं गांठीं चित्त आलें ॥ ५ ॥

४२०५. वृंदावना केलें साकरेचें आळें । न संडे वेगळें कडुपण ॥ १ ॥ कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्टेविण ॥ २ ॥ क्षेम देतां अंगा गांधेलाची पोळी । करवी नादळी महाशब्द ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे न होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ॥ ४ ॥

४२०६. मायबापें केवळ काशी । तेणें नवजावें तीर्थासी ॥ १ ॥ पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥ तैसा होईं सावधान ।

हृदयीं धरीं नारायण ॥ ३ ॥ तुका म्हणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ४ ॥

४२०७. कोठें देवा बोलों । तुम्हां भीड घालूं गेलों ॥ १ ॥ करावया सत्वहानी । भांडवलाची टांचणी ॥ २ ॥ दुर्बळा मागतां । त्याच्या प्रवर्तला घाता ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । मज कळलें ऐसें कांहीं ॥ ४ ॥

४२०८. मुंगी होउनि साकर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ १ ॥ वाळवंटीं साकर पडे । गज येउनि काय रडे ॥ २ ॥ झाला हरिदास गोसावी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ ३ ॥ पाठ पाठांतरिक विद्या । जन रंजवणी संध्या ॥ ४ ॥ प्रेम नसतां अंगा आणी । दृढ भाव नाहीं मनीं ॥ ५ ॥ ब्रह्मज्ञान वाचें बोले । करणी पाहातां न निवती डोळे ॥ ६ ॥ मिथ्या भगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ७ ॥ तुका म्हणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी मागुनि घ्यावें ॥ ८ ॥

४२०९. मुरु कूश दोन्ही मारिले असुर । दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥ १ ॥ मारियेला मुरु म्हणोनी मुरारी । नाम तुझें हरि पडियेलें ॥ २ ॥ पूर्वीहुनी ऐसा भक्तप्रतिपाळ । केला त्वां सांभाळ नारायणा ॥ ३ ॥ तुका म्हणे येचि वेळे काय झालें । कां सोंग धरिलें मोहनाचें ॥ ४ ॥

४२१०. मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥ १ ॥ वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं । गारा त्या अधणीं न सीजती ॥ २ ॥ नवखंड पृथ्वी पिकें मृगजळें । डोंगर भेटे बळें असमानासी ॥ ३ ॥ नैश्वर देह तैसे तेव्हां होय ब्रह्म । तुका म्हणे श्रम करुनी काय ॥ ४ ॥

४२११. मूर्तिमंत देव नांदतो पंढरीं । येर दिगंतरीं प्रतिमारूप ॥ १ ॥ जाउनियां वना करावें कीर्तन । मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥ २ ॥ तुका म्हणे मुख्य पाहिजे हा भाव । भावापासीं देव शीघ्र उभा ॥ ३ ॥

४२१२. म्हणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरी वाहण ॥ १ ॥ नको नको दर्शन त्याचें । गलितकुष्ठ भरो वाचे ॥ २ ॥ शाळि-

ग्रामासि म्हणे धोंडा । किडे पडोत त्याच्या तोंडा ॥ ३ ॥ भावी सद्‌गुरु मनुष्य । त्याचें खंडो कां आयुष्य ॥ ४ ॥ हरिभक्ताच्या करी चेष्टा । त्याचे तोंडीं पडो विष्टा ॥ ५ ॥ तुका म्हणे किती ऐकों । कोठवरी मर्यादा राखों ॥ ६ ॥

४२१३. माझिया तों जीवें घेतला हा सोस । पाहें तुझी वास भेटावया ॥ १ ॥ मातेवीण बाळ न मनी आणिकां । सर्व काळ धोका स्तनपाना ॥ २ ॥ वोसंगा निघाल्यावांचूनि न राहे । त्याचें आर्त माय पुरवीते ॥ ३ ॥ तुका म्हणे माते भक्तां तूं कृपाळ । गिळियले जाळ वनांतरीं ॥ ४ ॥

४२१४. महा जी महादेवा महाकालमर्दना । मांडियेलें उग्र तप महादीप्त दारुणा । परिधान व्याघ्रांबर चिताभस्मलेपना । स्मशान क्रीडास्थळ तुम्हां जी त्रिनयना ॥ १ ॥ जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा । आरति ओंवाळीन कैवल्यदातारा ॥ जय० ॥ ॥ २ ॥ रुद्र हें नाम तुम्हां उग्र संहारासी । शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं । उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी । आपुलें पद दासां ठाव देई कैलासीं ॥ ३ ॥ त्रैलोक्यव्यापका हो जन आणि विजन । विराट स्वरूप हें तुझें साजिरें ध्यान । करिती वेद स्तुति कीर्ति मुखें आपण । जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ४ ॥ बोलतां नाममहिमा असें आश्चर्य जगीं । उपदेश केल्यानंतर पापें जळती वेगीं । हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं । राहिली दृष्टि चरणीं रंग मीनला रंगीं ॥ ५ ॥ पूजूनि लिंग उभा तुका जोडोनि हात । करितो विज्ञापना परिसावी हे मात । अखंड राहू द्यावें माझें चरणीं चित्त । घातले साष्टांग मागें मस्तकीं हात ॥ ६ ॥

४२१५ माझा घात पात अथवा हित फार । अवघा विचार तुझ्या हातीं ॥ १ ॥ ठेवुनि जीवभाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलों निवांत पांडुरंगा ॥ २ ॥ चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे काय करिसी तें पाहीन । ठेविसी राहीन सुखें तेथें ॥ ४ ॥

४२१६. मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥१॥ पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ २ ॥ शुद्ध पाहोनियां भाव ।

त्याचे हृदयीं वसे देव ॥ ३ ॥ तुका म्हणे विठोबासी । ठाव देईं चरणापासीं ॥ ४ ॥

४२१७. मुखें सांगे ब्रह्मज्ञान । जन लोकांची कापितो मान ॥१॥ ज्ञान सांगतो जनासी । नाहीं अनुभव आपणांसी ॥ २ ॥ कथा करितो देवाची । अंतरीं आशा बहु लोभाची ॥ ३ ॥ तुका म्हणे तोचि वेडा । त्याचें हाणूनि थोबाड फोडा ॥ ४ ॥

४२१८. मस्तकीं सहावें टांकियासी जाण । तेव्हां देवपण भोगावें गा ॥ १ ॥ आपुलिये स्तुती निंदा अथवा मान । टाकावा थुंकोन पैलीकडे ॥ २ ॥ सद्‌गुरुसेवन तेंचि अमृतपान । करूनी प्राशन बैसावें गा ॥ ३ ॥ आपुल्या मस्तकीं पडोत डोंगर । सुखाचें माहेर टाकूं नये ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां सांगू तुला किती । जिण्याची फजिती करूं नये ॥ ५ ॥

४२१९. वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ १ ॥ चला चला संत जन । करा देवाशीं भांडण ॥ २ ॥ लुटा लुटा पंढरपूर । धरा रखुमाईचा वर ॥ ३ ॥ तुका म्हणे चला । घाव निशाणीं घातला ॥ ४ ॥

४२२०. वेद नेलें शंखासुरें । केलें ब्रह्मानें गाऱ्हाणें ॥ १ ॥ धांव धांव झडकरी । ऐसें कृपाळुवा हरी ॥ २ ॥ गजेंद्र नाडियें गांजिला । तेणें तुझा धांवा केला ॥ ३ ॥ तुका म्हणे पद्मनाभा । जेथें पाहे तेथें उभा ॥ ४ ॥

४२२१. वैभव तें राज्य संपत्ती टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ १ ॥ आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ २ ॥ वर्ण कुळ जाति याचा अभिमान । त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे राहें एकाकी निशंक । देऊनियां हाक कंठीं काळ ॥ ४ ॥

४२२२. रामा अयोध्येच्या राया । दीनानाथा रे सखया ॥ १ ॥ पाप ताप विघ्न हरीं । दीनानाथा सुख करीं ॥ २ ॥ भिल्टीचिया रे उच्छिष्टा । स्वीकारिसी रे तूं भ्रष्टा ॥ ३ ॥ मी तों सलगीचें मूल । तुका म्हणे तूं सखोल ॥ ४ ॥

४२२३ विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला । भक्तिभावें केला

देव ऋणी ॥ १ ॥ देव माझा ऋणी आहे सहाकारी । परस्परें वारी भवभय ॥ २ ॥ भवभयडोहीं बुडों नेदी पाहीं । धरूनियां बाहीं तारी मज ॥ ३ ॥ तारियेले दास पडिल्या संकटीं । विष केलें पोटीं अमृतमय ॥ ४ ॥ अमृतातें सेवीतसे नामरसा । तोडियेला फांसा बंधनाचा ॥ ५ ॥ बंधनाचा फांसा आम्हीं कांहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ॥ ६ ॥ पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक । त्रैलोक्य-नायक म्हणविसी ॥ ७ ॥ म्हणविसी देवा दासांचा अंकित । मनाचा संकेत पाहोनियां ॥ ८ ॥ पाहोनियां दृढ निश्चय तयाचा । तोचि दास साचा जवळीक ॥ ९ ॥ जवळीक झाली ब्रह्मीं सुखा-वले । मार्ग दाखविले मूढा जना ॥ १० ॥ मूढा जनामाजी दास तुझा मूढ । कास तुझी दृढ धरियेली ॥ ११ ॥ धरियेले तुझे पाय रे विठ्ठला । तुका सुखी झाला तुझ्या नामें ॥ १२ ॥

४२२४. विधवेसी एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ॥ १ ॥ तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥ २ ॥ सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथेंचि संकल्प ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं । पतिव्रते जैसा पति ॥ ४ ॥

४२२५. विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणीरमण ॥ १ ॥ वेदशास्त्रां माहेर । केले दासां उपकार ॥ २ ॥ नामापाशीं चारी मुक्ति । पाहा हृदयीं प्रतीति ॥ ३ ॥ तुका म्हणे कळा । अंगीं जयाचा सकळा ॥ ४ ॥

४२२६. वासुदेवा दीनानाथा । कमललोचना श्रीअच्युता । निजभक्तांसी सौख्यदाता । तुजवांण सर्वथा असेचिना ॥ १ ॥ विठ्ठला अनंता विश्वपति । विराटस्वरूपा वामनमूर्ति । ब्रह्मादिकर्ता वैकुंठपति । अगम्यस्थिति वेदशास्त्रां ॥ २ ॥ अद्वैत अखंडभरिता । विश्वबाहू अपरिमिता । विश्वचक्षु विश्वदेवता । आदिपिता ब्रह्मयाचा ॥ ३ ॥ भक्ताधीना भवभयभंगा । परमपुरुषा पांडुरंगा । अनादि अखिल अंतरंगा । संगा असंगा वेगळाचि ॥ ४ ॥ हे विराटस्वरूप भोळिया भक्तांसी । सर्वथा न कळे हृषीकेशी । सगुणरूप धरूनी त्यासी । लावीं भजनासी तुका म्हणे ॥ ५ ॥

४२२७. लेखीं दुखण्यासमान । वेंचला नारायणीं क्षण । उद्यांचें

आजिच मरण । आणोनि म्हणे हरि भोक्ता ॥ १ ॥ नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणे तों आहे शेवटीं । लाभ विचारोनि पोटीं । होई शेवटीं जागृत ॥ २ ॥ आहे तें उरे कटा । लावुनि चळे आपुला फाटा । पुरे हें न पुरे शेवटा । तरण्या बळकटा सदा वास ॥ ३ ॥ म्हणोनि मोडावा कांटाळा । अविद्यात्मक कोंवळा । होतील प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ४ ॥ क्षण या देहाच्या अंतीं । जड होउनि राहेल माती । परदेश ते परवर होती । चिळ-सविता नाकडोळे ॥ ५ ॥ जंव या नाहीं पातल्या विपत्ति । आयुष्य भविष्य आहे हातीं । लाभ विचारोनी गुंती । तुका म्हणे अंतीं सर्व पिसुनें ॥ ६ ॥

४२२८. रामनाम ह्याचे मांडिला दुकान । आहे वानोवाण घ्या रे कोणी ॥ १ ॥ नका कोणी करूं घेतां रे आळस । वांटतों तुह्मांस फुकांचें हें ॥ २ ॥ संचितासारखें पडे त्याच्या हातां । फारसें मागतां तरी नये ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हीं सांठविलें सार । उरालिया थार विचारितां ॥ ४ ॥

४२२९. रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥१॥ धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ २ ॥ रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ ३ ॥ तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्हीं ॥ ४ ॥

शिवाजी स्वतः दर्शनास आले त्या वेळीं त्यांस केलेला उपदेश.

४२३०. रायाछत्रपति ऐकावें वचन । रामदासीं ध्यान लावा वेगीं ॥ १ ॥ रामदासस्वामी सोयरा सज्जन । यासि तूं नमन अर्पी बापा ॥ २ ॥ मारुतीअवतार स्वामी प्रगटला । उपदेश केला तुज लागीं ॥ ३ ॥ रामनाम मंत्र तारक केवळ । झालासे सीतळ उमाकांत ॥ ४ ॥ उफराटीं नामें जपतां वाल्मीक । झाला पुण्य लोक तात्कालिक ॥ ५ ॥ तेंच बीज त्यासि वरिष्ठ उपदेश । त्याहूनी विशेष काय आहे ॥ ६ ॥ आतां धरूं नका भलत्याचा संग । राम पांडुरंग कृपा करी ॥ ७ ॥ धरूं नको आस आमुची भूपाळा । रामदासीं डोळा लावा वेगीं ॥८॥ तुझी चाड नाहीं आम्हां

छत्रपति । आम्ही पत्रपर्ता त्रैलोक्याचे ॥ ९ ॥ चारीं दिशीं आम्हां भिक्षेचा अधिकार । न मिळे भाकर भक्षावया ॥ १० ॥ पांडुरंगीं आमुची झाली पूर्ण भेटी । हातांत नरोटी दिधली देवें ॥ ११ ॥ आतां पडूं नको आमुचिया काजा । पवित्र तूं राजा रामभक्त ॥ १२ ॥ विठ्ठलाचे दास केवळ भिकारी । आम्हांलागीं हरी उपेक्षीना ॥ १३ ॥ शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घालीं त्यासी ॥ १४ ॥ तुका म्हणे राया मुला असो कल्याण । सद्‌गुरु शरण असे बापा ॥ १५ ॥

४२३१. ये गा महाविष्णु अनंत भुजांच्या । आम्हां अनाथांच्या माहेरा ये ॥ १ ॥ भेटावया तुज ओढे माझा जीव । एकवेळां पाय दावीं डोळा ॥ २ ॥ आणीक हें आर्त नाहीं नारायणा । ओढे हे वासना भेटावया ॥ ३ ॥ वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पाहावया ॥ ४ ॥ तुका म्हणे माझे पुरवीं मनोरथ । येईं गा सांवरीत पांडुरंगा ॥ ५ ॥

४२३२. येइल घरा देव न धरीं संदेहा । फकिराचा यावा व्हावा जेव्हां ॥ १ ॥ होईल फकीर योगी महानुभाव । घडी घडी देव सांभाळील ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें बोलतां बहुत । येणें गुणें संत झाले राम ॥ ३ ॥

४२३३. सांग त्वां कोणासी तारिलें । संतांवेगळें उद्धरिलें ॥ १ ॥ संत शब्द उपदेशी । मग तूं हो म्हणशी ॥ २ ॥ तुका म्हणे नाहीं तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ॥ ३ ॥

४२३४. पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ १ ॥ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । कोंडितो ठोंबरा संतांलागीं ॥ २ ॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितरांसी दवडोनी ॥ ३ ॥ श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ ४ ॥ नेतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक ॥ ५ ॥ हातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कांटाळतो ॥ ६ ॥ सारा वेळ धंदा करितां श्रमेना । साधूच्या दर्शना जातां कुंथे ॥ ७ ॥ हरीच्या कीर्तनीं गुंगायासी लागे । येरवीं तो जागे उगलाची ॥ ८ पुराणीं वैसतां नाह

रिकामटी । खेळतो सोंगटी अहोरात्र ॥ ९ ॥ देवाच्या विभूति न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ १० ॥ गाईला देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥११॥ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें घेतो घाटा घटघटां ॥१२॥ तुका म्हणे ऐसे प्रपंचीं गुंतले । जन्मोनी मुकले विठोबासी ॥ १३ ॥

४२३५. समर्थाचे सेवे बहु असें हित । विचार हृदयांत करूनी पाहें ॥ १ ॥ वरकडा ऐसा नव्हे हा समर्थ । क्षणेंचि घडित सृष्टि नासे ॥ २ ॥ ज्याची कृपा होतां आपणां ऐसें करी । उरों नेदी उरी दारिद्रांची ॥ ३ ॥ ऐशालागीं मन वोळगे अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ॥ ४ ॥ तुका म्हणे हेंचि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हाचि माना ॥ ५ ॥

४२३६. समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ॥ १ ॥ मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागे ॥ २ ॥ दृष्ट हें जाणावें आपुलें स्वहित । तुका म्हणे मात ऐसी आहे ॥ ३ ॥

४२३७. सर्वांपरी तुझे गुण गा उत्तम । तुझे ठायीं प्रेम राहों माझें ॥ १ ॥ माउलीपरीस आहेसी उदार । तरी कां निष्ठुर मन केलें ॥ २ ॥ गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें । तरी कां निर्वाण पाहातोसि ॥ ३ ॥ प्रल्हादा संकटीं रक्षिलें त्वां देवा । तरी कां केशवा सांडी केली ॥ ४ ॥ अन्यायी अजामेळ तो झाला पावन । ऐसें हें पुराण हाका मारी ॥ ५ ॥ तुका म्हणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ६ ॥

४२३८. साही शास्त्रां अति दुरी । तो परमात्मा श्रीहरि । तो दशरथाचे घरीं । क्रीडतो राम ॥ १ ॥ शिवाचें निजध्येय । वाल्मिकाचें निजगुह्य । तो भिल्लटीचीं फळें खाय । श्रीराम तो ॥ २ ॥ योगियांचे मनीं । नातुडे चिंतनीं । तो वानरांचे कानीं । गोष्टी सांगे ॥ ३ ॥ चरणें शिळा उद्धरी । नामें गणिका तारी । तो कोळिया घरीं । पाहुणा राम ॥ ४ ॥ क्षण एक सुरवरां । नातुडे नमस्कारां । तो रिसां आणि वानरां । क्षेम दे राम ॥ ५ ॥ राम

सांवळा सगुण । राम योगियांचें ध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ६ ॥

४२३९. सांग पांडुरंगा मज हा उपाव । जेणें तुझे पाव आतुडती ॥ १ ॥ न कळे हा निर्धार ब्रह्मादिकां पार । कायसा विचार माझा तेथें ॥ २ ॥ तुका म्हणे आतां धरूनिया धीर । राहूं कोठवर मायबापा ॥ ३ ॥

४२४०. सांडियलें रूप विक्राळ भ्यासुर । झालें सकुमार कोडिसवाणें ॥ १ ॥ श्याम चतुर्भुज मुकुट कुंडलें । सुंदर दंडलें नव माळ ॥ २ ॥ गोपाळ म्हणती कैसें रे बा कृष्णा । रूप नारायणा धरियेलें ॥ ३ ॥ कैसा वाढलासी विक्राळ झालासी । गटगटा ग्वाळांसि गिळियेलें ॥ ४ ॥ तुका म्हणे भावें पुसती गोपाळ । अनाथवत्सल म्हणोनियां ॥ ५ ॥

४२४१. सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेममिठी पडे वदनासी । १ ॥ व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥ २ ॥ वृक्षाचिया माथां सोडिला ससाणा । धनुष्यासि बाणा लावियेलें ॥ ३ ॥ तये काळीं तुज पक्षी आठविती । धांवे गा श्रीपती मायबापा ॥ ४ ॥ उडोनियां जातां ससाणा मारील । बैसतां विंधील पारधी तो ॥ ५ ॥ ऐकोनिया धांवा तयां पक्षियांचा । धरिला सर्पाचा वेष वेगीं ॥ ६ ॥ डंखोनि पारधी भूमिसी पाडिला । बाण तो लागला ससाण्यासी ॥ ७ ॥ ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होशील कोंवसा संकटींचा ॥ ८ ॥ तुका म्हणे तुझी कीर्ति त्रिभुवनीं । वेदाचिये वाणी वर्णवेना ॥ ९ ॥

४२४२. गाबळाचे ग्रंथीं कां रे पडा सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ १ ॥ संसारगाबाळीं पडसी निखळ । झालासी तूं खळ तेणें मानें ॥ २ ॥ साधनसंकटीं गुंतसीं कासया । व्यर्थ गा अपायामाजी गुंती ॥ ३ ॥ निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंत जन्मांचे फेडी मळ ॥ ४ ॥ तुका म्हणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचे स्पष्ट हरि बोले ॥ ५ ॥

४२४३. गरुडावरी बैसोनि येतो जगजेठी । त्याचे चरणीं मिठी घालूं चला ॥ १ ॥ सांवळें रूपडें देखिलें लोचनीं । शंख चक्र

दोन्ही शोभताहे ॥ २ ॥ पितांबर झळके हेचि त्याची खूण । वांकी रुणझुण करीताती ॥ ३ ॥ गरुडाचा चपेटा येत असे नेटें । कस्तुरी मळवट शोभताहे ॥ ४ ॥ पदक एकावळी शोभताहे कंठीं । तुका म्हणे भिठी घालूं चला ॥ ५ ॥

४२४४. गव्हाराचें ज्ञान अवघा रजोगुण । सुखवासी होऊन विषय भोगी ॥ १ ॥ त्यासी जरी ज्ञानउपदेश केला । संगेंविण त्याला राहवेना ॥ २ ॥ तुका म्हणे संग उत्तम असावा । याविण उपावा काय सांगों ॥ ३ ॥

४२४५. कोणाही केंडावें हा आम्हां अधर्म । जो जो पात्रे श्रम तो तो देव ॥ १ ॥ म्हणउनि चित्ता शिकविलें वोजें । आतां हेंचि दुजें न बोलावें ॥ २ ॥ हालविलें जरी परउपकारें । जिव्हे पाय खरें उपाधीचें ॥ ३ ॥ तुका म्हणे जीव प्रारब्धा आधीन । कोण वाहे सीण करुणा शोभे ॥ ४ ॥

४२४६. कोणी निंदा कोणी वंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥ काय तुम्हांसी गरज । आम्ही भजूं पंढरिराज ॥ २ ॥ तुम्हांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥ तुका म्हणे होकां काहीं । गळा दिला विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

४२४७. कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी । सांग हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें तेथें ॥ २ ॥ खांबावरी लात मारिली दुर्जनें । खांबीं नारायण म्हणतांचि ॥ ३ ॥ तुका म्हणे कैसा खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ४ ॥

४२४८. गोपाळ प्रीतीनें कैसे विनविती । विक्राळ श्रीपती होऊं नको ॥ १ ॥ नको रे बा कृष्णा धरूं ऐसें रूप । आम्हां चळकांप सुटलासे ॥ २ ॥ होई बा धाकुटा श्यामचतुर्भुज । बैसोनियां गुज सुखें बोलों ॥ ३ ॥ वोणव्याच्या रागें गिळिशील आम्हां । तुका मेघश्यामा पायां लागे ॥ ४ ॥

४२४९. चित्त गुंतलें प्रपंचें । झालें वेडें ममतेचें ॥ १ ॥ आतां सोडवीं पांडुरंगा । आलें निवारीं तें अंगा ॥ २ ॥ गुंतली चावटी ।

नामीं रूपीं झाली तुटी ॥ ३ ॥ तुका म्हणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥ ४ ॥

४२५०. चहूंकडूनियां येती ते कल्लोळ । सभोंवते ज्वाळ जवळीं आले ॥ १ ॥ सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी । घोंगडी आणि काठी खांद्यावरी ॥ २ ॥ लहान लेंकरूं होतें तें सगुण । विक्राळ वदन पसरिलें ॥ ३ ॥ जाभाड तें एक गगनीं लागलें । एक तें ठेविलें भूमिवरी ॥ ४ ॥ तये वेळीं अवघे गोपाळही भ्याले । तुकेंही लपालें भिऊनियां ॥ ५ ॥

४२५१. गोपाळांचें कैसें केलें समाधान । देऊनि आलिंगन निववि़ले ॥ १ ॥ ज्वाळाबरोबरी तुम्हां कां प्रासीन । अवतार घेणें तुम्हांसाठीं ॥ २ ॥ निर्गुण निर्भय मी सर्वां निराळा । प्रकृति वेगळा गुणातीत ॥ ३ ॥ चिन्मय चिद्रुप अवघे चिदाकार । तुका म्हणे पार नेणे ब्रह्मा ॥ ४ ॥

४२५२. गुळ सांडुनि गोडी घ्यावी । मीठ सांडुनि चवी चाखावी ॥ १ ॥ ऐसा प्रपंच सांडुनि द्यावा । मग परमार्थ जोडावा ॥ २ ॥ साकरेचा नव्हे ऊंस । आम्हां कैचा गर्भवास ॥ ३ ॥ बीज भाजुनि केली लाही । जन्म मरण आम्हां नाहीं ॥ ४ ॥ आकारासी कैचा ठाव । देह प्रत्यक्ष जाला वाव ॥ ५ ॥ तुका म्हणे अवघे जग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ६ ॥

४२५३. गांवलोकीं कांहीं लावियेलें पिसें । काय सांगों ऐसें तुजपाशीं ॥ १ ॥ तोंड काळें केलें फिरविलें मज । नाहीं धरिली लाज पांडुरंगा ॥ २ ॥ काय तुजपाशीं सांगों हें गाऱ्हाणें । मग काय जिणें तुझें माझें ॥ ३ ॥ कोणासाठीं आतां करावा संसार । केली वारावार आपणाचि ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्हीं मोडिला घरचार । धरियेला धीर तुझ्या पायीं ॥ ५ ॥

४२५४. जुनाट हें धन अंत नाहीं पार । खात आलें फार सरलें नाहीं ॥ १ ॥ नारद हा मुनि शुकसनकादिक । उरलें अमूप तुम्हां आम्हां ॥ २ ॥ येथूनियां धना खाती बहुत जन । वाल गुंज उणें झालें नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे धना नाहीं अंतपार । कुंठित हे चार वाचा तेथें ॥ ४ ॥

४२५५. जातीचा ब्राह्मण । न करितां संध्यास्नान ॥ १ ॥ तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनि हीन ॥ २ ॥ सांडुनियां शाळिग्राम । नित्य वेश्येचा समागम ॥ ३ ॥ नेघे संतांचें जो तीर्थ । अखंड वेश्येचा जो आर्त ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपि ॥ ५ ॥

४२५६. जातां पंढरीच्या मार्गें । काय वर्णूं सुखा मग ॥ १ ॥ घडे लाभ लक्षकोटि । परब्रह्मीं होईल भेटी ॥ २ ॥ नाम गर्जत येती संत । त्यांच्या दर्शनें होइजे मुक्त ॥ ३ ॥ जो अलक्ष्य ब्रह्मादिकां । आला संन्निध म्हणे तुका ॥ ४ ॥

४२५७. जागा घरटी फिरे । तस्कराची दिवसा राती ॥ १ ॥ नीदसुरें नाडिलीं । असो ऐसीं मागें किती ॥ २ ॥ हाटकरी सकळ जन । वस्तु करा रे जतन ॥ ३ ॥ हुशार ठायीं । निज निजेलिया पाहीं ॥ ४ ॥ सावचित्त असे खरा । लाभ घेऊन जावें घरा ॥ ५ ॥ तराळ बोंबे उतराई । राखा आपुलिया भाई ॥ ६ ॥ हरिच्या नामीं घालूं जागा । तुका म्हणे हुशार गा ॥ ७ ॥

४२५८. जळो जळो तें गुरुपण । जळो जळो तें चेलेपण ॥ १ ॥ गुरू आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिडोरीं ॥ २ ॥ काशासाठीं झालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥ ३ ॥ तुका म्हणे चेला । गुरु दोघेहि नरकाला ॥ ४ ॥

४२५९. जरी न भरे पोट । तरी सेवूं दरकूट ॥ १ ॥ परी न घालूं तुज भार । हाचि आमुचा निर्धार ॥ २ ॥ तुझें नाम अमोलिक । नेणती हे ब्रह्मादिक ॥ ३ ॥ ऐसें नाम तुझें खरें । तुका म्हणे भासे पुरें ॥ ४ ॥

४२६०. जरी तुझा नसता आधार । कैसा हा संसार दुस्तर झाला होता ॥ १ ॥ ऐसा बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश ॥ २ ॥ मायामोहफांसा लोकलाजबेडी । तुजविण तोडी कोण एक ॥ ३ ॥ हें तों मज कळों आलें अनुभवें । बरें माझ्या जीवें पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका म्हणे यास तूंचि माझा ग्वाही । परी भाव नाहीं जनां लोकां ॥ ५ ॥

४२६१. जन्मोजन्मींचें संचित । भेटी झाली अकस्मात ॥ १ ॥

आतां सोडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥२॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरीराया ॥ ३ ॥ तुका म्हणे अंतीं । तुझी माझी एक गति ॥ ४ ॥

४२६२. जनाचिया मना जावें काशियेसी । माझी वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥ तेथें भागीरथी येथें भीमरथी । अधिक म्हणती चंद्रभागा ॥ २ ॥ तेथें माधवराव येथें यादवराव । जाणोनिया भाव पुंडलिकाचा ॥ ३ ॥ विष्णुपद गया तेचि येथें आहे । प्रत्यक्ष हें पाहें विटेवरी ॥ ४ ॥ तुका म्हणे हेंचि प्रपंच उद्धरी । आतां पंढरपुरीं घडो बापा ॥ ५ ॥

४२६३. जगीं ऐसा बाप व्हावा । ज्याचा वंश मुक्तिस जावा ॥ १ ॥ पोटा येतां हरलें पापा । ज्ञानदेवा मायबापा ॥ २ ॥ मुळीं बाप होतां ज्ञानी । तरी आम्ही लागलों ध्यानीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मी पोटींचें बाळ । माझी पुरवा ब्रह्मींची आळ ॥ ४ ॥

४२६४. तुझें नाम गाया नसे पेंडवळा । गाऊं कळवळा प्रेमाचिया ॥ १ ॥ येईल आवडी जैशी अंतरींची । तैसी नामाची कीर्ति गाऊं ॥ २ ॥ माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण ॥ ३ ॥ अबद्ध चांगलें गाऊं जैसें तैसें । बाहे बाळ जैसें मायबापा ॥ ४ ॥ तुका म्हणे मज न लावीं वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ५ ॥

४२६५. तुझे पाय माझी काशी । कोण जाय माझे काशी ॥ १ ॥ तुझें रूप तेंचि ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुझे चरण तेचि गया । झालें गयावर्जन देहा ॥ ३ ॥ तुका म्हणे सकळ तीर्थें । तुझे पायीं वसतीं येथें ॥ ४ ॥

४२६६. तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं बंधु लेंक मग जाले ॥ १ ॥ वाटकरी म्हूण न पुसती आतां । परी आहे सत्ता करीन ते ॥ २ ॥ लेंकीचें लेंकरूं नातु जाल्यावरी । मंगळाही दुरि अंतरलों ॥ ३ ॥ बाइलेचा भाऊ पिसुन सोयरा । म्हणउनि करा विनोद हा ॥ ४ ॥ आकुळीं तों करूं नये तेंचि केलें । न बोलावें भलें तोंचि आतां ॥ ५ ॥ म्हणसी लेंकी माऊसी बहिणी । आम्हां केलें धणी पापाचे त्या ॥ ६ ॥ बहु पांचांजणीं केली विटं·

बना । नये दाऊं जना तोंड ऐसें ॥ ७ ॥ तुका म्हणे आधीं मूळ तेंच धरूं । मागील तें करूं उरी आतां ॥ ८ ॥

४२६७. तुझी कीर्ति सांगो तुजपुढें जरी । ब्रह्मांडींही हरी माईना ते ॥ १ ॥ मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेचि ॥ २ ॥ अनंत अपार आपंगिले भक्त । माझेंचि संचित ओढवेना ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा । पामरें म्यां सेवा केली नाहीं ॥ ४ ॥

४२६८. तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो रहावा पांडुरंग ॥ १ ॥ सांगितला मंत्र श्रीराम नामाचा । सर्व काळ वाचा हेंचि बोले ॥ २ ॥ उफराटें नाम वाल्मीक बोलिला । तोही वंद्य केला नारायणें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज तुझाचि भरंवसा । धांवुनियां कैसा येसी देवा ॥ ४ ॥

४२६९. तुजविण चाड आणिकांची कांहीं । धरीन हें नाहीं तुज ठावें ॥ १ ॥ तरण उपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ॥ २ ॥ कोण मज आळी काय हे तांतडी । सोनियाची घडी जाय दिस ॥ ३ ॥ तुझिया नामाचें ल्यालोंसे भूषण । कृपा संतजन करितील ॥ ४ ॥ तुका म्हणे झाला आनंदाचा वास । हृदया या नास नव्हे कधीं ॥ ५ ॥

४२७०. तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ॥ १ ॥ मज या लोकांचा न साहे आघात । देखणें प्रचित जीव घेती ॥ २ ॥ सहज विनोदें बोलियेलों गोष्टी । आरंभीं तों पोटीं न धरावी ॥ ३ ॥ दीनरूप मज करावें नेणतां । याहुनी अनंता आहें तैसा ॥ ४ ॥ तुका म्हणे जेणें मज तूं भोगसी । तें करीं जनासी चाड नाहीं ॥ ५ ॥

४२७१. तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ १ ॥ नित्य करितों कीर्तन । हेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥ ३ ॥ देव भावाचा भुकेला । तुका वैकुंठासी नेला ॥ ४ ॥

४२७२. तीर्थें फळतीं काळें जन्में आगाळिया । संतदृष्टी पाया हेळा मात्रें ॥ १ ॥ सुखाचे सुगम वैष्णवाचे पाय । अंतरीचा जाय

महाभेव ॥ २ ॥ काळेंही नसरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ॥ ३ ॥ उपमा द्यावया सांगतां आणिक । नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां ॥ ४ ॥ तुका म्हणे मी राहिलों येणें सुखें । संतसंगें दुःखें नासावया ॥ ५ ॥

४२७३. डळमाळिला मेरु आणि तो मांदार । पाताळीं फणिवर डोई झाडी ॥ १ ॥ लोपे तेजें सूर्य आणीक हा चंद्र । कांपतसे इंद्र थरथरां ॥ २ ॥ ऐसें रूप उग्र हरीनें धरिलें । दैत्या मारियेलें मांडिवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्ताकारणें श्रीहरि । बहु दुराचारी निर्दाळिले ॥ ४ ॥

४२७४. त्रैलोकींचा नाथ सकळांचा आधार । बळीचें तुवां घर धरियेलें ॥ १ ॥ आम्हां मोकलिलें कोणां निरविलें । कोणां हातीं दिले तिन्ही लोक ॥ २ ॥ अनाथांचा बंधु दासांचा कैवारी । ब्रीदें तुझीं हरी जाती वायां ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें बोलिला दुर्वास । वाटला संतोष पांडुरंगा ॥ ४ ॥

४२७५. ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिलें । गोपाळ रक्षिले वनांतरीं ॥ १ ॥ मावेचा वोणवा होऊनी राक्षस । लागला वनास चहूंकडे ॥ २ ॥ गगनासी ज्वाळा लागती तुंबळ । गोधनें गोपाळ वेडावलीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तेथें पळावया वाट । नाहीं बा निपट ऐसें झालें ॥ ४ ॥

४२७६. तुम्हीं गोपीबाळा मज कैशा नेणा । इंद्र अमरराणा म्यांचि केला ॥ १ ॥ इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक । माझे सकळीक यमधर्म ॥ २ ॥ मजपासूनियां झाले जीवशिव । देवांचाही देव मीच कृष्ण ॥ ३ ॥ तुका म्हणे त्यांसी बोले नारायण । व्यर्थ मी पाषाण जन्मा आलों ॥ ४ ॥

४२७७. तुम्हां सांगतों कलयुगफळ । पुढें होईल ब्रह्मघोळ ॥१॥ आम्हां म्हणतील कंटक । ऐसा पाडिती दंडक ॥ २ ॥ स्त्रिया पूजुनि सरे देती । भलते स्त्रियेसी भलते जाती ॥३॥ श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस । अंगिकारिति मद्यमांस ॥ ४ ॥ चारी वर्ण अठरा याती । केवळ करिती एक पंक्ती ॥ ५ ॥ म्हणती अंबेचा क्रीडाकल्लोळ । शिवरूप

प्राणी सकळ ॥ ६ ॥ ऐसें होईल शकून देतो । अगोदर सांगून जातो ॥ ७ ॥ तुका सद्गुरुदास्य करी । सिद्धि पाणी वाहे घरीं ॥८॥

४२७८. तुझें वर्म आम्हां कळों आलें सुखें । संतांचियां मुखें पांडुरंगा ॥ १ ॥ अवघाचि नट वाउगा पसारा । चेईला तो खरा तूंचि एक ॥ २ ॥ म्हणऊनि देहबुद्धि नासिवंता । नातळे या चित्ता नेदावया ॥ ३ ॥ सोय हे लागली पुढिलांची वाट । पावले जे नीट तुजपाशीं ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं कोणासवें काज । बोलायाचें मज अंतरींचें ॥ ५ ॥

४२७९. तुझें प्रेम माझ्या हृदयीं आवडी । चरण न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥ कासया सिणविसी थोरीवाकारणें । काय तुझें उणें होईल देवा ॥ २ ॥ चातकाची चिंता हरली जळधरें । काय त्याचें सरे थोरपण ॥ ३ ॥ चंद्र चकोरांचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय ॥ ४ ॥ तुका म्हणे मज अनाथा सांभाळीं । हृदय-कमळीं स्थिर राहें ॥ ५ ॥

४२८०. तुझें नाम पंढरिनाथा । भावेंविण नये हातां ॥ १ ॥ दाहां नये विसां नये । पन्नासां साठां नये ॥ २ ॥ शतां नये सहस्त्रां नये । । लक्षकोटीलागीं नये ॥ ३ ॥ तुका म्हणे पंढरिनाथा । भावें-विण नये हातां ॥ ४ ॥

४२८१. तुझे नामीं दीनानाथा । आम्ही उघडा घातला माथा ॥ १ ॥ आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥ २ ॥ पतित होतों ऐसा ठावा । आधीं कां न विचारावा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझे पायीं । आम्ही मिरास केली पाहीं ॥ ४ ॥

४२८२. देवीं आणि दैतीं सिंधु घुसळिला । भार पृथ्वीस झाला सहावेना ॥ १ ॥ झालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरी सकळांची ॥ २ ॥ तये काळीं देव करिताती स्तुति । कृपाळु श्रीपती म्हणोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे उदंड पवाडे । व्यासा सहस्र तोंडें सिणला तोही ॥ ४ ॥

४२८३. देवा बोलें आतां बोला । त्वां कां धरिला अबोला ॥ १ ॥ भेऊं नको देई भेटी । तूं कां पडलासी संकटीं ॥ २ ॥

तुझ्या जीवींचें मी जाणें । म्हणसी मुक्ती आम्हां देणें ॥ ३ ॥ तुका म्हणे नलगे कांहीं । चित्त राहो तुझे पायीं ॥ ४ ॥

४२८४. देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपात्ति ज्या ज्या कांहीं ॥ १ ॥ नेघे माझी वाचा पुढें कांहीं वाव । आणि दुजे भाव बोलायाचे ॥ २ ॥ मनाची वाटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे घेई विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल ॥ ४ ॥

४२८५. देव धरी नाना सोंगें । नाम श्रेष्ठ पांडुरंग ॥ १ ॥ तो हा गवळियांचे घरीं । नाम सारितो मुरारि ॥ २ ॥ धन्य यशोदेचें प्रारब्ध । नाचे अंगणीं गोविंद ॥ ३ ॥ ऐशीं भक्तासाठीं देवें । नाना धरियेलीं नांवें ॥ ४ ॥ होय दासांचा जो दास । तुका म्हणे विठ्ठलास ॥ ५ ॥

४२८६. देव जडला जाइना अंगा । यासी काय करूं सांगा ॥ १ ॥ वरकड देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती ॥ २ ॥ अंगीं भरलें देवाचे वारें । देव जगाचे दिसे सारें ॥३॥ भूत न बोले निरुतें । कांहीं केल्या न सुटे तें ॥ ४ ॥ जीव खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । ॥ ५ ॥ तुका म्हणे वाडें कोडें । उभें पुंडलिका पुढें ॥ ६ ॥

४२८७. देव गावा ध्यावा ऐसें झालें । परदेशी नाहीं उगलें । वडील आणि धाकुलें । नाहीं ऐसें झालें दुसरें तें ॥ १ ॥ नाहीं लागत मूळींहूनि । सुहृद जन आणि जननी । लागल्या लागें त्यागें सांडुनि । लोभीये मांडणीसंयोगाची ॥ २ ॥ शिव बाटला जीवदशे । बहुत ओतत आले ठसे । हीन झाले भूषणाचे इच्छें । निवडती कैसे गुणागुण ॥ ३ ॥ आतां हें हुतांश तों बरें । अवघे एकच मोहरें । पिटिलियाविण नव्हे खरें । निवडे बरें जाति शुद्ध ॥ ४ ॥ तुका उताविळ याजसाठीं । आहे तें निवेदीन पोटीं । आवडी द्यावी जी येथें लाटी । तुझी जगजेठी कीर्ति वाखाणीन ॥ ५ ॥

४२८८. दुर्वासें निरोप आणिला ये रीतीं । मग वाढलेती नारायणा ॥ १ ॥ ठेविले चरण बळीचिये द्वारीं । शिर अंगावरी लांबविलें

॥ २ ॥ पाडियेलें द्वार द्वारावतियेसी । वरी हृषीकेशी निघालेती ॥ ३ ॥ तेथूनियां नाम पडिलें द्वारका । वैकुंठनायका तुका म्हणे ॥४॥

४२८९. दुर्वासया स्वामी गुंतलों भाकेसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ॥ १ ॥ त्याचे आज्ञेविण आम्हां येतां नये । द्वारपाळ राहें होउानियां ॥ २ ॥ पुसे दुर्वासया बळीसी जाऊनी । येरू म्हणे झणी बोलों नका ॥ ३ ॥ तुका म्हणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हां पांडुरंग सखा झाला ॥ ४ ॥

४२९०. दिवाळखोर नारायण । यावरी बहुतांचें ऋण ॥ १ ॥ उठतांचि उभे द्वारीं । अवघे दे दे म्हणती हरी ॥ २ ॥ माजघरीं दडे हरी । माया तडकी आड करी ॥ ३ ॥ युगायुगींचें हें ऋण । म्हण-उनि धरिलें मौन्य ॥ ४ ॥ रोखापत्र पाही । वेदशास्त्र देती ग्वाही ॥ ५ ॥ धनको नाम तुका वाणी । रिणको नाम विठ्ठलधणी ॥ ६ ॥

४२९१. दिवसा व्यापारचावटी । रात्रीं कुटुंब चिंता मोठी ॥ १ ॥ काय करूं या मनासी । नाठवे कां हृषीकेशी ॥ २ ॥ वेश्ये-पाशीं रात्रीं जागे । हरिकीर्तनीं निद्रा लागे ॥ ३ ॥ तुका म्हणे काय झालासी । वृथा संसारा आलासी ॥ ४ ॥

४२९२. दर्दुराचें पिलूं म्हणे रामराम । नाहीं उदक उष्ण होऊं दिलें ॥ १ ॥ कढेमाजीं बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावे वेगीं ॥ २ ॥ आज्ञा तये काळीं केली पावकासी । झणी पिलियांसी तापवीसी ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझे ऐसे हे पवाडे । वर्णितां निवाडे सुख वाटे ॥ ४ ॥

४२९३. आतां तुज मज नाहीं दुजेपण । दाखवीं चरण पांडु-रंगा ॥ १ ॥ तुज रूप रेखा नाम गुण नाहीं । एक स्थान पाही गांव सींव ॥ २ ॥ नावडे संगती तुज दुजयाची । आपुल्या भक्तांची प्रीति तुम्हां ॥ ३ ॥ परि आम्हांसाठीं होसील सगुण । स्तंभाशीं फोडून जयापरि ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसें तुज काय उणें । देई दर्शन चर-णांचें ॥ ५ ॥

४२९४. आतां आम्हां भय नाहीं बा कोणाचें । बळ विठोबाचें झालें असे ॥ १ ॥ धीर दिला आम्हां येणें पांडुरंगें । न पांगों या

पांगें संसाराच्या ॥ २ ॥ तुका म्हणे माझा कैवारी हा देव । नाहीं भवभेव त्याच्या संगें ॥ ३ ॥

४२९५. आणीक कोणापुढें वांसूं मुख सांग । माझें अंतरंग कोण जाणें ॥ १ ॥ पाहें तुजकडे येऊनी जाऊनी । पांडुरंगा मनीं विचारावें ॥ २ ॥ भयचिंता अवघे उद्योग सांडिले । आठवुनी पाउलें असें तुझीं ॥ ३ ॥ नका विसरूं मज वैकुंठनायका । विनवीतसे तुका बंदीजन ॥ ४ ॥

४२९६. आनंदाचा कंद गाइयेला गीतीं । पाहियेला चित्तीं देवराव ॥१॥ देवराव तोही आहे निश्चयेंसी । अखंड नामासी बोलाविता ॥२॥ बोलविता मज कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं धरा भाव ॥३॥

४२९७. आधीं देह पाहतां वाव । कैंचा प्रारब्धासी ठाव ॥१॥ कां रे रडतोसी माना । लागें विठ्ठलचरणा ॥२॥ दुजेंपण झालें वाव । त्रिभुवनीं नाहीं ठाव ॥३॥ तुका म्हणे खरें पाहें । विठ्ठल पाहोनियां राहें ॥४॥

४२९८. आतां बरें झालें । सकाळींच कळों आलें ॥१॥ मज न ठेवी इहलोकीं । आलों तेव्हां झाली चुकी ॥२॥ युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा ॥३॥ तुका म्हणे ठेवीं । भोगासाठीं निरयगांवीं ॥४॥

४२९९. अनंत लक्षणें वाणितां अपार । संताचें तें घर सांपडेना ॥१॥ जये घरीं संत राहाती आपण । तें तुम्हां ठिकाण आतुडेना ॥२॥ ठिकाण धरूनी पाहावे ते संत । उगाच आकांत करूं नये ॥३॥ संत होऊनियां संतासी पहावें । तरिच तरावे तुका म्हणे ॥४॥

४३००. अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥१॥ नांदणूक सांगें वडिलांचें बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥२॥ तुका म्हणे नांदों आपल्या प्रतापें । तयाची लोकांपें स्तुति सांगों ॥३॥

४३०१. अग्निकुंडामाजीं घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥१॥ पितियासी म्हणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी

सर्वांठायीं ॥२॥ अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हांक मारी ॥३॥ तुका म्हणे अग्नि जाहला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥४॥

४३०२. अंगीं ज्वर तया नावडे साकर । जाणे तो इतर गोडी जाणे ॥१॥ एकाचिये तोंडीं पाडियेली माती । अवघे ते खाती पोट-भरी ॥२॥ चारितां बळें येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्य-वंत ॥३॥ तुका म्हणे नसे सांचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥४॥

४३०३. आलिया संसारीं देखिली पंढरी । कीर्ति महाद्वारीं वाणूं तुझी ॥१॥ पताकांचे भार नामाचे गजर । देखिल्या संसार सफळ झाला ॥२॥ साधुसंतांचिया धन्य झाल्या भेटी । सांपडली लुटी मोक्षाची हे ॥३॥ तुका म्हणे आतां हेंचि पैं मागणें । पुढती नाहीं येणें संसारासी ॥४॥

४३०४. आयुष्य वेंचुनि कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥ फुकाचा चाकर झालासी काबाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥ दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी कामभोग ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें आयुष्य नाशिलें । पाप तें सांचिलें पतनासी ॥ ४ ॥

४३०५. भक्तांची सांकडीं स्वयें सोसी देव । त्यांपाशीं केशव सर्वकाळ ॥ १ ॥ जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती । तेथें हा श्रीपति उभा असे ॥ २ ॥ तुका म्हणे देव सर्वांठायीं झाला । भरूनी उरला पांडुरंग ॥ ३ ॥

४३०६. बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥ कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ २ ॥ टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेंपी घांटी ॥ ३ ॥ तुका म्हणे तो केवळ पुंड । त्यावरि वाजती यमदंड ॥ ४ ॥

४३०७. होतें तैसें पायीं केलें निवेदन । अंतरलों दीन बहुत होतों ॥ १ ॥ संबोखुनी केलें समाधान चित्त । वोगरूनि भातें प्रेमरसें ॥ २ ॥ नामरत्नमणी करूनी भूषण । अलंकार मंडण

माळा दिली ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखें झालों निरामय । नामीं नाम-सोय निमग्नता ॥ ४ ॥

४३०८. हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं । वरदानें बळी शंकराच्या ॥ १ ॥ इंद्रपदराज्य घेतलें हिरोनी । देवा चक्रपाणी म्हणती धांव ॥ २ ॥ तई पांडुरंगा शूकर झालेती । तया दैत्यपती मारियेलें ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्यांचीं राज्यें त्यांसी दिलीं । ऐसी तूं माउली पांडुरंगा ॥ ४ ॥

४३०९. हिरा ठेवितां काळें गाह्राण । मोल न तुटे दुकाळीं जाण ॥ १ ॥ तैसें संतजन पाहीं । विनटले श्रीहरिपायीं ॥ २ ॥ तुका म्हणे तैसे भक्त । तयांसी जन हें निंदित ॥ ३ ॥

४३१०. हेचि वेळा देवा नका मागें घेऊं । तुम्हांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥ नारायणा ये रे पाहें विचारून । तुजविण कोण आहे मज ॥ २ ॥ रात्र दिवस तुज आठवूनि आहें । पाहातोसी काय सत्त्व माझें ॥ ३ ॥ तुका म्हणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ४ ॥

४३११. स्त्रिया धन हें बा खोटें । नागवले मोठे मोठे ॥ १ ॥ म्हणोनि सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥ २ ॥ सर्व दुःखासी कारण । हींच दोन्हींच प्रमाण ॥ ३ ॥ आशा सर्वस्वें सांडावी । तेणें निजपदवी पावावी ॥ ४ ॥ देहलोभें नाडला । घाला यमाचा पडला ॥ ५ ॥ तुका म्हणे निरापेक्षा । कांहीं न धरावी अपेक्षा ॥६॥

४३१२. स्वयें आपणचि रिता । रडे पुढिलांच्या हिता ॥ १ ॥ सेखीं हें ना तैसें झालें । बोलणें तितुकें वायां गेलें ॥ २ ॥ सुख-सागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ ३ ॥ तुका म्हणे गाढव लेखा । जेथें भेटेल तेथें ठोका ॥ ४ ॥

४३१३. स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड ॥ १ ॥ जें जें मागावें भातुकें । तें तें पुरवी कौतुकें ॥ २ ॥ खेळविलें कोडें । हरुषें बोले कीं बोबडें ॥ ३ ॥ तुका म्हणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

४३१४. स्वामी तूंही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥ १ ॥ चतुर्भुज माळा रुळे एकावळी । कस्तुरी निढळीं

रेखिलीसे ॥ २ ॥ शंख चक्र गदा रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥ ३ ॥ तुका म्हणे स्वामी आतां दावीं पाय । पांडुरंगे माये कृपावंते ॥ ४ ॥

४३१५. स्वगोत्रींचा पुत्र परगोत्रीं अर्पिला । विभागा मुकला पितृधना ॥ १ ॥ तैसें मजलागीं न धरावें दुरी । नव्हे परगोत्री पोटींचाचि ॥ २ ॥ सुतकासी त्याचे नाहीं प्रयोजन । जनिता म्हणोनि तीन दिवस ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं ठावें हें कोणासी । पुसावें वेदांसी देती ग्वाही ॥ ४ ॥

४३१६. स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा । जातकर्म जाणा वांटिती पैं ॥ १ ॥ तैसें शब्दज्ञान करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ २ ॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवुनियां तृप्त कोण झाला ॥ ३ ॥ कागदीं लिहितां नामाची साखर । चाखतां मधुर केवीं लागे ॥ ४ ॥ तुका म्हणे जळो तैसें ज्ञानबंड । यमपुरीं दंड कठिण आहे ॥ ५ ॥

४३१७. बहु क्लेशी झालों या हो नरदेहीं । कृपादृष्टीं पाहीं पांडुरंगा ॥ १ ॥ पांडुरंगा सर्व देवांचिया देवा । घ्यावी माझी सेवा दीनानाथा ॥ २ ॥ दीनानाथ ब्रीद त्रिभुवनीं तुझें । मायबापा ओझें उतरावें ॥ ३ ॥ उतरीं सत्वर पैलथडी नई । पूर्णसुख देई पायांपाशीं ॥ ४ ॥ पायापाशीं मज ठेवीं निरंतर । आशा तुझी फार दिवस केली ॥ ५ ॥ केली आस तुझी वाट मी पाहातों । निशिदिनीं ध्यातों नाम तुझें ॥ ६ ॥ नाम तुझें गोड स्वभक्तां आवडे । भक्तांलागीं कडे खांदां घेसी ॥ ७ ॥ घेसी खांद्यावरी खेळविसी लोभें । पाऊल तें शोभे विटेवरी ॥ ८ ॥ विटेवरी उभा देखिलासी डोळां । मनाचा सोहळा पुरविसी ॥ ९ ॥ पुरवीं सत्वर त्रैलोक्यस्वामिया । मिठी घाली पायां तुका भावें ॥ १० ॥

४३१८. ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरी चतुर्भुज ॥ १ ॥ पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरी ॥ २ ॥ तुका म्हणे ह्याचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ॥ ३ ॥

४३१९. ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले । त्यासाठीं धरिलें मत्स्यरूप

। १ ॥ तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान ॥ २ ॥ परि तेणें धांवा केला आवडीनें । झाले नारायण कृपासिंधु ॥ ३ ॥ तुका म्हणे विठोबा मी नामधारक । पोसणें सेवक भेटी देई ॥ ४ ॥

४३२०. बौध्य अवतार माझिया अदृष्टा । मौन्यमुखें निष्ठा धरियेली ॥ १ ॥ लोकांचियेसाठीं शाम चतुर्भुज । संतासवें गुज बोलतसां ॥ २ ॥ आलें कलियुग माझिया संचिता । डोळां हाकलेतां न पडेसी ॥ ३ ॥ म्यांच तुझें काय केलें नारायणा । कां नये करुणा तुका म्हणे ॥ ४ ॥

४३२१. बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥ अंगें झाडीन अंगण । त्याचें दास्यत्व करीन ॥ २ ॥ त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

४३२२. बोलिले ते देवऋषी दुर्वासया । जाय पुसावया मागुयानें ॥ १ ॥ मागुता दुर्वास पुसे बलिराया । निरोप जावया देई देवा ॥ २ ॥ बळी म्हणे त्यासी जाय मी न म्हणे । जाईल नारायण लागलाची ॥ ३ ॥ मजपाशीं राहे कोठें तरी जाय । तुका म्हणे पाय न सोडीं मी ॥ ४ ॥

४३२३. संसार करितो मोठ्या महत्त्वानें । दिसे लोकां उणें न कळे त्या ॥ १ ॥ पवित्रपण आपुलें घरच्यासींच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥ २ ॥ आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलांचे दोषगुण वाखाणिती ॥ ३ ॥ विषयाचे ध्यासें जग बांधियेलें । म्हणोनि लागले जन्ममृत्यु ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें संचितचि असे । देवाजीचें पिसें सहजगुण ॥ ५ ॥

४३२४. संसाराचें ओझें वाहता वाहविता । तुजविण अनंता नाहीं कोणी ॥ १ ॥ गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे । योगक्षेमकाज करणें त्याचें ॥ २ ॥ चतुर्भुजा करीं वारू श्रृंगारावे । सारथ्य करावें अर्जुनाचें ॥ ३ ॥ श्वपच अंत्यज भक्तिस्नेहें झाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥ ४ ॥

४३२५. संसारीं असतां हरिनाम घेसी । तरीच उद्धरसी पूर्व-

जैसीं ॥ १ ॥ अवघींच इंद्रियें न येतील कामा । जिव्हे रामनामा उच्चारीं वेगीं ॥ २ ॥ शरीरसंपत्ति नव्हे रे आपुली । भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ॥ ३ ॥ तुका म्हणे सार हरिनाम उच्चार । येऱ्हवीं येरझार हरीविण ॥ ४ ॥

४३२६. स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावूनियां ॥ १ ॥ पुंजाळले नेत्र झाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥ २ ॥ चित्त चाकाटलें स्वरूपामाझारी । न निघे बाहेरी सुखावलों ॥ ३ ॥ सुनीळ प्रकाश उदैजला दिन । अमृताचें पान जीवनकळा ॥ ४ ॥ शशिसूर्या झाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥ तुका म्हणे सुखें प्रेमेंसीं डुल्लत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥

४३२७. भक्तिऋण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझे ॥१॥ प्रेमव्याज देई हरी । माझा हिशेब लवकरी करीं ॥ २ ॥ माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ॥ ३ ॥ तुझे नामीं आहे खत । सुखें करीं पंचाईत ॥ ४ ॥ तुका म्हणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ५ ॥

४३२८. बरवें दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ १ ॥ सारअसाराचीं पोतीं । ग्राहक पाहोनि करा रितीं ॥ २ ॥ उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण साठवावा माल ॥ ३ ॥ सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम विकार ॥ ४ ॥ तुका झाला वाणी । चुकवूनि चौऱ्यायसींच्या खाणी ॥ ५ ॥

४३२९. फस्याचें बडबडे चवी ना सवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ १ ॥ कोणें या शब्दाचे मरावें घसणी । अंतरें शाहाणी राहिजे हो ॥ २ ॥ गाढवाचा भुंक आइकतां कानीं । काय कोड वाणी ऐसियेचें ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्यासी करावें वचन । त्याचे येती गुण आंगास ते ॥ ४ ॥

४३३०. प्रेम जडलें तुझे पायीं । आणीक न सुचे मजला कांहीं ॥ १ ॥ रात्रीदिवस तुझें ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ नामापरतें नेणें दुजें । ऐसें कळलें मजला निज ॥ ३ ॥ तुका म्हणे अंतकाळीं । आम्हा सोडवीं तात्काळीं ॥ ४ ॥

४३३१. बहुत कृपाळू दीनांचा दयाळू । जगीं भक्तवत्सळू नाम तुझें ॥ १ ॥ मानियेला चित्तीं बळीचा उपकार । अझूनी त्याचें द्वार राखशील ॥ २ ॥ काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । नाहीं तुज हरी कृपा बहु ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्तजनांची ममता । तुम्हांसी अनंता अलौकिक ॥ ४ ॥

४३३२. भाग्यालागीं लांचावले । देवधर्म ते राहिले ॥ १ ॥ कथे जातां आळसे मन । प्रपंचाचें मोठें ज्ञान ॥ २ ॥ अखंड प्रीति जाया । नेणें भजनाच्या ठाया ॥३॥ कथाकीर्तन धनाचें । सर्वकाळ विषयीं नाचे ॥ ४ ॥ तुका म्हणे पंढरीराया । ऐसे जन्मविलें वायां ॥ ५ ॥

४३३३. संत कृपा जाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥ ४ ॥ तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥५॥

४३३४. संतचरणीं नाहीं गोडी । ज्यासी विषयीं आवडी ॥ १ ॥ त्यासी कैंचा भेटे देव । संतचरणीं नाहीं भाव ॥ २ ॥ संतसेवेसी आंग चोरी । दृष्टि न पडो तयावरी ॥ ३ ॥ पाहे गुणदोष संतांचे । जळो काळें तोंड त्याचें ॥ ४ ॥ तुका म्हणे संतसेवा । आमुच्या पूर्वजांचा ठेवा ॥ ५ ॥

४३३५. संतजना माझी यावया करुणा । म्हणउनी दीन हीन जालों ॥ १ ॥ नेणें योग युक्ती नाहीं ज्ञान मति ।गातसें या गीतीं पांडुरंगा ॥ २ ॥ भाव भक्ति नेणें तप अनुष्ठान । करितों कीर्तन विठ्ठलाचें ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा । एका नारायणा वांचूनियां ॥ ४ ॥ तुका म्हणे माझा विठोबासी भार । जाणे हा विचार तोचि माझा ॥ ५ ॥

४३३६. संतापायीं विन्मुख जाला । तो जरि संगति मागों आला ॥ १ ॥ तरि त्याहुनि दुरी जावें । सुखें एकांतीं बैसावें ॥ २ ॥ आत्मचर्चा नाहीं जेथें । आगी लावुनि द्यावी तेथें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

४३३७. संकल्पिला तुज सकळही भाव । कोण एक ठाव उरला

तेथें ॥ १ ॥ इंद्रियव्यापार जें जें कांहीं कर्म । करितों ते धर्म सकळ तुझे ॥ २ ॥ माझें हित फार लागला विचार । तुज सर्व भार चालवणें ॥ ३ ॥ जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा । अपमान पूजा कांहीं तरी ॥ ४ ॥ तुका म्हणे मी तों राहिलों निश्चिंत । तुज कळे हित तैसें करी ॥ ५ ॥

४३३८. हात पाय मिळोनि मेळा। चला म्हणती पाहों डोळां॥१॥ देखणीं नव्हे देखती कैसे । सकळांचा देखणा डोळाचि असे ॥ २ ॥ डोळ्याचा डोळा पाहों गेला । तुका म्हणे तो पाहों ठेला ॥ ३ ॥

४३३९. सोइरे धाइरे दिल्या घेतल्याचे । अंत हे काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ सख्या गोत्रबहिणी सुखाचे सांगाती । मोकलुनी देती अंतकाळीं ॥ २ ॥ आपुलें शरीर आपणा पारिखें । परावीं होतील नवल काई ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां सोड यांची आस । धरीं रे या कास पांडुरंगा ॥ ४ ॥

४३४०. भाव धरिला चरणीं म्हणवितों दास । अहर्निशीं ध्यास करितसें ॥१॥ करितसे ध्यास हृदयीं सकळ । भाव तो सबळ धरियेला ॥२॥ धरिले निश्चळ न सोडीं ते पाय । तुका म्हणे सोय करीं माझी ॥३॥

४३४१. भाते भरूनि हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥१॥ अनंत नामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ २ ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धि ज्या कामारी । तुका म्हणे ज्याचे घरीं ॥ ४ ॥

४३४२. बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ । कैसे येवढे ज्वाळ ग्रासियेले ॥ १ ॥ बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोंवळी । होईल पोळली नारायणा ॥ २ ॥ बैसें कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ । असेल पोळलें कोणे ठायीं ॥ ३ ॥ घोंगडिया खालीं घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥ तुका म्हणे भावें आकळिला देव । कृपासिंधु राव त्रैलोक्याचा ॥ ५ ॥

४३४३. बारा वर्षें बाळपण । तेंही वेंचलें अज्ञानें ॥ १ ॥ ऐसा जन्म गेला वायां । न भजतां पंढरीराया ॥ २ ॥ बाकी उरलीं अठ्यायशी । तीस वेंचिलीं कामासी ॥ ३ ॥ बाकी उरलीं अठ्ठावन्न । तीस वेंचलीं ममतेनें ॥ ४ ॥ बाकी उरलीं आठ्ठावीस । देहगेह

विसरलास ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसा झाडा । संसार ह्मा आहे थोडा ॥ ६ ॥

४३४४. नीट पाट करूनी थाट दावीतसे तोरा । आपणाकडे पाहो कोणी निघाली बाजारा ॥ १ ॥ ते सौरी नव्हे निकी भक्तीविण फिकी ॥ २ ॥ चांग भांग करूनी सोंग दावी माळा मुदी । रुक-याची आस धरूनी हालवी ती फूदी ॥ ३ ॥ थोरे घरीं करी फेरी तेथें नाचे बरी । जेथें निघे रुका तेथें हालवी टिरी ॥ ४ ॥ आंत मांग बाहेर चांग सौरी ती नव्हे तेग । तुका दास नटतसे न करी त्याचा संग ॥ ५ ॥

४३४५. निंदक तो परउपकारी । काय वर्णू त्याची थोरी । तो रजकाहुनि भला । परि सर्व गुणें आगळा ॥ १ ॥ नेघे मोल धुतो फुका । पाप वरच्यावरी देखा । करीतसे साधका । शुद्ध सरते तिहीं लोकीं ॥ २ ॥ मुख संवदणी सांगातें । अवघें सांठविलें तेथें । जिव्हा साबण निरुतें । दोष काढी जन्माचे ॥ ३ ॥ तया ठाव यमपुरीं । वास करणें अघोरीं । त्यासी दंडण करी । तुका म्हणे न्हाणी ते ॥४॥

४३४६. निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण मारी ॥ १ ॥ तैसा आम्हांसी उबगतां । तुका विनविता संतां ॥ २ ॥ मूल मांडि-वरी हागलें । तें बा कोणें रे त्यागिलें ॥ ३ ॥ दासी कामासी चुकली । ते बा कोणें रे विकली ॥ ४ ॥ पांडुरंगाचा तुका पापी । संतसाह्यें काळासी दापी ॥ ५ ॥

४३४७. मन उतावीळ । झालें न राहे निश्चळ ॥ १ ॥ दे रे भेटी पंढरीराया । उभारोनि चारी बाह्या ॥ २ ॥ सर्वांग तळमळी । हात पाय रोमावळी ॥ ३ ॥ तुकया बंधु म्हणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ४ ॥

४३४८. मणि पडिला दाढेसी मकरतोंडीं । सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढी ॥ १ ॥ परी मूर्खाचें चित्त बोधवेना । दुधें कूर्मीच्या पाळवेल सेना ॥ २ ॥ सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित । ससी-सिंगाची प्राप्ति होय तेथें ॥ ३ ॥ अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेतें । दिव्य तेलाचि प्राप्ति होय तेथें ॥ ४ ॥ अति क्रोधें खवळला फणी

पाही । धरूं येतो मस्तकीं पुष्पप्रायीं ॥ ५ ॥ पाहा ब्रह्मानंदेंचि एकीं हेळा । महापातकी तो तुका मुक्त केला ॥ ६ ॥

४३४९. उपजोनी मरों किती वेळोवेळां । कोणा कळवळा येत माझा ॥ १ ॥ म्हणवुनी धांवा करीं काकुलती । यावें बा श्रीपती सोडावया ॥ २ ॥ बहुत या काळें केलों भयाभीत । येतो गिवसीत पाठीलागीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही दावितां स्वरूप । माझें कांहीं पाप निरसतें ॥ ४ ॥

४३५०. अज्ञान हा देह स्वरूपीं मिनला । सर्व वोसावला देहपात ॥ १ ॥ ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योति ॥ २ ॥ तुका म्हणे चित्त स्वरूपीं राहिलें । देह विसावलें तुझ्या पायीं ॥ ३ ॥

४३५१. अवतारनामभेद गणा आदि अगाध । जयासी पार नाहीं पुढें खुंटला वाद । एकाचि दंत शोभे मुख विक्राळ दोंद । ब्रह्मांडामाजी दावी अनंत हे छंद ॥ १ ॥ जयजया गणपति ओंवाळीन आरती । साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ॥ २ ॥ हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका । भोंवरी फेर देतां असुर मर्दिले एका । घातले तोंडरीं हो भक्तजनपालका । सहस्र नाम तुज भक्तिमुक्तिदायका ॥ ३ ॥ सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें । उपमा काय देऊं असे आणिक दुजें । रविशशितारांगणें जयामाजीं सहजें । उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ॥ ४ ॥ वर्णितां शेष लीला तया भागलीं मुखें । पांगुळले वेद चारी कैसे राहिले मुके । अवतार जन्मला हो लिंगनामीं या मुख । अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ॥ ५ ॥ विश्व हें रूप तुझें हस्तपाद मुखडें । ऐसाचि भाव देईं तया नाचतां पुढें । धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें । राखें या शरणांगता तुका खेळतां लाडें ॥ ६ ॥

४३५२. अरे कृष्णा तुवां काळिया नाथिला । दाढे रगडिला रिठासूर ॥ १ ॥ अरे कृष्णा तुवां पुतना शोषिली । दुर्बुद्धि कळली अंतरींची ॥ २ ॥ गोपाळ करुणा ऐसी नानापरी । भाकिती श्रीहरि तुज पुढें ॥ ३ ॥ तुझें नाम कामधेनु करुणेची । तुका म्हणे त्यांची भाली कृपा ॥ ४ ॥

४३५३. आम्ही रामाचे राऊत । वीर झुंजार बहुत ॥ १ ॥ मनपवन तुरंग । हातीं नामाची फिरंग ॥ २ ॥ वारू चालवूं चहुंखुरीं । घाला घालूं यमपुरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही पेणें । आम्हां वैकुंठासी जाणें ॥ ४ ॥

४३५४. आम्ही भाग्याचे भाग्याचे । आम्हां तांबे भोपळ्याचे ॥ १ ॥ लोकां घरीं गाई म्हैसी । आम्हां घरीं उंदिरघुसी ॥ २ ॥ लोकां घरीं तांबे थाळे । आम्हा घरीं परळ काळे ॥ ३ ॥ लोकां घरीं हत्ती घोडे । आम्हां आधोडीचे जोडे ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही सुडके । आम्हां देखोनि काळ धाके ॥ ५ ॥

४३५५. आम्ही जातो आपुल्या गांवा । आमचा रामराम घ्यावा ॥ १ ॥ तुमची आमची हेचि भेटी । येथुनिया जन्मतुटी ॥ २ ॥ आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसें पायां ॥ ३ ॥ येता निजधामीं कोणी । विठ्ठल विठ्ठल बोला वाणी ॥ ४ ॥ रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥ ५ ॥

४३५६. अरे कृष्णा आम्ही तुझे निजगडी । नवनीत आवडीं देत होतों ॥ १ ॥ अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी । संकटां भीतरीं पडियेलों ॥ २ ॥ वरुषला इंद्र जेव्हां शिळाधारीं । गोवर्धन गिरी उचलिला ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझे पवाडे गोपाळ । वर्णिती सकळ नारायणा ॥ ४ ॥

४३५७. अर्थेविण पाठांतर कासया करावें । व्यर्थचि मरावें घोकुनियां ॥ १ ॥ घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होऊनियां ॥ २ ॥ तुका म्हणे ज्याला अर्थी आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलों नका॥ ३ ॥

४३५८. एक वेळे तरी जाईन माहेरा । बहुजन्म फेरा झाल्यावरी ॥ १ ॥ चित्ता हे बैसली अविट आवडी । पालट ती घडी नेघे एकी ॥ २ ॥ करावें तें करी कारण शरीर । अंतरीं त्या धीर जीवनाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी होईल विलंब । परी माझा लाभ खरा झाला ॥ ४ ॥

४३५९. एक म्हणती मुख वासी नारायण । पाहों, हे वदना डोळेभरी ॥ १ ॥ वांसूनिया मुख पाहाती सकळ । अवघे गोपाळ

व्योमाकार ॥ २ ॥ म्हणती गोपाळ बेटे हो हा देव । स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघे विठोबा भोंवते । मिळाले नेणते लहानथोर ॥ ४ ॥

४३६०. एक म्हणती कृष्णा वासिलें त्वां मुख । तेव्हां थोर धाक पडिला आम्हां ॥ १ ॥ गिळों लागलासी अग्नीचे कल्लोळ । आम्ही चळचळां कापतसों ॥ २ ॥ ज्वाळांबरोबरी गिळशील आम्हां । ऐसें मेघश्यामा भय वाटे ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें भाग्याचे गोपाळ । फुटकें कपाळ आमुचेंचि ॥ ४ ॥

४३६१. उमा रमा एक सरी । वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥ दोघे सारिखे सारिखे । विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ २ ॥ तेथें असे भागिरथी । येथें जाणा भीमरथी ॥ ३ ॥ वाराणसी त्रिशुलावरी । सुदर्शनावरी पंढरी ॥ ४ ॥ मनकर्णिका मनोहर । चंद्रभागा सरोवर ॥ ५ ॥ वाराणसी भैरवकाळ । पुंडलीक क्षेत्रपाळ ॥ ६ ॥ धुंडिराज दंडपाणी । उभा गरुड कर जोडुनि ॥ ७ ॥ गया तेचि गोपाळपुर । प्रयाग निरानिरसिंगपुर ॥ ८ ॥ तेथें असती गयावळ । येथें गाई आणि गोपाळ ॥ ९ ॥ शमीपत्र पिंड देती । येथें काला निजसुखप्राप्ति ॥ १० ॥ संतसज्जनीं केला काला । तुका प्रसाद लाधला ॥ ११ ॥

४३६२. कळे परि न सुटे गांठीं । जालें पोटीं कुपथ्य ॥ १ ॥ अहंकाराचें आंदणे जीव । राहे कींव केली ते ॥ २ ॥ हेंकडाची एकीच वोढी । तेही खोडी सांगती ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ॥ ४ ॥

४३६३. कलियुगामाजी थोर झालें बंड । नष्ट लोक लंड झाले फार ॥ १ ॥ न धरिती सोय न पुसती कोणां । येतें जैसें मना तैसें चाले ॥ २ ॥ सज्जनाचा वारा टेकों नेदीं द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ ३ ॥ विश्वास तयाचा बैसेना कोठेंही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥ ४ ॥ तुका म्हणे कैसें केलें नारायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥ ५ ॥

४३६४. ओवाळूं आरती पंढरीराया । सर्व भावें शरण आलों तुझिया पायां ॥ १ ॥ सर्व व्यापून कैसें रूप आकळ । तो हा

गोळ्याघरीं झाला कृष्ण बाळ ॥ २ ॥ स्वरूप गुणातीत झाला अवतारधारी । तो हा पांडुरंग उभा विटेवरी ॥ ३ ॥ भक्तांचिया काजा कैसा रूपासी आला । ब्रीदाचा तोडर चरणीं मिरविला ॥ ४ ॥ आरतें आरती कैसी ओंवाळिली । वाखाणितां कीर्ति वाचा परतली ॥५॥ भावभक्तीबळें होसी कृपाळू देवा । तुका म्हणे पांडुरंगा तुझ्या न कळती मावा ॥ ६ ॥

४३६५. पैल आली आगी कान्हो कायरे करावें । न कळे तें कैसें आजी वांचो आम्हीं जीवें ॥ १ ॥ धांव रे हरी सांपडलों संधी । वोणव्याचे मधीं बुद्धि कांहीं करावी ॥ २ ॥ अवचितां जाळ येतां देखियेला वरी । परतोनि पाहतां आधीं होतों पाठमोरी ॥ ३ ॥ सभोंवतां फेर रीग न होय पळतां । तुका म्हणे जाणसी तें करावें अनंता ॥ ४ ॥

४३६६. हांका मारी ज्याच्या नांवें । त्याचें गांवचि नाहीं ठावें ॥१॥ काय गातों हें कळेना । राग आळवीतों नाना ॥ २ ॥ आशा करुनियां मनीं । कांहीं देईल म्हणउनी ॥ ३ ॥ वितीभरी पोटासाठीं । तुका म्हणे पाडिली तुटी ॥ ४ ॥

४३६७. जेणे तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली सांडी देवा ॥१॥ काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुम्ही डोळे झांका देवा ॥ २ ॥ राव रंक तुम्हां सारिखेचि जाणा । नाहीं थोर साना तुह्मापाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हीं अपंगिलें भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ४ ॥

४३६८. जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ॥ १ ॥ निर्गुण होता तो सगुणासी आला । भक्तीसाठीं प्रगटला ॥ २ ॥ जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥ ३ ॥ सोडविलें वसुदेव देवकीसी । अवतार धरिला तिचे कुशीं ॥ ४ ॥ मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥ ५ ॥ तुका म्हणे देवाधिदेव । तो हा उभा पंढरिराव ॥ ६ ॥

४३६९. ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ १ ॥ साधु कैंचा पापीयासी । काय चांडाळासी काशी ॥२॥ काय पतितासी

पिता । काय अधमासी गीता ॥ ३ ॥ तुका म्हणे निरंजनीं । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ४ ॥

केवळक्षेपक

४३७०. भावभक्तिवादें करावें कीर्तन। आशाबद्ध मन करूं नये ॥१॥ अन्न पाणी धन द्रव्य नारायण। विठ्ठलावांचून बोलूं नये ॥२॥ सप्रेम करावें देवाचें कीर्तन। भय द्या सोडून शरीराचें ॥३॥ तरी मग जोडे विठ्ठल निधान। केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥४॥ देव जोडीलिया तया काय उणें। तुका म्हणे मन नीट करा ॥५॥

४३७१. बाईल चालिली माहेरा। संगें दिधला म्हातारा ॥१॥ सिधा सामग्री पोटाची। सर्वे स्वारी बइलाची ॥२॥ जातां पाडिली ढोरानें। सिव्या देती अन्योविन्यें ॥३॥ न सांवरी आपणातें। नग्न सावलें वरतें ।४॥ फजित केलें जन लोकीं। मेला म्हणे पडे नरकीं ॥५॥ गोहाची हे गेली लाज। गांजितां कां तुम्हीं मज ॥६॥ तुका म्हणे जनीं। छी थू केली विटंबणी ॥७॥

४३७२. बळी म्हणे आजी दुर्वासया स्वामी। मागों नका तुम्ही नारायणा ॥१॥ बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी। बैसविला द्वारीं राखावया ॥२॥ पातला दुर्वास मग हो तथूनी। चिंतातुर मनीं उद्वेगला ॥३॥ काय तूं एकाचा आहेसी अंकित। होई कृपावंत तुका म्हणे ॥४॥

४३७३. बा रे पांडुरंगा केव्हां येशी भेटी। जाहालों हिंपुटी तुजवीण ॥१॥ तुजवीण सखे न वाटे मज कोणी। वाटतें चरणीं घालूं मिठी ॥२॥ ओंवाळावी काया चरणांवरोनी। केव्हां चक्रपाणी भेटशील ॥३॥ तुका म्हणे माझी पुरवीं आवडी। वेगीं घालीं उडी नारायणा ॥४॥

४३७४. भाग्यासाठीं गुरू केला। नाहीं आम्हांसी फळला ॥१॥ याचा मंत्र पडतां कानीं। आमुच्या पेवांत गेलें पाणी ॥२॥ गुरू केला घरवासी। आमुच्या चुकल्या गाईम्हशी ॥३॥ स्वामी आपुली

बुटबुट घ्यावी । आमुची प्रताप टाकुन द्यावी ॥४॥ तुका म्हणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥५॥

४३७५. स्वामीच्या सामर्थ्यें । चाले बोलिला पुरुषार्थ ॥१॥ पाठी देवाचें हें बळ । मग लाभे हातीं काळ ॥२॥ देव ज्यासी साह्य । तेणें केलें सर्व होय ॥३॥ तुका म्हणे स्वामीसत्ता । मग नाहीं भय चिंता ॥४॥

४३७६. स्वप्नींच्या व्यवहारा कळांतर लेखा । जागृतीसी रुका गांठी नाहीं ॥१॥ तेवीं शब्दज्ञानें करितीं चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूं नये ॥२॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवुनियां तृप्त कोण झाला ॥३॥ कागदीं लिहिली नांवाची साखर । चाटितां मधुर केवीं लागे ॥४॥ तुका म्हणे जळो जळो त्याचें ज्ञान । यमपुरीं कोण दंड साहे ॥५॥

४३७७. संवदड आपटा रानचारा । हा तो दसऱ्याचा तुरा ॥१॥ एरवीं यासी पुसे कोण । एका देवासाठीं मान ॥२॥ मातीची ते घागरी । पाण्यासाठीं बैसे शिरीं ॥३॥ तुका म्हणे माय जाण । धान्यासाठीं घेणें देणें ॥४॥

४३७८. संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धी नव जाय ॥१॥ ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे । न लगती करावे उपदेश ॥२॥ घेऊन उठती आपुलाले गुण । भविष्याप्रमाणें तुका म्हणे ॥३॥

४३७९. सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं । सवें वनमाळी चालियेला ॥१॥ सुदिन सुवेळीं भाग्याच्या उदयीं । चरावया गाई वनामाजी ॥२॥ गाई गोपाळांच्या संगें चाले हरि । क्रीडा नानापरि खेळताती ॥३॥ काठी कांबळीया मोहरिया पांवा । सिदोरी गांजिवा खांद्यावरी ॥४॥ गोधनें संवगडे खेळे नानापरि । आले भीमातीरीं वेणूनादा ॥५॥ तेथें उभा ठेला गोपाळांसहित । सिदो-रियां सोडीत बैसे तेथें ॥६॥ तुका म्हणे ज्यांनीं आणिल्या भाकरी । नेऊनियां हरी पुढें देती ॥७॥

४३८०. बरें झाली याचे अवघे सांगाती । वाइटाचें अंतीं कोणी नाहीं ॥१॥ नोहे मातापिता नोहे कांता सुत । इतरांची मात काय

सांगों ॥२॥ तुका म्हणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥३॥

४३८१. ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गवसे परब्रह्म नामें एका ॥१॥ लहानथोरांसी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥२॥ सर्वांप्रति माझी हेचि असे विनंती । आठवा श्रीपती मनामाजी ॥३॥ केशव नारायण करितां आचमन । तेचि संध्या स्नान कर्म क्रिया ॥४॥ नामें करा नित्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पायीं ॥५॥ तुका म्हणे हेंचि निर्वाणींचें शस्त्र । म्हणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥६॥

४३८२. बहुजन्मां शेवटीं स्वामी तुझी भेटी । बहु मोह पोटीं थोर झाला ॥१॥ बहु पुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली । बहु चिंता वाहिली दुर्भराची ॥२॥ बहु काळ गेले अनुचित केलें । बहु नाहीं गाइलें नाम तुझें ॥३॥ ऐसा मी अपराधी अगा कृपानिधि । बहु संतां संनिधि ठेवीं तुका ॥४॥

४३८३. ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग । देत पांडुरंग तृप्ति झाली ॥१॥ मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां । विस्मित विधाता देखोनियां ॥२॥ दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासी । विस्मित मानसीं सुरवर ॥३॥ देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण । शिव मरुद्गण चंद्र सूर्य ॥४॥ तुका म्हणे आले सकळही सुरवर । आनंदें निर्भर पाहावया ॥५॥

४३८४. सद्गुरूनें मज आशीर्वाद दिला । हरुष भरला हृदयीं माझे ॥१॥ हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंद उल्हासीं बोले मज ॥२॥ बोले मज कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं आनंदलों ॥३॥

४३८५. सद्गुरूवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यास ऋपि ॥१॥ म्हणोनि तयाचें पाहूं नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥२॥ कोणे परी तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुम्ही ॥३॥ तुका म्हणे ऐसी बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिलां हो ॥४॥

४३८६. समश्रुळित असतां वाचा । घोष न करिसी कां नामाचा

॥१॥ कां रे वैष्णव नव्हेसी। कवण्या दंभें नागवलासी ॥२॥ हरि हरि म्हणतां लाजसी । गर्वें फुगोनि चालसी ॥३॥ तारुण्यें उताणा । पुंसेविण बांडा सुना ॥४॥ जालेंसि महिमेचें वेडें । नाचों लाजसी दिंडीपुढें ॥५॥ अळंकारांच्यानि बळें । थंचलासी तुळसीमाळें ॥६॥ स्नान न करिसी आंघोळी । विभूति न लाविसी कपाळीं ॥ ७॥ कैसा सकुमार जालासी। म्हणसी नटके एकादशी ॥८॥ वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपयोग नाहीं मांसाचा ॥९॥ पद्मनाभी विश्वनाथ। तुका अझून रडत ॥१०॥

४३८७. सरे आम्हांपाशीं एक शुद्धभाव। नाहीं तरी वाव उपचार ॥१॥ कोण मानी वरी रसाळ बोलणें। नाहीं झाली मनें ओळखी तों ॥२॥ तुका म्हणे आम्हां जाणिवेचें दुःख। न पाहों त्या मुख दुर्जनाचें ॥३॥

४३८८. सांवळें सुंदर पाहें दृष्टीभरी। ऐसें कांहीं करीं मन माझें ॥१॥ मना तुझा ठाव दिला त्याचे पायीं। राहे विठाबाईसवें सदा ॥२॥ मना नको धरूं आणिकांचा संग। नाहीं पांडुरंग जयामनीं ॥३॥ वरपंग भाव नको म्हणे तुका। करीं प्राणसखा नारायण ॥४॥

४३८९. सेकीं हें ना तैसें झालें। बोलणें तितुकें वायां गेलें ॥१॥ स्वयें आपणाचि रिता। रडे पुढिलांच्या हिता ॥२॥ सुखसागरीं नघे वस्ती। अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥३॥ तुका म्हणे गाढव लेखा। जेथें भेटेल तेथें ठोका ॥४॥

४३९०. गव्हांच्या घुगऱ्या। नाचण्यांच्या पुऱ्या। बऱ्या त्याची बऱ्या। पाथ्राणी त्या पाथ्राणी ॥१॥ काय थोरपण। वायां ज्ञाळावा तो शीण। कारणापें भिन्न। निवडे तें निराळें ॥२॥ रुचि योजेपाशीं। गरज ते जैशी तैशी। करूं नका नाशी। खावें खाणें झालें तें ॥३॥ तुका म्हणे मोठा। काय करावा तो ताठा। नाहीं वीण नीटा पाविजेत मारग ॥४॥

४३९१. गणेश शारजा करिती गायना। आणि देवांगना रंभेऐशा ॥१॥ तेथें मानवांही विनवावें तें काय। सुरवर पाय वंदिती

जेथें ॥२॥ ज्याच्या गायनासी तटस्थ शंकर। त्याहि परी पार न कळे तुझा ॥३॥ तुका म्हणे आम्ही किंकर ते किती। इंद्राचीहि मति नागविशी ॥४॥

४३९२. कोण तो उपाव करूं भेटावया। जाळावी हे काया ऐसें वाटे ॥१॥ सोडोनियां गांव जाऊं वनांतरा। रुक्मादेवीवरा पाहावया ॥२॥ करूं उपवास शोधूं हें शरीर। न धरवे धीर नारायणा ॥३॥ जाती आयुष्याचे दिवस हे चारी। मग केव्हां हरी भेटशील ॥४॥ तुका म्हणे कांहीं सांगा विचारोनी। विठो तुझे मनीं असेल तें ॥५॥

४३९३. सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक। देउनियां हस्तक उठविलें ॥१॥ उठविलें मज देउनियां प्रेम। भावार्थें सप्रेम नमस्कारी ॥२॥ नमस्कारी त्याला सद्गुरायाला। तुका म्हणे बोला नाम वाचे ॥३॥

४३९४. कोरडिया गोष्टी नावडती मना। नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड ॥१॥ दाखवी आपुलें सगुण रूपडें। वंदीन मी कोडें पाय तुझे ॥२॥ नलगे तो मोक्ष मज सायुज्यता। नावडे हे वार्ता शून्याकारी ॥३॥ तुका म्हणे चाड धरीन श्रीमुखें। येशील कवतुकें जवळीक ॥४॥

४३९५. कृपा करावी भगवंतें। ऐसा शिष्य द्यावा मातें ॥१॥ माझें व्रत जो चालवी। त्यासी द्यावें त्वां पालवी ॥२॥ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा। तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥३॥ तुका तुका हाका मारी। माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥४॥

४३९६. चाल माझ्या राघो। डोंगरीं दिवा लागो ॥१॥ घर केलें दार केलें घरीं नाहीं वरो। सेजारणी पापिणीचीं पांच पोरें मरो ॥२॥ घरीं पांच पोरें तीं मजहुनि आहेत थोरें। पांचांच्या बळें खादलीं बावन केळें ॥३॥ घर केलें दार केलें दुकान केला मोठा। पाटाची राणी धांगडधिंगा तिचा मोटा ॥४॥ दुकान केला मोठा तर पदरीं रुका खोटा। हिजडा म्हणसी जोगी तर सोळा सहस्र भोगी। तुका म्हणे वेगीं तर हरि म्हणा जगीं ॥५॥

४३९७. चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । प्रत्यक्ष हे मूर्ति विठोबाची ॥१॥ चहूं युगांचें हें साधन साधिलें । अनुभवा आलें आपुलिया ॥२॥ एवढें करूनि आपण निराळा । प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें ॥३॥ दावूनि सकळ प्रमाणांच्या युक्ति । जयजयकार करिती अवघे भक्त ॥४॥ भक्ति नवविधा पावली मूळची । जनार्दन नामाची संख्या झाली ॥५॥ नवसें ओंव्या आदरें वाचितां । त्याच्या मनोरथा कार्य सिद्धि ॥६॥ सीमा न करवे आणीक ही सुखा । तुका म्हणे देखा पांडुरंग ॥७॥

४३९८. चला वळूं गाई । दूर अंतरल्या भाई ॥१॥ खेळ खेळतां झाला शीण । कोण करी वणवण ॥२॥ गाई हकारी कान्हया । म्हणोनि लागती ते पायां ॥३॥ तुका म्हणे त्यावें । नामसंकीर्तन बरवें ॥४॥

४३९९. चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥१॥ होतिल संतांचिया भेटी । सुखाचिया सांगों गोष्टी ॥२॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं म्हणतां चुकती फेर ॥३॥ तुम्हां जन्म नाहीं एक । तुका म्हणे माझी भाक ॥४॥

४४००. चालती आड वाटा । आणिका दाविती जे नीटा ॥१॥ न मनीं तयांचें उपकार । नाहीं जोडा तो गव्हार ॥२॥ विष सेवूनि वारी मागें । प्राण जातां जेणें संगें ॥३॥ बुडतां हाक मारी । ठाव नाहीं आणिका वारी ॥४॥ तुका म्हणे न करी हिंका । गुण घेऊन अवगुण टाका ॥५॥

४४०१. चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण । नित्य हरिगुण गाऊं सदा ॥१॥ गोवर्धन जेणें नखीं हो धरिला । काळया नाथिला महाबळी ॥२॥ ऐसे हरिगुण गातो वाचेवरी । पतितासी तारी जनार्दन ॥३॥ तुका म्हणे हेंचि सज्जना जीवन । वाचेसी स्मरण गोविंदाचें ॥४॥

४४०२. ग्रासोग्रासीं भाव । तरी देहींच जेवी देव ॥१॥ धरीं स्मरण तें सार । नाहीं दुरी तें अंतर ॥२॥ भोगितां तूं भावें । देव जेवूं बैसे सवें ॥३॥ तुज पावो देवा । भावें अंतरींची सेवा ॥४॥ गुंतला

साधनीं । देव नाहीं त्रिभुवनीं ॥५॥ तुका म्हणे हातीं । न धरितां गमाविती ॥६॥

४४०३. गुरुपादाग्रींचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥१॥ संतीं वाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥२॥ गुरुतीर्थी अनमान । यथा सांग मद्यपान ॥३॥ गुरु अंगुष्ठा न चोखी । मुख घाली वेश्ये मुखीं ॥४॥ तुका म्हणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे माती ॥५॥

४४०४. गुरुचिया मुखें होइल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखुण विठोबाची ॥१॥ वेदातें विचारा पुराणांतें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥२॥ तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥३॥

४४०५. ज्याचें जैसें भावी मन । त्यासी देणें दरूषण ॥१॥ पुरवूं जाणे मनिंची खूण । समाधान करोनी ॥२॥ आपणियातें प्रगट करी । छाया बरी कृपेची ॥३॥ तुका म्हणे केलें दान । मन उन्मन हरिनामीं ॥४॥

४४०६. झालासी पंडित पुराण सांगसी । परी तूं नेणसी मी हें कोण ॥१॥ गाढवभरी पोथ्या उलथिसी पानें । परी गुरुगम्य खुणे नेणसी बापा ॥२॥ तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरिनाथ विसंबेना ॥३॥

४४०७. जीवशिवाच्या मांडुनि हाला । अहं सोह दोन्ही भेटती भला ॥१॥ घाली हुतुतू फिरोनी पाहीं आपणासी । पाहींपळिया तो मागिला तुटी पुढिलासी ॥२॥ खेळिया तो हाल सांभाळी । धूम घाली पडे तो पाताळीं ॥३॥ बळियां गांढ्या तोचि खेळे । दम पुरे तो वेळोवेळां खेळे ॥४॥ हातीं पडे तोचि ढांग । दम पुरे तो खेळिया चांग ॥५॥ मागें पुढें पाहे तो जिंके । हातीं तोचि आधार फिके ॥६॥ आपलया बळें खेळे रे भाई । गाढियाची सांडोनी सोई ॥७॥ तुका म्हणे मी खेळिया नव्हें । जिकडे पडे त्याची सवें ॥८॥

४४०८. जाली गाढवी दुधाळ । महिमा गाईची पावेल ॥१॥ श्वान झालेंसें चांगलें । तरी का सांगतें जेवील ॥२॥ झालो सिंदळो

गली । तरी का पतिव्रता झाली ॥३॥ तुका म्हणे ऐशा जाति ।
य उंचपण पावती ॥४॥

४४०९. जयजय म्हणा राम । हातें टाळी वाचे नाम ॥१॥
टाआटी नाहीं ज्यास । न वेचे मोल न पडे खांस ॥२॥ आपण
णे आणिकां हातीं । यज्ञादिकीं नये ते गति ॥३॥ आसन भोजन
रेतां काम । ध्यान समाधि म्हणतां राम ॥४॥ मंत्र जपा हाचि-
र । वर्णां याती जयजयकार ॥ ५ ॥ म्हणतां राम म्हणे तुका ।
ठेवेळां चुकों नका ॥ ६ ॥

४४१०. जन्मा आलिया गेलिया परी भक्ति नाहीं केली । माझें माझें
गोनियां गुंतगुंतों मेलीं ॥१॥ येथें कांहीं नाहीं लव गुरूच्या पायीं ।
ल रांडे टाकीं रुका नको करूं बोल । गुरुविण मार्ग नाहीं
रेसी तें फोल ॥२॥ खाऊनी जेऊनी लेऊनी नेसूनी म्हणती
म्हो बऱ्या । साधु संत घरा आल्या होती पाठमोऱ्या ॥३॥
वोनी पढोनी झाले शाहाणे म्हणती आम्ही संत । परनारी
ोनी त्यांचें चंचल झालें चित्त ॥४॥ टिळा टोपी घालूनी माळा
गतां आम्ही साधु । दयाधर्म चित्तीं नाहीं ते जाणावे भोंदु
॥ कलियुगीं घरोघरीं संत झाले फार । वीतिभरी पोटासाठीं
डती दारोदार ॥६॥ संत म्हणतो केली निंदा निंदा नव्हे भाइ ।
ा असे अनन्य भावें शरण संतांपायीं ॥७॥

४४११. तुझे म्हणों आम्हां । मग उणें पुरुषोत्तमा ॥१॥ ऐसा
ं काय । अमृतानें मृत्यू होय ॥२॥ कल्पवृक्षां तळीं । गांठीं
ग्रलिया झोळी ॥३॥ तुका म्हणे परीस । सांपडल्या उपवास॥४॥

४४१२. तुझा म्हणविलों दास । केली उच्छिष्टाची आस ॥१॥ मुखीं
ड़ावा कवळ । जरी तूं होशील कृपाळ ॥२॥ सोण भाग माझा
। तुका म्हणे न करीं हांसें ॥३॥

४४१३. तुजविण तिळभरी रिता ठाव । नाहीं ऐसें विश्व बोल-
ं ॥१॥ बोलियेले योगी मुनी साधु संत । आहेसी या आंत
ींसाठीं ॥२॥ मी तया विश्वासें आलों शरणागत । पूर्वींचें
त्य आहे तुझें ॥३॥ अनंत ब्रह्मांडें भरोनि उरलासी । मजला

झालासी कोठें नाहीं ॥४॥ अंतपार नाहीं माझिया रूपासी । काय सेवकासी भेट देऊं ॥५॥ ऐसें विचारिलें म्हणोनी न येशी । सांग हृषीकेशी मायबापा ॥६॥ तुका म्हणे काय करावा उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥७॥

४४१४. तुजवांचून कोणा शरण । जाऊं आतां कर जोडून ॥१॥ कोण करील माझें साहे । चित्तीं विचारूनी पाहें ॥२॥ तूं तव कृपेचा सागर । दीनबंधु जगदोद्धार ॥३॥ तुका म्हणे निका । भवसिंधुतारक नौका ॥४॥

४४१५. तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥१॥ दोहींमाजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥२॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥३॥ तंतु पट जेवीं एक । तैसा विश्वेंसीं व्यापक ॥४॥

४४१६. ठाव देऊनियां राखें पायांपासीं । मी तों आहे राशी पातकांची ॥१॥ पातकांची राशी म्हणतां लागे वेळ । एके तो कृपाळ नारायण ॥२॥ नारायण नामें अवघें सांग झालें । असंगाचि केलें एकमय ॥३॥ एकमय झालें विठोबाच्या नामें । भेदाभेद कर्मे आणिक कांहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे चित्तीं चिंतिलें जें होतें । तें होय आपैतें नामें याच्या ॥ ५ ॥

४४१७. डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीये ॥ १ ॥ काय तें वानावें वाचेचे पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ २ ॥ आनंदाच्या रसें ओतींव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ ३ ॥ तुका म्हणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठलचि झालों दर्शनानें ॥ ४ ॥

४४१८. डिवेना डसेना बुजेना निर्मळ । परी अमंगळ स्वीकारीना ॥ १ ॥ परंतु गर्दभ अपवित्र जाणा । पर्वकाळीं दाना देऊं नये ॥ २ ॥ डिवी लात्रा बुजे बहु नेदी दुध । मुखीं नाहीं शुद्ध विष्ठा खाय ॥ ३ ॥ परंतु ते गाय पवित्र हो जाणा । पर्वकाळीं दाना देऊंजेते ॥ ४ ॥ ब्राह्मणें ब्राह्मणा सद्गुरु करावा । परी न करावा शूद्रादिक ॥ ५ ॥ तुका म्हणे देवें सांगितली सोय । म्हणोनि त्याचे पाय धरिलें जीवें ॥ ६ ॥

४४१९. पसरोनि मुखें । कैसे धालों बा हारिखें ॥ १ ॥ ब्रह्मादिकां दुर्लभ वांटा । आम्हां फावला रानटा ॥ २ ॥ गोड लागे काय तरी । कृपावंत झाला हरी ॥ ३ ॥ उडती थेंबुटें । अमृताहुनी गोमटे ॥ ४ ॥ गोडाहुनी गोड । जिव्हा नाचे वाटे कोड ॥ ५ ॥ खुणावुनी तुका । दावी वर्म बोलों नका ॥ ६ ॥

४४२०. पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥ १ ॥ कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आलें एकपणें ॥ २ ॥ मृतिकेचे घट झाले नानापरी । मृत्तिका अवधारीं एकपणें ॥ ३ ॥ तुका म्हणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक एकपणा ॥ ४ ॥

४४२१. पडली घोर रजनी । संगीं कोणी नसोचि ॥ १ ॥ पाहा हो कैसें चालविलें । पिसे गोवलें लावुनी ॥ २ ॥ कोठें लपविलें तें अंग । होता संग दिला तो ॥ ३ ॥ मज कधीं नव्हतें ठावें । दोहीं भावें वाटोळें ॥ ४ ॥ तुका म्हणे कैची उरी । दोहींपरी नाडिलें ॥५॥

४४२२. नीत सांडोनि अवनीत चाले । भंडउभंड भलतेंचि बोले ॥ १ ॥ त्यांत कोणाचें काय बा गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥ ज्यासि वंदावें त्यासी निंदी । मैत्री सांडोनि होतसे दंदी ॥ ३ ॥ आन यातीचे संगती लागे । संतसज्जनामध्यें ना वागे ॥ ४ ॥ केल्याविण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ ५ ॥ करी आपुलाचि संभ्रम । परि पुढें कठीण फार यम ॥ ६ ॥ तुका म्हणे कांहीं नित्य नेम । चित्तीं न धरी तो अधम ॥ ७ ॥

४४२३. तुम्ही साधु संत कैवल्यसागर । मोक्षाचें आगर तुम्हां घरीं ॥ १ ॥ तेथें मतिमंद काय बोलों वाणी । अमृताचे धणी पाणी कां घ्या ॥ २ ॥ कोटि भानु तेजीं खद्योत बापुडें । तैसा तुम्हांपुढें काय बोलों ॥ ३ ॥ तुम्ही अवघे चिंतामणी कल्पतरूचीं वनें । त्यापुढें धांवणें मशकांनीं ॥ ४ ॥ वाराणसी क्षेत्र गंगा वाहे कोड । काय तेथें पाड कोंकणाचें ॥ ५ ॥ पल्लवाचा वारा हिम करी काय । गगनावरी छाय कोण करी ॥ ६ ॥ समुद्राची तृषा हरी ऐसा कोण । जगाची जी तान्ह निववितो ॥ ७ ॥ मेरूचा पाठार अवघी ते क्षिती । मशकाचे हातीं मुष्टि फावे ॥ ८ ॥ सिंहापुढें काय जंबूक आरोळी ।

मातियांचे बोली कांच काय ॥ ९ ॥ कापुरासी काय लावूनी उटावें । काय ओंवाळावें दीपकासी ॥ १० ॥ तसे तुम्ही निरे ज्ञानाचे भरीव । तेथें म्यां बोलावें पाड काय ॥ ११ ॥ कृपानिधि तुम्ही बोलविलें बोला । सुखें न्याय केला तुमचा मी ॥ १२ ॥ अज्ञान मी वेडें म्हणवितों बाळ । माझा प्रतिपाळ करणें तुम्हां ॥ १३ ॥ बोबडें बोलणें न धरावा कोप । क्षमा करा बाप कृपासिंधु ॥ १४ ॥ तुका म्हणे तुम्ही संत बापमाय । भयें धरिले पाय कृपानिधि ॥ १५ ॥

४४२४. तुह्मांपाशीं आम्ही येउनियां काय । वृथासीण आहे चाळण्याचा ॥ १ ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे थार चिंध्या बिदीं ॥ २ ॥ निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ ३ ॥ तेथें काय करणें कवणाची आस । वायां होय नाश आयुष्याचा ॥ ४ ॥ राजगृहा यावें मानाचिया आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ५ ॥ रायाचिये घरीं भगवंता मान । इतरां सामान्यां मान नाहीं ॥ ६ ॥ देखोनिया वस्त्रें भूषणाचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ७ ॥ ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आम्हां हरि उपेक्षीना ॥ ८ ॥ आतां हेंचि तुम्हां सांगणें कौतुक । भिक्षेऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ९ ॥ तपव्रतयाग महा भले जन । आशाबद्ध हीन वर्तताती ॥ १० ॥ तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे । पूर्वीच दैवाचे हरिभक्त ॥ ११ ॥

४४२५. तुळसीवृंदावनीं उपजला कांदा । नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥ तैसे वंशामध्यें झाले जे मानव । जाणावे दानव अभक्त ते ॥ २ ॥ केवड्या मधील निर्गंध कणसें । तैशीं तीं माणसें भक्तिहीन ॥ ३ ॥ तुका म्हणे जेवीं चंदनांतील आळी । न चढे निढळीं देवाचियां ॥ ४ ॥

४४२६. तुटे मायाजाळ विघडे भवासिंधू । जरि लागे छंदु हरिनामें ॥ १ ॥ येर कर्म धर्म करितां ये काळीं । माजी तरला बळी कोण सांगा ॥ २ ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ ३ ॥ न साधवे योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ४ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान

कृष्णकथा ॥ ५ ॥ तुका म्हणे वर्म दावियेलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ६ ॥

४४२७. तुझें रूप पाहतां देवा । सुख झालें माझ्या जीवा ॥ १ ॥ हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥ २ ॥ जन्मोंजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥ ३ ॥ जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥ ४ ॥ तुका म्हणे भक्त । गोड गाऊं हरीचें गीत ॥ ५ ॥

४४२८. तुझे पाय माझें भाळ । एकत्रता सर्व काळ ॥ १ ॥ हेंचि देई विठाबाई । पांडुरंगे माझे आई ॥ २ ॥ नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ॥ ३ ॥ सदा संग सज्जनांचा । नको वियोग पंढरीचा ॥ ४ ॥ नित्य चंद्रभागे स्नान । करी क्षेत्रप्रदक्षण ॥ ५ ॥ पुंडलिक पाहोनि दृष्टीं । हर्षें नाचों वाळवंटीं ॥ ६ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । तुझें स्वरूप चंद्रभागा ॥ ७ ॥

४४२९. तुझें नाम मुखीं असो देवा । विनवितो राघवा दास तुझा ॥ १ ॥ तुझ्या नामबळें तरलें पतित । म्हणोनि माझें चित्त तुझें पायीं ॥ २ ॥ तुका म्हणे तुझें नाम हें सादर । गाता निरंतर सुख वाटे ॥ ३ ॥

४४३०. दो दिवसांचा पाहुणा चालसी उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ १ ॥ तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचितां । मग पंढरिनाथा भजसी केव्हां ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ ३ ॥

४४३१. देहीं असोनियां देव । वृथा फिरतो निर्दैव ॥ १ ॥ देव आहे अंतर्यामीं । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ २ ॥ नाभीं मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ ३ ॥ साखरेचें मूळ ऊंस । तैसा देहीं देव दिसे ॥ ४ ॥ दुधीं असतां नवनीत । नेणें तयाचे मथित ॥ ५ ॥ तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाहाना ॥ ६ ॥

४४३२. देवासी पैं भांडों एकचित्त करूनी । आम्हांसी सज्जनीं सांगितलें ॥ १ ॥ आम्हां काय आतां देवें आडोपरी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥ २ ॥ तोचि नांदो सदा हरि पैं वैकुंठीं । आम्हां देशवटी देवो सुखें ॥ ३ ॥ देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी

तो एकला राहो आतां ॥ ४ ॥ चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षे गाऊं गीत गोविंदाचें ॥ ५ ॥ तुका म्हणे सर्व देवाची नष्टाई । आम्हीं सुखें पाहीं डुलतसों ॥ ६ ॥

४४३३. देवा ऐसा शिष्य देई । ब्रह्मज्ञानी निपुण पाही ॥ १ ॥ जो का भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥ २ ॥ ऐशा युक्ति ज्याला बाणे । तैथें वैराग्याचें ठाणें ॥ ३ ॥ ऐसा झाला हो शरीरीं । तुका लिंबलोण करी ॥ ४ ॥

४४३४. देव आतां आम्ही केला असे ऋणी । आणिकां वांचूनि काय गुंता ॥ १ ॥ एकाचें आर्जव करूं एकनिष्ठ । आणिकांचा बोभाट कामा नये ॥ २ ॥ बहुतांचे आर्जव केलिया खटपट । नाहीं हा शेवट शुद्ध होत ॥ ३ ॥ पुरता विचार आणोनी मानसीं । अंतरलों सर्वांसी पई देखा ॥४॥ तुका म्हणे देवा चरणीं असो भाव । तेणें माझा जीव संतोषे हा ॥ ५ ॥

४४३५. दारिद्रानें विप्र पीडिला अपार । तया पोटीं पोर एक असे ॥ १ ॥ बाहेर मिष्टान्न मिळे एके दिशीं । घेऊनी छंदासी त्याचि बैसे ॥ २ ॥ क्षुधाकाळीं रडे देखिलें तें मागे । कांहीं केल्या नेघे दुजें कांहीं ॥ ३ ॥ सहज कौतुकें बोले बापमाये । देवापाशीं आहे मागशी तें ॥ ४ ॥ तेव्हां तुजलागीं स्मरे नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ५ ॥ लागली हे क्षुधा जात असे प्राण । काय हें निर्वाण पाहातोसी ॥ ६ ॥ ब्रह्मांडनायक विश्वाचा पाळक । वरी तिन्ही लोक पोसितोसी ॥ ७ ॥ प्राण हा उत्कर्ष जाहला विव्हळ । तेव्हां तो कृपाळ धांव घाली ॥ ८ ॥ सांडुनि वैकुंठ धांव घाली तई । आळंगिला बाहीं कृपावंतें ॥ ९ ॥ तुका म्हणे दिला क्षीराचा सागर । राहे निरंतर तयापासीं ॥ १० ॥

४४३६. दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ १ ॥ तयाचें चरित्र परिसा हो सादरें । करितों नमस्कार संत जनां ॥ २ ॥ मंगळवेढा असे वरि त कुटुंबेंसी । व्यापारी सर्वांसी मान्य सदा ॥ ३ ॥ कर्म काय करी ठाणाचा हवाला । तो कांहीं पडला कठिण काळ ॥ ४ ॥ धान्याचीं भांडारें होतीं तीं फोडिलीं । पंढरी राखिली दुष्काळांत ॥ ५ ॥ दुबळीं अनाथ तींही वांचविलीं ।

राष्ट्रांत ते झाली कीर्ति मोठी ॥ ६ ॥ मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठविली ॥ ७ ॥ अविंद्याचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ॥ ८ ॥ दामाजी पंतासि धरोनि चालविलें । इकडे या विठ्ठलें माव केली ॥ ९ ॥ विकते धारणे सवाईचें मोल । धान्याचें सकळ द्रव्य केलें ॥ १० ॥ दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त । लिहून खलेती मुद्रा केली ॥ ११ ॥ विठो पाडेवार भक्तां साह्य झाला । बेदरासी गेला रायापासी ॥ १२ ॥ जोहार मायबाप पुसती कोठिला । तंव तो म्हणे स्थळ मंगळवेढें ॥ १३ ॥ दामाजीपंतानीं रसद पाठविली । खलेती ओतिली अर्जदास्त ॥ १४ ॥ देखोनियां राजा संतोष पावला । म्हणे व्यर्थ त्याला तलब केली ॥ १५ ॥ काय तुझें नांव पुसती यंत्रधारी । तो म्हणे बेगारी विठा कीं जी ॥ १६ ॥ पावल्याचा जाब द्यावा मायबाप । करोनि घेतों माप म्हणती तें ॥ १७ ॥ पावल्याचा जाब दिधला लिहून । तसरीफ देऊन पाठविला ॥ १८ ॥ छत्री घोडा शिबिका आभरणांसहित । दिला सर्व दूत पाठवूनी ॥ १९ ॥ वाटे चुकामुक झाली याची त्यांची । ते आले तैसेचि मंगळवेढीं ॥ २० ॥ दामाजीपंतासी बेदरासी नेलें । राजा म्हणे झाले कवतुक ॥ २१ ॥ काल गेला विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दिला ॥ २२ ॥ काय तुमचें काज सांगा जी सत्वर । बोलाजी निर्धार वचनाचा ॥ २३ ॥ कैंचा विठा कोण पाठविला कधीं । काढोनिया आधीं जाब दिला ॥ २४ ॥ पाहातांचि जाब हृदय फुटलें । नयन निडारले राजा देखे ॥ २५ ॥ सांवळें सकुमार रूप मनोहर । माथां तेणें भार वाहियेला ॥ २६ ॥ दामाजीपंतासी रायें सन्मानिलें । तो म्हणे आपुलें कर्म नव्हे ॥ २७ ॥ आतां तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिणविलें सखया विठोबासी ॥ २८ ॥ निरोप घेऊनी आला स्वस्थळासी । उदास सर्वांसीं होतां झाला ॥ २९ ॥ दामाजीपंतांनीं सेविली पंढरी । ऐसा त्याचा हरि निकट वृत्ति ॥ ३० ॥ तुका म्हणे विठो अनाथ कैवारी । नुपेक्षी हा हरि दासालागीं ॥ ३१ ॥

४४३७. आतां आम्हां हेंचि काम । वाचे स्मरों रामराम ॥ १ ॥ ऐसी मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ २ ॥ अमृताची

खाणी । तये ठायीं वेंचूं वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जिवलगा ॥ ४ ॥

४४३८. आतां एक योग साधवा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥ १ ॥ जेणें योगें तुम्हां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ २ ॥ निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ॥ ३ ॥ परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ४ ॥ सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ५ ॥ हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणिक दर्शनें चाड नाहीं ॥ ६ ॥ घेऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ७ ॥ एकदोनी कर्में जाणोनियां वर्में । आपुलिया श्रमें राहूं आतां ॥ ८ ॥ कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ९ ॥ आत्मारामीं मन ठेवोनिया राहें । रामदासीं पाहे आपणेया ॥ १० ॥ तुका म्हणे राया धन्य जन्मक्षितीं । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ ११ ॥

४४३९. आतां मोकलावें नव्हे हें उचित । तरी कृपावंत म्हणवावें ॥ १ ॥ पूर्वी भक्त झाले सर्व अपंगिले । नाहीं उपेक्षिले तुम्हीं कोणीं ॥ २ ॥ माझिया वेळेसी कां गा लपलासी । विश्व पोसितोसी लपोनियां ॥ ३ ॥ करावी म्हणावी सर्वांभूतीं दया । तरी भेटावया येईन मी ॥ ४ ॥ तरी माझे हातीं देई मनबुद्धि । जरि दयानिधि येशिल तूं ॥ ५ ॥ तुका म्हणे तूंचि अवघा सूत्रधारी । माझी सत्ता हरी काय आहे ॥ ६ ॥

४४४०. आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप परत द्यावी ॥१॥ आपुला मंत्र नव्हे बरा । माझा बइल चुकला मोरा ॥ २ ॥ तुका म्हणे ऐशा नरा । परिस न झोंबे खापरा ॥ ३ ॥

४४४१. आपुलिया ऐसें करी । संग धरी ज्याचा हो ॥ १ ॥ म्हणउनि परपरते । वरवर तें पळतसें ॥ २ ॥ लोभिक तें लोभा लावी । बांधल्या गोवी वाचूनी ॥ ३ ॥ तुका म्हणे नामगोठी । पुरे भेटी तुझी देवा ॥ ४ ॥

४४४२. आधीं कां मज लावियेली सवें । आतां न राहावें तुजविण ॥ १ ॥ पाहिलेंचि तोडक कां गा नाहीं केलें । आतां उपेक्षिलें

न सोडीं मीं ॥ २ ॥ कृपेच्या सागरा न पाहें निर्वाण । झालों तुजवीण कासावीस ॥ ३ ॥ तुका म्हणे कोठें गुंतलेती हरी । येई झडकरी पांडुरंगा ॥ ४ ॥

४४४३. आतां हे विनवणी प्रधान अष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥ प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुम्हांपाशीं ॥ २ ॥ मुजूमूचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ ३ ॥ पेशवे सुरनिस चिटनिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ४ ॥ भूषण पंडितराय विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ५ ॥ पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनी । विवंचोनी श्रवणीं घाला तया ॥ ६ ॥ सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ७ ॥ यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वायां जाऊं नेदा ॥ ८ ॥ भिडेसाठीं बोला गाळूनी अर्थातें । अनर्थकारी तुमतें होईल तेणें ॥ ९ ॥ तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां । सांगणें ते राया पत्र माझें ॥ १० ॥

४४४४. आतां नेम जाला । याच कळसी विठ्ठला ॥ १ ॥ हातीं न धरीं लेखणी । काय भुसकट ते वाणी ॥ २ ॥ जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥ ३ ॥ तुका म्हणे घाटी । चाटूं कोरडा शेवटीं ॥ ४ ॥

४४४५. अखंडकर्मा कर्मप्रकाशका । मजसाठीं कां रे झालासी मुका । धर्माधर्मप्रतिपालका । सर्वचाळका सर्वातीता ॥ १ ॥ न देखसी वर्णाश्रममर्यादा । त्याचा सर्वस्वें करिसी कामधंदा । कधीं न लाजसी तूं गोविंदा । कां रे मुकुंदा बोल आतां ॥ २ ॥ मत्स्यकूर्मादि अवतारांसाठीं । श्रमले असतील जगजेठी । करितां घडामोड सृष्टी । झालासी कष्टी काय जाणें ॥ ३ ॥ किती म्यां विनवावें श्रीपती । पुन्हां पुन्हां यावें काकुळती । पुरे आतां तुझी संगति । करुणामूर्ति काय झालें ॥ ४ ॥ काय म्यां तुजसी करावें आतां । का रे कोपलासी पंढरीनाथा । सकळ दुःखनिवारिता । पावन पतिता तुका म्हणे ॥ ५ ॥

४४४६. अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधाचा घुमारा । अवचित भरला वारा । या मल्हारी देवाचा ॥ १ ॥ शुद्धसत्वाचा कवड

मोठा । बांधबिरडें बांधला गांठा । गळां वैराग्याचा पट्टा । वाटा दावूं भक्तीच्या ॥ २ ॥ हृदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें । ज्ञानभंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥ लक्ष चौऱ्याशीं घरें चारी । या जन्माची केली वारी । प्रसन्न झाला देव मल्लारी । सोहं-भावीं राहिलों ॥ ४ ॥ या देवाचे भरतां वारें । अंगीं प्रेमाचें फेपरें । गुरगुरू करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें ॥ ५ ॥

४४४७. अनाथाचा सखा ऐकिला प्रताप । होसी कृपावंत मजवरी ॥ १ ॥ माझिया गा चित्त करीं शिकवण । जेणें तुझे चरण जोडतील ॥ २ ॥ जोडोनिया कर येतों काकुलती । रखुमाईच्या पति कृपावंता ॥ ३ ॥ हरुषें निर्भर करीं माझें मन । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ ४ ॥ तुझे भेटीविण जन्म गेला वायां । भजन कराया शक्ति नाहीं ॥ ५ ॥ न घडे तुझी सेवा न घडे पूजन । जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ॥ ६ ॥ तुका म्हणे हरि करावें या काय । भजनासी साह्य होई बापा ॥ ७ ॥

४४४८. अतित्याई देतां जीव । नये कींव देवासी ॥ १ ॥ थोड्यासाठीं राग आला । जीव दिला गंगेंत ॥ २ ॥ त्यासि परलोकीं नाहीं मुक्ति । अधोगति चुकेना ॥ ३ ॥ तुका म्हणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारती ॥ ४ ॥

४४४९. अगा ये मधुसूदना माधवा । अगा ये कमळापति यादवा । अगा श्रीधरा केशवा । अगा बांधवा द्रौपदीच्या ॥ १ ॥ अगा विश्वव्यापका जनार्दना । गोकुळवासी गोपिकारमणा । अगा गुणनिधि गुणनिधाना । अगा मदना कंसाचिया ॥ २ ॥ अगा सर्वो-त्तमा सर्वेश्वरा । गुणातीता विश्वंभरा । अगा निर्गुण निराकारा । अगा आधारा दीनाचिया ॥ ३ ॥ अगा उपमन्यु सहाकारा । अगा शयना फणिवरा । अगा काळकृतांत असुरा । अगा अपारा अलक्षा ॥ ४ ॥ अगा वैकुंठनिवासा । अगा अयोध्यापति राजहंसा । अगा ये पंढरीनिवासा । अगा सर्वेशा सहज रूपा ॥ ५ ॥ अगा परमात्मा परमपुरुषा । अगा अव्यया जगदीशा । अगा कृपाळुवा आपुल्या दासा । तोडीं भवपाशा तुका म्हणे ॥ ६ ॥

४४५०. अगा पंढरीराया । वेगीं येई तूं सावया ॥ १ ॥ दीन-

ंधु तुझें नाम । देईं आपुलें आम्हां प्रेम ॥ २ ॥ जीवनकळा तूं
विश्वाची । तूंचि माउली अनाथाची ॥ ३ ॥ तुका म्हणे पुंडलिका ।
ठेवीं मस्तकीं पादुका ॥ ४ ॥

४४५१. अखंड क्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार
उघडिलें । सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटिलें भक्तांचिया
। १ ॥ अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडलें सहज ।
परम निर्वाणाचें बीज । गुंडाळिलें निज सर्व भाग्यें ॥ २ ॥ मंत्र
महामंत्र मंगळनिधि । सत्संग दर्शनें प्रगटलें आधीं । वैराग्यविवेकाची
बुद्धि । नामामृत सिद्धि साधिलें तें ॥ ३ ॥ क्षमा दया शांतीचें
निजसुख । सच्चित्सुखें बोलिला पुंडलिक । अनंत सुखाचा हरिख ।
उगवला देख पंढरिये ॥ ४ ॥ नेणें भवभक्तीची निरपेक्षता । नेणें
भूतदयेची ममता । तुका म्हणे पंढरीनाथा । संग साधुसंतां देईं
आतां ॥ ५ ॥

४४५२. आले सुरवर नाना पक्षी झाले । सकळ अवतरलें श्वापद-
वेषें ॥ १ ॥ श्वानखररूपी होउनियां आले । उच्छिष्ट कवळ वेंचि-
ताती ॥ २ ॥ होउनियां दीन हात पसरिती । मागोनियां घेती
उष्टावळी ॥ ३ ॥ अभिमान आड घालोनि बाहेरी । तयां म्हणे हरी
प्यारे धणी ॥ ४ ॥ तुका म्हणे धणी लाधली अपार । तया सुखा
पार काय सांगों ॥ ५ ॥

४४५३. आम्ही हरिचे हरिचे । शूर कळिकाळा यमाचे ॥ १ ॥
नामघोष बाण साचे । भाले तुळसीमंजरीचे ॥ २ ॥ आम्ही हरिचे
हरिचे दास । कळिकाळावरी घालूं कास ॥ ३ ॥ आम्ही हरिचे हरिचे
दूत । पुढें पळती यमदूत ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्हांवरी । सुदर्शन
घरटी करी ॥ ५ ॥

४४५४. आम्हीं आलों गांवगुंड । अवघ्या पुंड भूतांसी ॥ १ ॥
दुसरें तें खेळों आलें । एका बोलें तो मियां ॥ २ ॥ अवघियांचा
घेऊं लाग । नेंदू अंग शिवाय ॥ ३ ॥ तुका म्हणे खुंदूं नाद । चिंतूं
वाद सर्तीनें ॥ ४ ॥

४४५५. आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम ॥ १ ॥
आयुष्य मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ २ ॥ अमृताची

खार्णी । याचे ठायीं वेंचू वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवाच्या जिवलगा ॥ ४ ॥

४४५६. आमुचे दंडवत पायांवरी डोई । व्हावें उतराई ठेवूनियां ॥ १ ॥ कराल तें कांहीं नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडियां ॥ २ ॥ तुका म्हणे आम्ही लडिवाळें अनाथें । म्हणोनि दीनानाथें सांभाळावें ॥ ३ ॥

४४५७. आपुल्या पोटासाठीं । करी लोकांचिया गोष्टी ॥ १ ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि हरी ॥ २ ॥ पोटा घालीं अन्न । न म्हणे पतितपावन ॥ ३ ॥ मी कोठिल आणि कोण । हें न कळे ज्या लागून ॥ ४ ॥ तुका म्हणे नरस्तुति । करितों भाट त्रिजगतीं ॥ ५ ॥

४४५८. उपजला प्राणी न राहे संसारीं । बैसला शेजारीं काळ उभा ॥ १ ॥ पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका । तैसा काळ लोकां नेत असे ॥ २ ॥ खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहे । कसाबाची गाय वांचे कैसी ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हां न ये ॥ ४ ॥

४४५९. उधानु काटीवरी चोपडूची आस । नवरा राजस मिरवतसे ॥१॥ जिव्हाळ्याच्या कांठीं उबाळ्याच्या मोठा । नवरा चोहटा मिरवतसे ॥ २ ॥ तुळशीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐशी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडविला ॥ ४ ॥

४४६०. उदार कृपाळ पतितपावना । ब्रिदें नारायणा जाती वायां ॥ १ ॥ वर्णिताती श्रुति नेणें तुझा पार । राहे मौनाकार नेति ऐसें ॥ २ ॥ तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोढवलें ॥ ३ ॥ कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी द्यावी तुज ॥ ४ ॥ तुका म्हणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मत उडी घालीं ॥ ५ ॥

४४६१. उच्चारूं यासाठीं । आम्हीं नाम तुझें कंठीं ॥ १ ॥ येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंते ॥ २ ॥ पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ॥ ४ ॥

४४६२. अनाथांचा नाथ पतितपावन । दीनाचें रक्षण करीतसे ॥ १ ॥ ऐसें जाणोनियां नामीं विश्वासलों । भीमातीरा आलों धांवतचि ॥ २ ॥ स्नान हे करितां त्रिताप निवाले । महाद्वारा आलें मन माझें ॥ ३ ॥ तेथें अणुमात्र रीग नव्हे याचा । परतलों साचा तेथूनियां ॥ ४ ॥ पुंडलिकापाशीं येऊनि पुसलें । चिन्मय दाटले जनार्दन ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां दुजा धर्म नाहीं । बाप तरी आई तोचि विठो ॥ ६ ॥

४४६३. अपराध झाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ १ ॥ तुझें लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पहावी कवणाची ॥ २ ॥ मायबाप माझा रुक्मादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोणे गोष्टीचें संकट । न घालीं मज भेट नारायणा ॥ ४ ॥

४४६४. एकली वना चालली राना । चोरुनि जना घराचारी ॥ १ ॥ कोणी नाहीं संगीसवें । देहभावें उदास ॥ २ ॥ जाउनि पडे दुर्घट वनीं । श्वापदांनीं वेढिली ॥ ३ ॥ मार्ग न चले जातां पुढें । भय गाढें उदेलें ॥ ४ ॥ मागील मागें अंतरलीं । पुढील चाली खोळंबा ॥ ५ ॥ तुका म्हणे चिंती यासी । हृदयस्थासी आपुल्या ॥ ६ ॥

४४६५. ऐसा मी अपार पार नाहीं अंत । परि कृपावंत भाविकांचा ॥ १ ॥ दुर्जना चांडाळां करीं निर्दाळण । करीं संरक्षण अंकिताचें ॥ २ ॥ भक्त माझे सखे जिवलग सांगाती । सर्वांग त्यांप्रती वोडवीन ॥ ३ ॥ पीतांबरछाया करीन त्यावरी । सदा त्यांचे घरीं दारीं उभा ॥ ४ ॥ माझे भक्त मज सदा जे रातले । त्यां घरीं घेतलें धरणें म्यां ॥ ५ ॥ काठें हें वचन ठेविलें ये वेळे । तुका म्हणे डोळे झांकियले ॥ ६ ॥

४४६६. एकमेकीं घेतीं थडका । पाडी धडका देऊनी ॥ १ ॥ एकमेकां पाठीवरी । बैसोनी करिती टवाळी ॥ २ ॥ हात हात हाणे लाहीं । पळतां घाई चुकविती ॥ ३ ॥ तुका म्हणे लपणी चपणी । एका हाणी पाठीवरी ॥ ४ ॥

४४६७. एक प्रेमगुज ऐकें जगजेठी । आठवली गोष्टी सांगतसें

॥ १ ॥ एक मृगी दोन्ही पाडसांसहित । आनंदें चरत होती वनीं ॥ २ ॥ अवचितां तेथें पारधी पातला । घेउनियां आला श्वानें दोन्ही ॥ ३ ॥ एकीकडे त्याणें चिरल्या वाघुरा । ठेविलें श्वानपुत्रां एकीकडे ॥ ४ ॥ एकीकडे तेणें वोणवा लाविला । आपण राहिला एकीकडे ॥ ५ ॥ चहूंकडोनियां मृगें वेढियेलीं । स्मरों तीं लागलीं नाम तुझें ॥ ६ ॥ रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा । देवांचिया देवा पावें आतां ॥ ७ ॥ कोण रक्षी आतां ऐशिये संकटीं । बापा जगजेठी तुजविण ॥ ८ ॥ आइकोनि तुम्ही तयांचीं वचनें । कृपाअंतःकरणें कळवळिलां ॥ ९ ॥ आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी । वेगीं पावकासी विझवावें ॥ १० ॥ ससें एक तेथें उठवुनि पळविलें । तया पाठीं गेलीं श्वानें दोन्ही ॥ ११ ॥ मृगें चमकोनी सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलें म्हणोनियां ॥ १२ ॥ ऐसा तूं कृपाळु दयाळू आहेसी । आपुल्या भक्तांसी जीवलग ॥ १३ ॥ ऐसी तुझी कीर्ति जीवीं आवडली । रखुमाईच्या पती तुका म्हणे ॥ १४ ॥

४४६८. एक ते गाढव मनुष्याचे वेष । हालविती पुंस पुढें दाढी ॥ १ ॥ निंदा हें भोजन जेवण तयांसी । जोडी घरीं रासी पातकांच्या ॥ २ ॥ तुका म्हणे सुखें बैसोनियां खाती । कुंभिपाकीं होती नर्कवासी ॥ ३ ॥

४४६९. उभय भाग्यवंत तरीच समान । स्थळी समाधान तरीच राहे ॥ १ ॥ युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा । सांचवणी जळापरी नाश ॥ २ ॥ लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ । नांवाचा पालट दगड खरा ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघे विनोदाचे ठाव । एकात्मक भाव नाहीं तेथें ॥ ४ ॥

४४७०. करोनि स्नान आणि देवधर्म । क्रिया नित्य नेम तुजसाठीं ॥ १ ॥ तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळही व्रतें तुजलागीं ॥ २ ॥ सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडसी प्रीतीं नारायणा ॥ ३ ॥ तुका म्हणे याहो पवित्राच्या राया । प्राणविसाविया पांडुरंगा ॥ ४ ॥

४४७१. कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ॥१॥ शंखचक्रगदा कमळमंडित । आयुधें मंडित कृष्णाबाई ॥२॥ क्षण

एक धीर होत नाहीं चित्ता । केव्हां पंढरीनाथा भेटशील ॥३॥ तुका म्हणे हेंचि करीं देई क्षेमा । तईच विश्रामा पावईन ॥ ४ ॥

४४७२. कवण दिस येईल कैसा । न कळे संपत्तीचा भरंवसा ॥ १ ॥ चौदा चौकडिया लंकापति । त्याची कोण झाली गति ॥ २ ॥ लंकेसारिखें भुवन । त्याचे त्यासी पारखें जाण ॥ ३ ॥ तेहतीस कोटी बांदवडी । राज्य जातां नलगे घडी ॥ ४ ॥ ऐसें अहंतेनें नाडिले । तुका म्हणे वायां गेले ॥ ५ ॥

४४७३. ओले मातीचा भरवंसा । कारे धरिशी मानसा ॥ १ ॥ डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरक्या झाले ॥ २ ॥ नाक सरळ चांगलें । येऊन हनुवटीं लागलें ॥ ३ ॥ तुका म्हणे आलें नाहीं । तंव हरिला भज रे कांहीं ॥ ४ ॥

४४७४. ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची ॥ १ ॥ नहों केविलवाणें नाहीं आम्ही दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ २ ॥ पांडुरंग आम्हां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ ३ ॥ तुझी भेट घेणें काय हें मागणें । आशेचें हें शून्य केलें आम्हीं ॥ ४ ॥ निराशेचा गांव दिधला आम्हांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ ५ ॥ पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तैसें आम्हीं विठोमाजी नांदों ॥ ६ ॥ विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझेंही तयामाजी ॥ ७ ॥ तुजही विठ्ठल ऐसेंचि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ८ ॥ सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ९ ॥ बहुतां ठायीं वृत्ति । चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ १० ॥ तुका म्हणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥ ११ ॥

४४७५. कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें । तेणें हातां आलें हरीदास्य ॥ १ ॥ रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामन भगवंतीं ॥ २ ॥ ऐसिया प्रेमळा म्हणताती वेडा । संसार रोकडा बुडविला ॥ ३ ॥ एकवीस कुळें जेणें उद्धारिलीं । हे तो न कळे झोली भाग्यमंदा ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याचें पायधुळी मिळे । भवभय पळे वंदितांचि ॥ ५ ॥

४४७६. कैसी करूं तुझी सेवा । ऐसें सांगावें जी देवा । कैसा

आणूं अनुभवा । होसी ठावा केशापरी ॥ १ ॥ कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान । नाहीं इंद्रियांसी दमन । नव्हे मन एकविध ॥ २ ॥ नेणे यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार । मज नाहीं संताचा आधार । नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥ न सुटे माया जाळ । नाहीं वैराग्याचें बळ । न जिंकवती सबळ । काम क्रोध शरीरीं ४ ॥ आतां राख कैसें तरी । मज नुपेक्षावें हरी । तुम्हीं ब्रीदें चराचरीं । तैसीं साच करी तुका म्हणे ॥ ५ ॥

४४७७. कीर्तनाचा विकरा मातेचें गमन । भाड खाई धन विटाळ तो ॥ १ ॥ हरिभक्ताची माता हे हरिगुण कीर्ति । इजवर पोट भरिती चांडाळ ते ॥ २ ॥ अंत्यज हा ऐसें कल्पांतीं करीना । भाड हे खाईना जननीची ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचें दर्शनही खोटें । पूर्वजांसी नेटें नरका धाडी ॥ ४ ॥

४४७८. किती लाजिरवाणा । मरे उपजोनि शहाणा ॥ १ ॥ एका घाई न करीं तुटी । न निघे देवासोई भेटी ॥ २ ॥ सोसूनि आबाळी । घायाळ तें ढुंग चोळी ॥ ३ ॥ सावध करी तुका । म्हणे निजले हो आइका ॥ ४ ॥

४४७९. किडा अन्नाचें माणूस । त्याचा म्हणविल्या दास ॥ १ ॥ तेही त्यासी उपेक्षीना । बोल आपुला सांडिना ॥ २ ॥ तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वंभर । तुज वर्णी फणीवर ॥ ४ ॥

४४८०. कासयासी व्यर्थ घातले संसारीं । होतें तैसें जरी तुझे चित्तीं ॥ १ ॥ तुझिये भेटीची थोर असे आस । दिसोनी निरास आली मज ॥ २ ॥ आतां काय जिणें झालें निरर्थक । वैकुंठनायक भेटेचि ना ॥ ३ ॥ आडलासी काय कृपेच्या सागरा । रखुमादेवीवरा सोइरिया ॥ ४ ॥ तुका म्हणे देई चरणाची सेवा । नुपेक्षी केशवा मायबापा ॥ ५ ॥

४४८१. काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ १ ॥ काशी देह विटंबणें द्वारके जाळणें । पंढरीसी होणें ब्रह्मरूप ॥२॥ तुका म्हणे असो अथवा नसो भाव । दर्शनें पंढरीराव मोक्ष देतो ॥ ३ ॥

४४८२. काय मागें आम्ही गुंतलों काशानीं । पुढें वाहो मनीं धाक देवा ॥ १ ॥ कीर्ति चराचरीं आहे तैशी आहे । भेटोनियां काय द्यावें आम्हां ॥ २ ॥ घेऊनी धरणें बैसती उपवासी । हट आम्हांपासी नाहीं तैसा ॥ ३ ॥ तातडी तयांनीं केली विटंबना । आम्हां नारायणा काय उणें ॥ ४ ॥ नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा । जीवभाव आमुचा देऊं तुज ॥ ५ ॥ तुका म्हणे काय मानेल तें आतां । तूं घेई अनंता सर्व माझें ॥ ६ ॥

४४८३. काय पाहातोसी कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ १ ॥ नामाचा प्रताप ब्रिदाचा बडिवार । करावा साचार नारायणा ॥ २ ॥ कलीमाजी देव बौद्धरूप झाला । जगाचिया बोला लागूं नका ॥ ३ ॥ माय पुत्रा काय मारूं पाहे कळी । जगाची ढवाळी काय काज ॥ ४ ॥ तुका म्हणे याहो कृपेच्या सागरा । रुकुमादेवीवरा मायबापा ॥ ५ ॥

४४८४. कां रे दाटोन होतां वेडे । देव आहे तुम्हांपुढें ॥ १ ॥ ज्यासी पाठ नाहीं पोट । करी त्रैलोक्याचा घोंट ॥ २ ॥ तुमची तुम्हां नाहीं सोय । कोणाचें बा काय ॥ ३ ॥ तुका गातो नामीं । तेथें नाहीं तुम्ही आम्ही ॥ ४ ॥

४४८५. कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ वस्ति क्षीरसागरवासी । आला उभा पंढरीसी ॥ २ ॥ भक्ति देखोनि निकट । देवें सोडियेलें वैकुंठ ॥ ३ ॥ तुका म्हणे बळी । तूंचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

४४८६. कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलीया नाहीं गर्भवास ॥ २ ॥ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ ३ ॥ कामातुर जैसा भय लज्जा सांडोनि । आवडे कामिनी सर्वभावें ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

४४८७. काम क्रोध पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥१॥ नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥

आतां कैंचा मज सखा नारायण। गेला अंतरोन पांडुरंग ॥ ३ ॥ तुका म्हणे व्यर्थ मोलाचे शरीर। गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

४४८८. नाहीं संसाराची चाड। गाऊं हरिचें नाम गोड ॥ १ ॥ हो कां प्राणाचाही घात। परि हा न सोडीं अनंत ॥ २ ॥ जन्मोजन्मीं हाचि धंदा। संतसंग राहो सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव। तो हा जाणा पंढरीराव ॥ ४ ॥

४४८९. नाहीं संतांशीं शरण। काय वाचोनी पुराण ॥ १ ॥ म्हणे विठ्ठलाचा दास। देखोनी परनारीस हांसे ॥ २ ॥ करिती विठोबाची भक्ति। दयाधर्म नाहीं चित्तीं ॥३॥ तेथें नाहीं माझा देव। व्यर्थ श्रमवी हा जीव ॥ ४ ॥ अंगीं नाहीं क्षमा दया। म्हणती भेट पंढरीराया ॥ ५ ॥ नाहीं धर्माची वासना। काय करोनी प्रदक्षिणा ॥ ६ ॥ ऐसें नव्हे भक्तिवर्म। तेथें नाहीं माझा राम ॥ ७ ॥ नये कृपा कांहीं केल्या। नये घाम जीव गेल्या ॥ ८ ॥ जैसी खड्गाची धार। विठ्ठलचरणीं तुका शूर ॥ ९ ॥

४४९०. नाहीं रिकामीक परि वाहे मनीं। तया चक्रपाणी साह्य होय ॥ १ ॥ उद्वेग जिवासी पंढरीचें ध्यान। तया नारायण साह्य करी ॥ २ ॥ शरीरासी बळ नाहीं स्वता भाव। तया पंढरीराव साह्य करी ॥३॥ असो नसो बळ राहे पराधीन। तरी अनुमान करूं नका ॥ ४ ॥ तुका म्हणे येणें करोनी चिंतन। तया नारायण जवळीक ॥ ५ ॥

४४९१. नामाचा डांगोरा फिरवीं घरोघरीं। म्हणा हरी हरी सर्व भावें ॥ १ ॥ नामें हरती कर्में वैकुंठीची पै वस्ति। संनिध श्रीपति सदोदित ॥ २ ॥ नामाचा महिमा बहुतां कळला। नामें उद्धरिला अजामेळ ॥३॥ गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती। नामेंचि श्रीपति पावलासे ॥ ४ ॥ तुका म्हणे नाम घेतां मुक्ति आहे। नामें सर्व पाहें आकळिलें ॥ ५ ॥

४४९२. नाम पावन पावन। त्याहूनि पवित्र आहे कोण ॥ १ ॥ शिव हालाहालें तापला। तोही नामें शीतल झाला ॥ २ ॥ शिवास नामाचा आधार। केला कळिकाळ किंकर ॥ ३ ॥ मरण झालें

काशीपुरीं । तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥ तुका म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोईरें ॥ ५ ॥

४४९३. नाम तारक भवसिंधु । विठ्ठल तारक भवसिंधु ॥ १ ॥ नामधारक तया अरि मित्र । समता त्यागुनिया क्रोधु ॥ २ ॥ नाम धारक तया । कदापि न घडे विषयाचा बाधु ॥ ३ ॥ ज्या नामें तरलें शुकादिक । नारद संत मुनिजन साधु ॥ ४ ॥ जाणूनियां जें नसरे । तें नेणती जैसा गज अंधु ॥ ५ ॥ सहज तुकया । नामचि जपतां स्वरूपीं वेधु ॥ ६ ॥

४४९४. नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें । घेती भले जन भले लोक ॥ १ ॥ लागलासे झरा पूर्ण नवनीतें । सेविलिया हित फार होय ॥ २ ॥ तुका म्हणे देवा केला बलात्कार । अंगा आलें फार महंतपण ॥ ३ ॥

४४९५. नव्हे निष्ठावंत तुज काय बोल । सेवेविण मोल मागतसें ॥ १ ॥ न घडे भजन शुद्धभावनिष्ठा । आपुल्या अदृष्टावरी बोल ॥ २ ॥ पूर्वी झाले भक्त असंख्य विरक्त । कामक्रोधअहंते निर्दाळिले ॥ ३ ॥ ऐसी अंगवण नाहीं मज देवा । करीतसे हेवा भेटावया ॥ ४ ॥ कृपा करोनियां पुरवीं असोसी । आपुल्या ब्रीदासी राखावया ॥ ५ ॥ तुका म्हणे एक बाळक अज्ञातें । त्यासी हे पोसितें मायबापें ॥ ६ ॥

४४९६. न म्हणे वो आम्ही आपुलेनि चित्तीं । निःशेष अतिप्रीति विषयीं तो ॥ १ ॥ खोटा तो विटाळ । म्हणोनि गावाळ सांडियेलें ॥ २ ॥ भांगतमाखूचा चित्ताचा आदर । कोरडें उत्तर चाटावें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हीं नव्हों फजितखोर । तुटीचा व्यापार करावया ॥ ४ ॥

४४९७. नरदेह वायां जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ १ ॥ सांडोनियां अहंभाव । वरीं भक्ति पूजीं देव ॥ २ ॥ थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥ ३ ॥ प्रल्हादातें तारी । तुका म्हणे कंठीं धरीं ॥ ४ ॥

४४९८. नको विद्या वयसा आयुष्य फारसें । नाहीं मज पिसें मुक्तीचेंही ॥ १ ॥ रामकृष्ण म्हणतां जावो माझा प्राण । हेंचि कृपा-

दान मागतसें ॥ २ ॥ नको धन मान न वाढो संतान । मुखीं नारायण प्राण जावा ॥ ३ ॥ तुका म्हणे दीन काकुलती येतों । तुज निरवितों पांडुरंगा ॥ ४ ॥

४४९९. नको येऊं लाजे होय तूं परती । भजों दे श्रीपती सखा माझा ॥ १ ॥ तुझे संगतीनें मोठा झाला घात । झालों मी अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥ तुका म्हणे रांडे घेईन काटीवरी । धनी सहाकारी राम केला ॥ ३ ॥

४५००. न कळे महिमा वेद मौनावले । जेथें पांगुळले मनपवन ॥ १ ॥ चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती । तेथें माझी मती कोणीकडे ॥ २ ॥ काय म्यां वानावें तुझ्या थोरपणा । सहस्रवदना वर्णवेना ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही बाळ तूं माउली । कृपेची साउली करीं देवा ॥ ४ ॥

४५०१. धरोनियां फरश करीं । भक्तजनांचीं विघ्नें वारी ॥ १ ॥ ऐसा गजानन महाराजा । त्याचे चरणीं हालो लागो माझा ॥ २ ॥ सेंदूर शमी बहु प्रिय ज्याला । तुरा दुर्वांचा शोभला ॥३॥ उंदिर असे जयाचें वहन । माथां जडितमुगुट पूर्ण ॥ ४ ॥ नागयज्ञोपवीत रुळे । शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ॥ ५ ॥ भावमोदक हरभरी । तुका भावें हे पूजा करी ॥ ६ ॥

४५०२. धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥ लावीन निशाण जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥ २ ॥ नामाचिया नौका करीन सहस्रवरि । नावाडा श्रीहरी पांडुरंग ॥ ३ ॥ भाविक हो येथें धरा रे आवांका । म्हणे दास तुका शुद्ध याती ॥ ४ ॥

४५०३. धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं । नैवेद्य हिरोनि खातो कृष्ण ॥ १ ॥ अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती । कोण तयांप्रति येईल आतां ॥ २ ॥ तुका म्हणे देव दाखवि विंदान । नैवेद्य खाऊन हांसों लागे ॥ ३ ॥

४५०४. धन्य झालों हो संसारीं । आम्ही देखिली पंढरी ॥ १ ॥ चंद्रभागे करूं स्नान । पुंडलीकाचें दर्शन ॥ २ ॥ करूं क्षेत्रप्रद-

क्षिणा । भेटूं संत या सज्जना ।। ३ ॥ उभे राहूं गरुडपारीं । डोळे भरुनी पाहों हरी ॥ ४ ॥ तुका म्हणे वाळवंटीं । महालाभ फुकासाठीं ॥ ५ ॥

४५०५. पाप ताप माझे गुणदोष निवारी । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥ १ ॥ काम क्रोध वैरी घालोनी बाहेरी । तूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥ करिशील तरी नव्हे काई एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥ समर्थासी काय आम्ही शिकवावें । तुका म्हणे यावें पांडुरंगा ॥ ४ ॥

४५०६. प्रपंचाची पीडा सोसितो अघोरी । जया क्षणभरी नाम नये ॥ १ ॥ नाम नाठवितो आत्मया रामाचें । धिग जिणें त्याचें भवा मूळ ॥ २ ॥ मूळ तें पापाचें आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ ३ ॥ स्मरण भजन नावडे जयासी । आंदणीया दासी यमदूता ॥ ४ ॥ चिंतन रामाचें न करी तो दोषी । एकांत तयासी बोलों नये ॥ ५ ॥ नये त्याचा संग धरूं म्हणे तुका । धरितां पातकां वाटेकरी ॥ ६ ॥

४५०७. पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार झाला । विठोबा भेटला निराकार ॥ १ ॥ भांवगिरिपाठारी वस्ति जाण केली । वृत्ति थिरावली परब्रह्मीं ॥ २ ॥ निर्वाण जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजीचें ॥ ३ ॥ सर्प विंचू व्याघ्र आंगासी झोंबले । पीडूं जे लागले सकळिक ॥ ४ ॥ दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका म्हणे ।। ५ ॥

४५०८. पंढरीस जाऊं म्हणती । यम थोर चिंता करिती ॥ १ ॥ या रे नाचों ब्रह्मानंदें । विठ्ठल नामाचिया छंदें ॥ २ ॥ धरिली पंढरीची वाट । पापें रिगालीं कपाट ॥ ३ ॥ केलें भीवरेचें स्नान । यमपुरीं पाडिलें खान ॥ ४ ॥ दुरोनि देखिली पंढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥ ५ ॥ दुरोनि देखिलें राउळ । हरुषें नाचति गोपाळ ॥ ६ ॥ तुका म्हणे नाहीं जाणें । अखंड पंढरीये राहणें ॥ ७ ॥

४५०९. पंढरीं पावन झालें माझें मन । आतां करूं ध्यान विठोबाचें ॥१॥ आतां ऐसें करूं नाम गाऊं गीतीं सुखाचा सांगाती

विठ्ठो करूं ॥ २ ॥ संग करूं त्याचा तो सखा आमचा । अनंता जन्माचा मायबाप ॥ ३ ॥ परतोनि सोई धरीं कां रे मना । विठ्ठल-चरणां घालीं मिठी ॥ ४ ॥ घातलीसे मिठी नाहीं भक्तिभाव । उदार पंढरीराव तुका म्हणे ॥ ५ ॥

४५१०. पंढरीची वारी जयाचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्याची ॥ १ ॥ दासाचा मी दास पोसणा डिंगर । आतां बहु फार काय बोलों ॥ २ ॥ जातीचें मी हीन न कळे भजन । म्हणोनि संतचरण इच्छितसें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज म्हणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ॥ ४ ॥

४५११. पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठ बंदरीं ॥ १ ॥ तया नाहीं आणखी येणें । सदा वैकुंठीं राहणें ॥ २ ॥ आला गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । यासि संदेह कल्पांतींही ॥ ४ ॥

४५१२. पंढरपुरीचें दैवत भजावें । काया वाचा जावें शरण त्या ॥ १ ॥ मनीं ध्यान करीं अहंता धरूनी । तया चक्रपाणी दूर ठेला ॥ २ ॥ मान अभिमान सांडुनियां द्यावे । अवघ्या नीच व्हावें तरी प्राप्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे हेंचि कोणासी सांगावें । सादर होऊनि भावें भजें देवा ॥ ४ ॥

४५१३. पंचाग्निसाधन करूं धुम्रपान । काय तीर्थाटन करूं सांग ॥ १ ॥ सांग कोणे देशीं आहे तुझें गांव । धेवोनियां धांव येऊं तेथें ॥ २ ॥ सांग कांहीं वृत्त कोण करूं व्रत । जेणें कृपावंत होसील तूं ॥ ३ ॥ वाटतें शेवटीं झालासी निष्ठुर । न देसी उत्तर तुका म्हणे ॥ ४ ॥

४५१४. पूर्वीं बहुतांचे केले प्रतिपाळ । तें मज सकळ श्रुत आहे ॥ १ ॥ अज अविनाश निर्गुण निरामय । विचारिलें काय त्यांचे वेळे ॥ २ ॥ तयांचिये वेळे होसी कृपावंत । माझाचि कां अंत पाहतोसी ॥ ३ ॥ नारद प्रल्हाद उपमन्यु धुरू । त्यांचा अंगीकार कैसा केला ॥ ४ ॥ अंबऋषीसाठीं गर्भवास झाले । कां गा मोक-लिलें कृपासिंधु ॥ ५ ॥ धर्माचें उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं । आणीक

सांकडीं किती एक ॥ ६ ॥ झालासी लुगडीं तया द्रौपदीचीं । न ये कां आमुची कृपा कांहीं ॥ ७ ॥ तुका म्हणे कां गा झालासी कठीण । माझा भाग सीण कोण जाणे ॥ ८ ॥

४५१५. पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनि अंधळा बराच मी ॥ १ ॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनि ठेवीं देवा ॥ २ ॥ अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहुनि मुका बराच मी ॥ ३ ॥ नको मज कधीं परस्त्रीसंगति । जनांतून माती उठता भली ॥ ५ ॥ तुका म्हणे मज अवघ्याचा कांटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ६ ॥

४५१६. पाण्या निघाली गुजरी । मन ठेविलें दो घागरीं । चाले मोकळ्या पदरीं । परी लक्ष तेथें ॥ १ ॥ वावडी उडाली अंबरीं । हातीं धरोनियां दोरी । दिसे दुरिच्या दुरी । परी लक्ष तेथें ॥ २ ॥ व्यभिचारिणी नारी । घराश्रम करी । परपुरुष जिव्हारीं । परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ तुका म्हणे असों । भलतिये व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं । चुकों नेदी ॥ ४ ॥

४५१७. पक्षीयांचे घरीं नाहीं सामुग्री । त्यांची चिंता करी नारायण ॥ १ ॥ आजगर जनावर वारुळांत राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥ २ ॥ चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही पिप्पालिकांची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ॥ ४ ॥

४५१८. पाहावा नयनीं विठ्ठलचि एक । कांहीं तरी सार्थक संसाराचें ॥ १ ॥ कोठें पाहों तुज कां गा लपालासी । कांहीं बोल मशीं नारायणा ॥ २ ॥ वाटतें उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वांचोनियां ॥ ३ ॥ नको ठेवूं मज आपणा वेगळें । बहुत कळवळे तुजलागीं ॥ ४ ॥ तुका म्हणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण ॥ ५ ॥

४५१९. पहावया तुझा जरी बोलें अंत । तरी माझे जात डोळे देवा ॥ १ ॥ स्तंभीं तुज नाहीं घातलें प्रल्हादें । आपुल्या आनंदें अवतार ॥ २ ॥ भक्ताचिया काजा झालासी सगुण । तुज नाहीं गुण रूप नाम ॥ ३ ॥ ऐसा कोण देवा अधम यातीचा । निर्धार

हा साचा नाहीं तुझा ॥ ४ ॥ तुका म्हणे बोलें कवतुकें गोष्टी। नेदी येऊं पोटीं राग देवा ॥ ५ ॥

४५२०. सकळ तीर्थांहुनि। पंढरी हे मुगुटमणि ॥ १ ॥ काय सांगों तेथिल शोभा। रमावल्लभ जेथें उभा ॥ २ ॥ न लभे व्रत-तीर्थदानीं। तें या विठ्ठलदर्शनीं ॥ ३ ॥ साधुसंत गाती नाम। सकळ भूतांचा विश्राम ॥ ४ ॥ तुका म्हणे स्तुती। करूं काय सांगों किती ॥ ५ ॥

४५२१. सकळ तीर्थांहुनि। पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥ धन्य धन्य पंढरी। जे मोक्षाची अक्षयपुरी ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव। तो हा माझा पंढरीराव ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगें स्पष्ट। दुजी पंढरी वैकुंठ ॥ ४ ॥

४५२२. सकळ हे माया नागवे कवणा। भांबाविलें जना दाही दिशा ॥ १ ॥ आशा तृष्णा दंभ लागलीं हीं पाठीं। नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ॥ २ ॥ काम क्रोध घरा लावितील आगी। निंदा हिंसा दोघी पळतां खाती ॥ ३ ॥ लाज पुढें उभी राहिली आडवी। ते करी गाढवी थोर घात ॥ ४ ॥ तुका म्हणे चिंता घाली गर्भ-वासीं। ओढोनियां पाशीं चहूंकडे ॥ ५ ॥

४५२३. सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल। तेणें गळां माळ घालूं नये ॥१॥ ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति। तेणें अंगीं विभूति लावूं नये ॥ २ ॥ जयासी न कळे भक्तीचें महिमान। तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ ३ ॥ ज्याचें मन नाहीं लागलें हातासी। तेणें प्रपं-चासी टाकूं नये ॥ ४ ॥ तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ति। तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

४५२४. सांडियेला गर्भ उबगोनी माउली। नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ १ ॥ उष्ण तान भूक पवाढिये आकांतीं। ओसंगा लाविती काय म्हूण ॥ २ ॥ सांद्याघरी शूळ मरणाचिये वाटे। अन्यायही मोठे केले साच ॥ ३ ॥ हातींचा हिरोनि घातला पाठीसी। तुका म्हणे ऐसी परी झाली ॥ ४ ॥

४५२५. शिकवणेसाठीं वाटते तळमळ। पुढें येईल काळ फोडों डोई ॥ १ ॥ तेव्हां त्यासी काय देशील उत्तर। मेळवूनि अंतर

ठवितोसी ॥ २ ॥ येथींचिया सोंगें भोरापियाचे परी । होईल तें दुरी शृंगारिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंट रागेलें कां ॥ ४ ॥

४५२६. शिव शक्ति आणि सूर्य गणपति । एकचि म्हणती विष्णूसही ॥ १ ॥ हिरा गार दोनी मानिती समान । राजस भजनें वायां जाती ॥ २ ॥ अन्य देवतांसी देव म्हणऊन । तामस जीवन तमो योग्या ॥ ३ ॥ वायां जायासाठीं केलासे हव्यास । अन्य देवतांस देवपण ॥ ४ ॥ आपुलिया मुखें सांगतसें धणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ५ ॥ धन्य ते वैष्णव भजती केशव । सात्विक हे जीव मोक्षा योग्य ॥ ६ ॥ तुका म्हणे मोक्ष नाहीं कोणापासीं । एका गोविंदासी शरण व्हा रे ॥ ७ ॥

४५२७. शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ १ ॥ दावी आचार सोंवळे । दंड कमंडलु माळे ॥ २ ॥ छाटी भगवी मानसीं । व्यर्थ म्हणवी संन्यासी ॥ ३ ॥ तुका म्हणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ४ ॥

४५२८. शेवटीची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥ १ ॥ काया वाचा मन । चरणीं असे समर्पण ॥ २ ॥ जीवपरमात्मा ऐक्यासी । सदा वसो हृदयेंसी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । कंठीं वसावें केशवा ॥ ४ ॥

४५२९. वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे थरथरा ॥ १ ॥ आयुष्य गेलें हें कळेना । स्मरा वेगें पंढरिराणा ॥ २ ॥ दांत दाढा पडिल्या ओस । हनुवटी भेटे नाकास ॥ ३ ॥ हात पाय राहिले कान । नेत्रां पाझर हाले मान ॥ ४ ॥ अंगकांति परतली । चिरगुटा ऐसी झाली ॥ ५ ॥ आड पडे जिव्हा लोटे । शब्द नये मुखा वाटे ॥ ६ ॥ लांब लोंबताती अंड । भरभरा वाजे गांड ॥ ७ ॥ तुका म्हणे आतां तरी । स्मरा वेगीं हरी हरी ॥ ८ ॥

४५३०. वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी देहाची ॥ १ ॥ नव द्वारें झाली मोकळीक । गांड सरली वाजती ॥ २ ॥ दंत दाढा गळे थुंका । लागे नाका हनुवटी ॥ ३ ॥ शब्द नये मुखावाटा ।

करिती चेष्टा पोरें तीं ॥ ४ ॥ तुका म्हणे अजून तरी । स्मरे श्रीहरि सोडवील ॥ ५ ॥

४५३१. माय बाप बंधु सोयरा सांगाती । तूंचि माझी प्रीति गण गोत ॥ १ ॥ शरण आलीं त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिले पतित असंख्यात ॥ २ ॥ इतर कोण जाणे पावले विश्रांति । न येतां तुजप्रति शरणागत ॥ ३ ॥ तयामध्यें मज ठेवीं नारायणा लक्ष्मीरमणा सोइरिया ॥ ४ ॥ तुका म्हणे देई दर्शनाचा लाभ जे पाय दुर्लभ ब्रह्मादिकां ॥ ५ ॥

४५३२. मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक । न कळे विवेक मज कांहीं ॥ १ ॥ सर्व बाजागिरी वाटती ही खरी । पाहतां येथें उरी कांहीं नाहीं ॥ २ ॥ आतां मज दुःख वाटतें अंतरीं । उपाय झडकरी सांग मज ॥ ३ ॥ पुढें कोण गति न कळे सर्वथा । तुझे पायीं माथा ठेवियेला ॥ ४ ॥ करणें तें करीं सुखें आतां हरी तुज म्यां निर्धारीं धरियेलें ॥ ५ ॥ स्वहित तें काय न कळे सर्वथा तारीं तूं अनंता तुका म्हणे ॥ ६ ॥

४५३३. माझें कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥ वाट पाहतसें कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ २ ॥ साच करीं हरी आपुली ब्रीदावळी । कृपेनें सांभाळ महाराजा ॥ ३ ॥ क्षमा करीं सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंगा ॥ ४ ॥ साह्य होसी तरी जाती साही वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ॥ ५ ॥ कृपा करोनि देई दया क्षमा शांती तेणें तुझी भक्ति लाभईल ॥ ६ ॥ माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा जरी कांहीं करुणा येईल तुज ॥ ७ ॥ तुका म्हणे मज कैसें आपंगा जी । आपुलेंसें करा जी पांडुरंगा ॥ ८ ॥

४५३४. सुखें सती इंद्रियें जाती । आणिक नेणें भाव भक्ति ॥ १ ॥ देवा हेचि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ॥ २ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

४५३५. माझिया जिवाचा मज निरधार । न करीं उत्तर जनांसवें ॥ १ ॥ आपुलें कारण साधो जी विचार । करावा ह

धीर धरूनियां ॥ २ ॥ काय करावीया आणिका या युक्ति । काय नव्हे भक्ति विठोबाची ॥ ३ ॥ एक पुढें गेले वाट दावूनिया । मारग तो वायां कोण सांडी ॥ ४ ॥ तुका म्हणे माझी विठोबासी चिंता । भेईना सर्वथा न घडे तें ॥ ५ ॥

४५३६. यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आम्हां दीनानाथें रक्षियेलें ॥ १ ॥ यम नेतां तुम्हां रक्षिल हे कोण । तुम्हां धन्य धन्य कोण म्हणती ॥ २ ॥ संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनी उत्तम स्थिति सांगितली ॥ ३ ॥ तेंचि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासी पापरी हाणे आतां ॥ ४ ॥

४५३७. येई गे विठ्ठले विश्वजीवनकळे । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ १ ॥ येई गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥२॥ नलगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ ३ ॥ तुका म्हणे धांव घाली कृष्णाबाई । क्षेम च्यहूंबाहीं देई मज ॥ ४ ॥

४५३८. विरचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥ युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेसी ॥ २ ॥ ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ ३ ॥ शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ॥ ४ ॥ व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनी मोकळा जालासी तूं ॥ ५ ॥ हा हेत लागला आमुचिये भेटीं । पत्रामाजीं गोष्टी हेचि थोर ॥ ६ ॥ याचें हें उत्तर एक गा भूपति । लिहिली विनंती हेताची हे ॥ ७ ॥ अरण्यवासी आम्ही फिरों उदासीन । दर्शनही हीन अमंगळ ॥ ८ ॥ वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ९ ॥ गेडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १० ॥ तुका म्हणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ ११ ॥

४५३९. वर्णाश्रम करिसी चोख । तरी तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥ परि तें तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें ॥ २ ॥ जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ ३ ॥ गासी तान

मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ४ ॥ जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ५ ॥ साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ६ ॥ तुका म्हणे देहीं । संत जाहाले विदेही ॥ ७ ॥

४५४०. वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भय मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन झालें तुझ्या ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे तुझे बडिवार । शिणला फणीवर वर्णवेना ॥ ४ ॥

४५४१. वाराणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतासी या ॥ १ ॥ येथूनियां आम्हां जाणें निजधामा । सवें असे आम्हां गरुड हा ॥ २ ॥ कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों माहेरीं तुका म्हणे ॥ ३ ॥

४५४२. लोहो परिसासीं रुसलें । सोनेंपणासी मुकलें ॥ १ ॥ येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥ गंगा आली आळशावरी । आळसी देखोनि पळे दुरी ॥ ३ ॥ गांवा खालील ओहळे । रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥ तुका केशवाचा दास । गुरूसीं न भजे शिष्य ॥ ५ ॥

४५४३. लाडें भाकितों करुणा । तूं रे उदारांचा राणा ॥ १ ॥ करिसी आमुचा सांभाळ । तूं रे माउली स्नेहाळ ॥ २ ॥ नाहीं चिंता रे आम्हांशीं । तूंचि भार चालविशी ॥ ३ ॥ आम्ही झालों उदासीन । तूंचि करिशी जतन ॥ ४ ॥ आम्हां नाहीं जीवनास । तूंचि पुरविशी आस ॥ ५ ॥ तुका म्हणे भलते सवें । जातां मागें मागें धांवें ॥ ६ ॥

४५४४. लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणें ॥ १ ॥ सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ॥ २ ॥ तैसा दृश्यभास नाढळेचि डोळां । प्रकाश सोहळा भोगीतसे ॥ ३ ॥ भोग भोग्य भोक्ता नाढळेचि कांहीं । चैतन्यविग्रहीं पूर्णकाम ॥ ४ ॥ तुका ब्रह्मानंदीं अहेतुक ब्रह्म । प्रपंचाचें बंड न देखे डोळां ॥ ५ ॥

४५४५. रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । कागासी लेपन कर्पूराचें

॥ १ ॥ निर्नासिका जैसा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शास्त्र-बोध ॥ २ ॥ दास तुका म्हणे विठ्ठल उदारें । अज्ञान अंधारें दूरी केलें ॥ ३ ॥

४५४६. राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडु-रंगा ॥ १ ॥ लक्ष्मीनिवासा पाहें दीनबंधु । तुझा लागो छंदू सदा मज ॥ २ ॥ तुझें नामीं प्रेम देई अखंडित । नेणें तप व्रत दान कांहीं॥ ३ ॥ तुका म्हणे माझें हेंचि गा मागणें । अखंडही गाणें नाम तुझें ॥ ४ ॥

४५४७. येऊनि संसारा काय हित केलें । आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥ १ ॥ विषय सेवितां कोण तृप्त झाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥ २ ॥ देखोनि मृगजल भांबावलीं वेडीं । विचाराची थडी न ठाकिती ॥ ३ ॥ ऐसिया जिवांसी सोय न लाविसी । निष्ठुर कां होसी कृपाळुवा ॥ ४ ॥ तुका म्हणे देवा अगाध पैं थोरी । सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ५ ॥

४५४८. षड्रसीं रांधिलें खापरीं घातलें । चोहटां ठेविलें मध्य-रात्रीं ॥ १ ॥ त्यासी सदाचारी लोक न शिवती । श्वानासीं निश्चितीं फावलें तें ॥ २ ॥ तैसें दुष्टकर्म झालें हरिभक्ता । त्यागिली ममता विषयासक्ति ॥ ३ ॥ इहपरलोक उभय विटाळ । मानिती केवळ हरिचे दास ॥ ४ ॥ तुका म्हणे देवा आवडे हे सेवा । अनुदिनीं व्हावा पूर्ण हेतु ॥ ५ ॥

४५४९. श्वानाचियापरी लोळें तुझ्या द्वारीं । भुंकों हरि हरि नाम तुझें ॥ १ ॥ भुंकों उठों बैसें नवजायें वेगळा । लुडबुडीं गोपाळा पायांपाशीं ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हां वर्म आहे ठावें । भागेन तें द्यावें प्रेमसुख ॥ ३ ॥

४५५०. यमधर्म आणिक ब्रह्मादिक देव । त्यांचा पूर्ण भाव तुझे पायीं ॥ १ ॥ करिती स्मरण पार्वतीशंकर । तेथें मी किंकर कोणी-कडे ॥ २ ॥ सहस्रमुखेंसी घोष फणिवराचा । मज किंकराचा पाड काय ॥ ३ ॥ चंद्र सूर्य आणि सर्व तारांगणें । करिती भ्रमण प्रद-क्षिणा ॥ ४ ॥ तुका म्हणे त्यांसी स्वरूप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ॥ ५ ॥

४५५१. यातिगुणें रूपें काय ते वानर । तयांच्या विचारें वर्ते राम ॥ १ ॥ ब्रह्महत्यारासी पातकी अनेक । तो वंद्य वाल्मीक तिहीं लोकीं ॥ २ ॥ तुका म्हणे नव्हे चोरीचा व्यापार । म्हणा रघुवीर वेळोवेळीं ॥ ३ ॥

४५५२. भोगीयेल्या नारी । तरी तो बाळ ब्रह्मचारी ॥ १ ॥ ऐसी ज्याचे अंगीं कळा । पार न कळे वेदाला ॥ २ ॥ बळी बळी थोर थोर । मोडोनियां केले चूर ॥ ३ ॥ वांकडी कुबजा । सरसी आणियेली वोजा ॥ ४ ॥ मल्ल रगाडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ॥ ५ ॥ जिवें मारियेला मामा । धांवे भक्ताचिया कामा ॥ ६ ॥ तुका म्हणे पूर्ण । दावीं भक्तीचीं विंदानें ॥ ७ ॥

४५५३. भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खिळिलें त्यासी ॥ १ ॥ समचरण असे विटे । कटीं कर उभें नीट ॥ २ ॥ वाळुवंटीं नाचती संत । प्रेमामृतें डुल्लत ॥ ३ ॥ तुका म्हणे पुंडलिका । भक्तिबळें तूंचि निका ॥ ४ ॥

४५५४. भीमातीरवासी । तेथें निश्चयेसी काशी ॥ १ ॥ मुख्य मुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपूर ॥ २ ॥ घडे भींवरेंसी स्नान । त्याशी पुनः नाहीं जन्म ॥ ३ ॥ भाव धरोनि नेटका । मोक्ष जवळी म्हणे तुका ॥ ४ ॥

४५५५. भीमातिरींचा नाटक । यानें लावियेलें चेटक ॥ १ ॥ मन बुद्धि झाली ठक । नेणें संसाराची टुक ॥ २ ॥ कैशी प्रासंगिक वाणी । प्रत्यादर कडसणी ॥ ३ ॥ तुका म्हणे मोठा ठक । जेथें तेथें उभा ठाके ॥ ४ ॥

४५५६. क्षीराब्धिवासा शेषशयना । लीलाविग्रहा गोपिकारमणा । सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुप्तरूपा ॥ १ ॥ अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपालका देवराया । हरीं भवभया भक्तांचिया ॥ २ ॥ सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसी सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचिना ॥ ३ ॥ चित्तचालका चैतन्यघना । भक्तकैवारी असुरमर्दना । भक्ताभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडु-

रंगा ॥ ४ ॥ ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता । अणुरेणुव्याप्यभरिता । पावनपतिता तुका म्हणे ॥ ५ ॥

४५५७. हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणा संसाराची ॥ १ ॥ माझा पति बहु लहानाचि आहे । खेळावया जाय पोरांसवें ॥ २ ॥ माझें दुःख जरी ऐकशील सई । म्हातारा तो बाई खोकतसे ॥ ३ ॥ खेळ सांजवरी बाहेरी तो राहे । वाट मी वो पाहें सेजेवरी ॥ ४ ॥ पूर्व पुण्य माझें नाहीं बाई नीट । बहु होती कष्ट सांगों काई ॥ ५ ॥ जवळ मी जातें अंगा अंग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो ॥ ६ ॥ पूर्व सुकृताचा हाचि बाई ठेवा । तुका म्हणे देवा काय बोल ॥ ७ ॥

४५५८. हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥ १ ॥ शांति दया अंतःकरणीं । रंगो रामनामीं वाणी ॥ २ ॥ मूळ द्वंद्वाचें विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी । आतां आपुलेंसें करीं ॥ ४ ॥

४५५९. होईं आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ॥ १ ॥ आठवुनी पाय राहिलों हृदयीं । निवारली तई सकल चिंता ॥ २ ॥ अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धींचि ॥ ३ ॥ तुका म्हणे झालें एकाचि वळण । कोलिया कीर्तन आराणूक ॥ ४ ॥

४५६०. हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अलंकारीं मिरवत ॥ १ ॥ देवाविण शब्द व्यर्थाचि कारण । भांड रंजवण सभेसी गा ॥ २ ॥ आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥ तुका म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ४ ॥

४५६१. हातीं धरिलियाची लाज । देवा असों दे गा तुज ॥ १ ॥ आहें अमंगळ दुर्बळ । होईं दीन तूं दयाळ ॥ २ ॥ बाळ शेंबडें मातेसी । काय नावडे तियेसी ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणें । करीन देहाचें सांडणें ॥ ४ ॥

४५६२. भ्रतारअंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तों सांगतां नये कोणा ॥ १ ॥ तथापि सांगणें कुमारिकेपाशीं । ते काय मानसी

सुख मानी ॥ २ ॥ तैसा आत्मबोध आधीं बोलों नये । बोलासी तो काय सांपडेल ॥ ३ ॥ तथापि सांगणें बहिर्मुखाशीं । तो काय संतोषासी मूळ होय ॥ ४ ॥ तुका म्हणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ॥ ५ ॥

४५६३. भवाचिया संगें बहुत नाडिले । कळिकाळें पाडिलें तोंडघसीं ॥ १ ॥ तया भवसंगें गुंतलासी वायां । धन पुत्र जाया भुलों नको ॥ २ ॥ जे जे घडी जाय ते ते काळ खाय । प्राण्या तरुणोपाय काय केला ॥३॥ तुका म्हणे करीं सर्वही तूं त्याग । अर्पी हें सर्वांग जगदीशीं ॥ ४ ॥

४५६४. भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥ १ ॥ उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ॥ २ ॥ येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ४ ॥

४५६५. भक्तिवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥ एक एक योनी कोटि कोटि फेरा । मनुष्यदेहवारा मग लागे ॥ २ ॥ वीस लक्ष योनि वृक्षांमाजी घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ ३ ॥ अक्रा लक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्षांमध्यें ॥ ४ ॥ तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवांभीतरीं चार लक्ष ॥५॥ तुका म्हणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

४५६६. भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योति । पंचप्राण जीवेंभावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ॥ २ ॥ काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहातां जाती ॥ ३ ॥ राही रखूमाई दोन्ही दोंबाहीं । मयूरपिच्छचामरें ढाळिती ठायीं ठायीं ॥ ४ ॥ तुका म्हणे दीप घेउनि उन्मनती शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ५ ॥



# वर्णानुक्रमणिका.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

| | अभंगाचा अंक. |
|---|---|


| | अभंगाचा अंक. |
|---|---|


| | अभंगाचा अंक. |
|---|---|

# शब्दार्थकोश.

कोशांत दिलेला शब्दाचा अर्थ कोणत्या अभंगांत आहे हें दाखविण्या करतां अर्थाचे पुढें अभंगाचा आंकडा दिला आहे.



शब्द — अर्थ

अ

अंक—शिक्का, चिन्ह १३३८
अकळ—न कळणारा ९३८
अकिंचन—दरिद्री, कंगाल.
अंकित—स्वाधीन, वश ११
अंकिला—स्वाधीन झालेला ७८४
अखई—अक्षय, अखंड २८८
अखतेसालीं—पुढलेवर्षी, पुढलेजन्मीं.
अखम—पंगु, दुबळा ३४९
अखय—अक्षय, नित्य ३४३
अखों—डोळे ४४७
अंगदट—बळकट
अंगना—स्त्री १४०
अगर—ठिकाण ५४१ शेत, साठा
अंगलग—जवळचे ३९२
अंगवणे—अप्राप्त, मुकणे
अंगवण—सामर्थ्य ४४९५
अगांतुक—न बोलावतां जेवायला आलेला ७३६
अंगार—राख ३९७६
अंगिसुनी—निश्चळ
अगुणा—निर्गुण, अवगुणी २१६
अंगुलें—अंगठी ३२१८
अंगुष्ट—आंगठा ११८५
अंगुळि—बोट ३४७८
अंगें—स्वतः १५५०
अंगेजणे—स्वीकारणें
अगोचर—न भासणारा ७०६

शब्द — अर्थ

अघाटित—न घडणारें १०६६ विलक्षण २३११
अघोर—एका नरकाचें नांव९६,३४५
बेफिकीर ७०२
अघोरजप—पिशाच्चमंत्राचा जप
अचळ—ओचा १११
अंजुळ—अंजुळी—ओंजळ २५६६
अटक—बाधक
अट्टहास—मोठा स्वर १४६६
अटी—हट्ट २७८४ अटकाव,
अट्टाहास्य—मोठा प्रयत्न १८९४
अठरा—अठरा पुराणें २५३९,२४६
अठोनी वेठोनी—पट्टदार, पिळदार ३१७४
अडकट—आडमार्ग, रान
अडबंद—कडदोरा २८९७
अडमोडी—आपल्या मतांचें प्रतिपादन
अडवंगी—कुमार्ग
अडसण—पाखडणें,निवड करणें २६१
अडांखा —धोरण, ताळा
अढळ—अविनाशपद ८६८
अणु—सूक्ष्म कण ३३९
अणुरेणु—सूक्ष्मकण २२०४
अंतर—अंतःकरण ११६८
अंतर देणें—सोडणे, त्यागणें १८३७
अंतरपाठ—पडदा ३६५३
अंतरणें—दुरावणें, मुकणें४८

शब्द अर्थ

अंतराय—विघ्न ४५७
अंतरें—दूर, अंतरावर
अंतर्वास—अंत:करणांत राहणें १७६१
अतित्याई—साहसकर्म अथवा त्रागा करणारा
अतित्याय—त्रागा २६५७
अतिथी—अगांतुक पाहुणा
अतिशय—अतिरेक, अत्याचार ५२५
अतीत—अतिथी, अगांतुक पाहुणा १०३/३ (पलिकडे) गेलेला १०४/२ पलीकडे १५९३ पलिकडला २१९८
अंतुरी—स्त्री २७७
अतुवट—गुह्य, गुज
अत्यंतीं—प्रत्यक्ष बारकाईनें पाहणें ३४८९
अत्यद्भुत—अतिशय चमत्कार
अंत्राळ—आकाश ४०८०
अदट—अदृष्ट २०८५
अधम—नीच ६२२
अधिकार—योग्यता ८१७
अधिर—उतावीळ, चंचल ७००
अधीलपणा—पूर्वस्वरूप १०४७ मुख्यपणा, श्रेष्ठत्व
अनन्य—एकनिष्ठ ६९
अनर्गळ—स्वच्छंद, स्वेच्छाचारी, १८५ प्रतिबंधराहित २२३६
अनाड—अज्ञानी, मूर्ख ३४८७
अनामिक—अंत्यज, चांडाळ ४०८
अनारिसा—वेगळा ७५०
अनु—दुसरें, मुळींच, किंचित देखील ३१४५
अनुताप—पश्चात्ताप १०७६

शब्द अर्थ

अनुपम्य—ज्याला उपमा अगर जोड नाहीं असा ८१
अनुपान—ज्यांत औषध घेतात तो औषधाला मदत करणारा पदार्थ ७२४
अनुमान—अनमान-संकोच, अनादर १४९३
अनुवाद—पुन: सांगणे २४२
अनुश्रुत—कोणीं न ऐकलेली २१३२
अनुसंधान—आख्यान, धोरण २८८३
अनुसरणें—मागे जाणे, भजणे ८३
अनुहात—कानांत बोटें घातलीं असतां ध्वनि निघतो तो २४६
अन्यो—अन्याय २९८४
अन्योन्यविण—गैरशिस्त ४०६५
अपरापरी—दुर्दशा, वाताहात ४०७८
अपसव्य—उलटी ७१५ डावा ३७८०
अपहार—अन्यायानें संपादन केलेले द्रव्य २९७४
अपुरती—अपरिपक्व, पोरकट १८७८
अबद्ध—अशुद्ध ८०९ वेडेवाकडे, संबंधराहित, १६१० अज्ञानी, अडाणी २५१३
अंबर—आकाश ८१ वस्त्र
अबला—स्त्री १२५
अंबा—देवी, आई ३४६७
अबाळी—फजिती, दुर्दशा २२०३
अबीर—बुक्का २५६५
अबोलणा—न बोलण्यासारखा १४१९
अभंग—न मोडणारी १००

| शब्द | अर्थ |
|---|---|
| अभंड | पुष्कळ, विपुल ३९८६ |
| अभिलाष | इच्छा |
| अभिनव | अपूर्व, नवीन १८४५ |
| अभूक | तृप्ति |
| अभ्यंतर | अंत:करण १६४७ |
| अमर | देव २४५१ |
| अमरावती | इंद्राची नगरी ४१९५ |
| अमुप | अपार १६ |
| अमृत | दूध ३०७३ |
| अमृतसंजीवनी | अद्वैतबोधरूपी जिवंत करणारें अमृत ३७८९ |
| अयाचित ( वृत्ति ) | कोणाजवळ कांहीं न मागणें ४०२० |
| अराणूक | तृप्ति ५८२ |
| अराले | वृत्ति स्थिर झालेले १८०७ |
| अर्जदास्त | लेखी अर्ज ४४३६ |
| अर्जिलें | मिळवलेलें ७८३ |
| अर्थ | धन १३० |
| अर्धांगी | पत्नी ७३३ |
| अर्भक | मूल २१८० |
| अलक्ष्य | दुर्लक्ष्य, लक्ष्यांत न येणारें |
| अलाप | गाण्यांतील तान १६६१ |
| अलिप्त | निराळा, कधीं न अडकणारा, संबंधरहित २१९८ |
| अल्ला | देव ३२९ |
| अवकळा | फजिती २६०, तेजोहीनता ४०० |
| अवगणी | सोंग १३३० |
| अवगणें | बाष्कळपणानें अगर स्वच्छंदीपणानें वागणें २७९९ ओळखणे |
| अवगति | अधोगति ४२८ |
| अवगुणी | दुर्गुण अंगीं असलेला ५१८ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| अवचित | एकाएकीं, न कळत ५१ |
| अवदान | बळी ७०० |
| अवधि | वेळ २७३ |
| अवलीला | सहज |
| अवलोकणे | पाहणें ४५६ |
| अवसरु | वेळ ४६३ |
| अवसान | धैर्य, हिंमत, ताकद, ४५८ वेळ, खंड, अंतर १५९४ |
| अवस्था | वेध ५९८ उत्कंठा, हुरहुर १०९ |
| अवज्ञा | तिरस्कार, अनादर २२६० |
| अविंद | यवन, मुसलमान ४४३६ |
| अविनाश | नाशरहित १० |
| अवो | अहो ८८१ |
| अव्हेर | त्याग, अनादर ५१६ |
| अव्हेरणें | त्याग करणें, दुर्लक्ष करणे २२८९ |
| अशुद्ध | रक्त ३१५७ |
| अशोभ | प्रपंच १९०३ न शोभणारें ९०३ |
| अशौच | अपवित्र स्थिति २५१३ |
| अष्टांग | (१) आठ अंगें:—दोन पायांचे आंगठे, गुडघे, तळहात, छाती व भाळ २१७९ (२) योगाचीं यमानियम वगैरे अष्टांगे ३९५८ |
| असट | आसक्त ३२९३ पातळ, बेचव |
| असमाई | असह्य ४०९० |
| असमान | आकाश ४२१० |
| असाके | आशीला ३२८ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| असार | असत्, खोटें ७११ निःसत्त्व |
| असावणें | आशा उत्पन्न होणें ८२९ |
| असिपत्र | तरवारीचें पान २६७१ |
| असूं | अश्रू, डोळ्यांतील पाणी ४६ |
| असोसी | अतृप्ती, हांव, उत्कंठा ४४९५ |
| अस्मान | आकाश २९१ |
| अहंता | मीपणा ३६३६ |
| अहंभाव | मीपणा, गर्व ७१ |
| अहर्निशीं | रात्रंदिवस २४८२ |
| अहिक्य | ऐक्य, एकी |
| अक्षई | न नाश पावणारीं, १०० |
| अक्षर | कूटस्थ ३५४ |
| अक्षवाणें | शुभ कार्यांत कल्यांस जो दिवे ओवाळायाचा संस्कार करितात तो १६२ |
| अक्षोभ | स्थिर, शांत ५१ |

**आ**

| शब्द | अर्थ |
|---|---|
| आइत | यत्न न करितां |
| आइती | रीत २७४२ तयारी १४० सामुग्री २८२ |
| आइतें | सामुग्री ९३० |
| आउटाविए पद | ब्रह्मस्वरूप ४०३५ |
| आऊं | येईन ११५ |
| आकळ | न कळण्याजोगा २२३ |
| आकळणें | स्वाधीन करणें ४०३६ |
| आकांत | आक्रोश ७० |
| आक्रंदणें | रडणें, आकांत करणें ७०४ |
| आंखों | डोळ्यानें ३२८ |
| आंगडें | अंगरखा ६२० |
| आगम | शास्त्र ४७८ |
| आगर | शेत, मळा २०२० |
| आगळ | पुढें ११६ |
| आगळा | अधिक, फार मोठा ३० |
| आगा | मोठा, श्रेष्ठ |
| आगोज | अगाध, भयंकर, मोठे ६६१ |
| आघवें | सगळें |
| आघात | तडाका, धक्का ११९ |
| आग्रो | आग्रह |
| आचपळ | खोडकर, अनावर ३४३ |
| आंचवणें | मुकणें |
| आचावाचा | वायफळ अथवा संबंधरहित वर्तन २८०३ |
| आचावाचें | बडबड |
| आचारिये | आचार्य जे संत १९०३ |
| आजिकालीची | अलीकडची, ह्या जन्माची |
| आट | हट्ट, त्रास ८९० हरकत |
| आटणी | खटाटोप, श्रम १५३२ जाच, त्रास १५३६ |
| आटल्या | मुक्या झाल्या ३८४८ |
| आटी | खटपट, यत्न ९८ श्रम ३६० |
| आडका | अर्धी पै १४५१ |
| आडणी | संकट, अडचणीची वेळ ८६८ |
| आडणें | संकटांत पडणें ४८२ |
| आडलिया | संकटांत सांपडलेल्याला ७२८ |
| आडाखा | तर्क, युक्ति १२३८ |
| आण | शपथ ७६८ |
| आणी | टोंक ६२० |
| आतळणे | स्पर्श करणें ३५७ |
| आतुडणें | प्राप्त होणें, मिळणें ७१२ सांपडणें ९४ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| आत्रितत्या | आततायी |
| आथिलें | असलेलें |
| आंदणी | तांब्यांत राहणारी, वाहिलेली, बक्षिस दिलेली ६९५ |
| आदा | प्राप्ति, जमा ३२७२ |
| आदिनाथ | शंकर २८६ |
| आधि | मानसिक व्यथा १५७० |
| आधिला | पहिला ३०२ |
| आधीन | स्वाधीन |
| आधील | पहिला २२ |
| आधोडी | अर्धे फाटलेले ४३५४ |
| आधोडीचे | लोभाचे |
| आन | दुसरें ७२४ |
| आनेरा | अन्य ११४ |
| आप | स्वत:चा १० |
| आपंगणें | आपला म्हणणें, प्रेमानें जवळ घेणें, संभाळणें, पोसणें १६३६ |
| आपटा | दसऱ्याचे दिवशीं सोनें म्हणून ज्याचीं पानें देतात तें झाड ४३७७ |
| आपदा | कष्टावस्था, आपत्ति १९०३ |
| आपलिक | आपलें २६९७ |
| आपसकु | आपणाला ३३३ |
| आपसया | आपोआप ३४२४ |
| आपैते | आपोआप, ऐतें |
| आफळणें | जोरानें आपटणें ३००४ |
| आबाळी | फजिती ५७७ हाल, अंपष्टा हयगय १४४६ |
| आंबिल | नाचण्याचे पीठ आंबवून केलेला पातळ पदार्थ ३३९ |
| आभरण | दागिना ४१९५ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| आभास | दर्शन १२३३ |
| आयणी | इच्छा, हेतु १६१९ |
| आयुध | शस्त्र ३५६ |
| आयुर्भाव | आयुष्य, स्पष्ट अनुभव ३९५९ |
| आयें | आळें ११४ |
| आयो | आई १४४ |
| आर | पराणी ७०१ |
| आरणें | अत्यंत उत्सुक होणें ६७६ |
| आरक्त | लाल ४८३ |
| आरता, आरती, आरते | अलीकडे १६० |
| आरते | खालीं २७९९ अलीकडे ३३११ |
| आरंबळणें | दु:खानें ओरडणें ७०१ |
| आराणुक | शांति, सौख्य ११३ खटपट ११२० आवड २४४८ |
| आराध | श्रम २७३५ |
| आराधन | इष्ट दैवत ८२१ |
| आरायिणें | विश्रांति घेणें, स्वस्थ असणें १५५१ |
| आराला | शांत झालेला १७० |
| आरुष | अडाणी २०६ बोबडें ७७२ असमंजस, वेडीवांकडी ३६ |
| आरोगणें | खाणें १४६८ |
| आरोथा | अपूर्व इच्छा ३८०४ |
| आरोनि | शांत होवून २३९५ |
| आरोनियां | अत्यंत उत्सुक होवून |
| आर्गळा | आडसर १० |
| आर्त | उत्कट इच्छा १६ पीडित १४०५ |
| आर्तभूत | पीडित ११७ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| आर्त्ति | उत्कट इच्छा १९०३ |
| आलगट | हूड, दांडगा १२९ |
| आलायबलाय घेणें | ताटांत दिवे ठेवून दृष्ट काढण्याकारितां ओवाळणे, दृष्ट काढणें. ६६८ |
| आले | आलेले ७०२ |
| आवगणें | अंगीं आणणें ७३७ |
| आवणी | तत्त्वनिर्णय करण्याची इच्छा |
| आवतणें | भोजनास आमंत्रण ११४७ |
| आवरते | आवडते १४२ |
| आवर्त्त | फेरा, वळण ७४१ |
| आवा | बाई, स्त्री २९६३ कुंभाराची भट्टी ३१९५ |
| आवांका | अवसान, धैर्य ६७ |
| आवारा | खटाटोप ३१२८ |
| आविर्भाव | डौल ३१३८ |
| आंविस | आमिष १०३६ लालुच १५०६ |
| आवो | या ११६ |
| आशा | मांगिणीचे नांव ३०६२ |
| आश्रम | गृहस्थाश्रम २४८३ |
| आश्वासणें | उत्तेजन देणें १६८५ |
| आस | आशा १८९ |
| आसक्त | अत्यंत लोभी २४९१ |
| आसडा | हिसका ३१६४ |
| आसावणें | आशा उत्पन्न होणें १५२३ |
| आसुडणें | झटका देणें ७१ |
| आहाकटा | हाकाटी, ओरड, आक्रोश ५४ |

| शब्द | अर्थ |
|---|---|
| आहाकार | ओरडणें ३५९ |
| आहाच | वरवरची, साधारण ४९२ व्यर्थ, निष्फळ ३५९७ वरवर२४३१ |
| आहाचवाहाच | सामान्य साधारण |
| आहार | भक्ष्य ७१७ |
| आहाळणें | भाजणें, पोळणें १५७० |
| आहिक्य | इहलोक ५०० |
| आहेव | सुवासिनी, सधवा १२७ |
| आळ | नांव, निमित्त १३९९ दोषारोप १५७ छंद, हट्ट, आग्रह |
| आळवण | हाका मारणें, बोलावणें १०९३ |
| आळवणी | विनवणी |
| आळवणें | विनवणें, गोड शब्दांनीं प्रसन्न करणें ११८ |
| आळा | गवताचा भारा बांधण्या-करितां गवताची केलेली दोरी २८०२ |
| आळी | हट्ट. छंद ६ एक प्रकारचा किडा, किटकी ५२९ |
| आळीकर | छंद करणारा, हट्ट घेणारा ५२१ |
| आळें | कोंडाळें ७३९ |

**इ.**

| शब्द | अर्थ |
|---|---|
| इंगळ | निखारा ३५४ इंगळी |
| इच्छाधनी | मनास येईल तितकें |
| इटीमिटी | इडापिडा |
| इतुले | इतके ३४४ |
| इंधन | सरपण २६२ |
| इलबा | इकडे या १०७८ |
| इशारत | खूण ३७४८ |
| इसाळु | ब्रह्मराक्षस |

| शब्द | अर्थ |
|---|---|

इहपरलोक—मृत्युलोक व स्वर्गलोक
इहा—इच्छा

### उ

उकल—सुटका १२३०
उकळी—उमाळा, २५०२
उखता—अवघा, सगळा २०९८ सरसकट एक ३८११
उखतें—मोजकें १९८५
उखत्यांचा—सर्वांचा, एकदम ३८११
उखर—खडबडीत, नापीक जमीन ३४४०
उखीतें—दासीला तिच्या कामाप्रमाणें मिळालेलें वेतन ७००
उगटिलें—वाईट २६१
उगलें—शांत, उगाच, मुकाट्यानें १२९ आपोआप खटपट न करतां २४९१ व्यर्थ, उगीच, १२४५
उगवणें—उलगडा करणें, समजाविणे १५ उकलणें १२०९ सुटणें, नाहींसें होणे २७४
उगळणें—ओकणें, १५६५
उगाणा—गणना, झाडा ५५७
उगिया—रिकामा
उंच—थोर, श्रेष्ठ २४२०
उचटिले—उचकटून काढणें ४१०४
उच्छिष्ट—उष्टें ६३२
उच्छेद—हेळणा, भंग, नाश ६४७
उजगरा—प्रसिद्धि १८५६ जागरण २९९३
उजरी—उदय, उत्कर्ष, ५५८ प्रकाश ३३१६
उजवणें—विवाह करणें २९४९

| शब्द | अर्थ |
|---|---|

उजळणें—शुद्ध होणें ३४०८ प्रकाशित होणें ६७८
उजूर—सबब सांगतां येण्यासारखा ३७००, सबब ७२६
उटणें—घासून साफ करणें ४४२३
उटावें—उटी करावी
उठाउठी—तत्काळ, लागलीच १८१६
उणे—कमी ११९ अपमानकारक १४०
उतराई—उपकारांतून मुक्तता १३१८ उपकार फेडलेला ७१२
उत्कर्ष—भर, वाढी ५४७
उत्तीर्णता—ऋणांतून मुक्त होणें अथवा पार पाडणें २१८७
उत्पादणें—प्रगट करणें १५५९
उदंड—असंख्य १४११
उदारिंव—उदार
उदास—दुर्लक्ष, तटस्थ ७०९
उदीम—व्यापार ७७७
उदित—उगवलेलें ११७
उदेंशीं—उद्देशीं
उदेजणें—उगवणें, उदय होणें
उदो—उदयोऽस्तु-जागी हो (देवीचे उपासक देवीपुढें उदो असें म्हणतात) १८१६
उदो करणें—नाश करणें ४०९
उद्धत—गर्विष्ठ, उर्मट ३११८
उद्धळण—फासणें, चोपडणें २०५०
उद्भट—कठीण, कठोर २११९
उद्वेग—काळजी, हुरहुर ७५
उद्वेगणे—खिन्न होणे ७१६
उधळणें—चर्चणें, अंगाला लावणें १११८

